# इंग्लंडचा इतिहास

भाग दुसरा



गोविंद अनंत मोडक बी. ए

...६०
...शित पाणे




पुना लिथो वर्क्स ६८९ सदाशिव पुणें.

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते
—गीता।

# इंग्लंडचा इतिहास.

## भाग दुसरा.

### पुनरागमनापासून महायुद्धाच्या सुरवातीपर्यंत

इ. स. १६६०—इ. स. १९१४



लेखक
गोविंद अनंत मोडक, बी. ए.

प्रकाशक
लक्ष्मण नारायण गोडबोले
बुकसेलर, बुधवार चौक, पुणे.

मुद्रकः—केशव रावजी गोंधळेकर,
'जगद्धितेच्छु प्रेस,' ५०७ शनिवार, पुणें.

प्रथमावृत्ति—१९२१.

किंमत एक रुपाया.

# प्रस्तावना.



१ इंग्लंडच्या इतिहासाचा पहिला भाग प्रसिद्ध होऊन तीन महिने झाले. आतां दुसरा भाग प्रसिद्ध होत आहे. यांत पुनरागमनापासून ते विसाव्या शतकाच्या आरंभापर्यंतचा इतिहास आला आहे. याही भागास वाचनीय पुस्तकांची यादी व सनावली जोडिली असून साम्राज्याचा नकाशा जोडला आहे; त्यामुळें इंग्लंडच्या इतिहासाचा या पुस्तकावरून अभ्यास करणारांस तें अधिक उपयुक्त होईल. याशिवाय या भागाच्या शेवटीं 'पारिभाषिक शब्दांचा कोश' घातला आहे. इंग्लंडच्या इतिहासाचा इंग्लिश पुस्तकांवरून अभ्यास चालू ठेवणारांची त्यायोगें बरीच सोय होईल असा भरंवसा वाटतो. आणखी या भागांत प्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्तींच्या स्मरणीय उक्ती त्यांच्याच शब्दांत देऊन त्यांचें मराठींत भाषांतरही दिलें आहे. तो तो भाग वाचीत असतां विद्यार्थ्यांचें लक्ष त्यांजकडे वेधल्यास त्यांच्या स्मरणांत त्या सहज रहातील. ही उक्ती देण्याची कल्पना फारच थोड्या दिवसांपूर्वी मनांत आल्यामुळें ती समाधानकारक रीतीनें अंमलांत आणितां आली नाहीं. तथापि 'खाईन तर तुपाशीं, नाहीं तर उपाशी' हा न्याय बरा नव्हे हें लक्षांत घेऊन आरंभ करून ठेवावा या दृष्टीनें उक्तींची यादी या भागांत घातली आहे.

२ ग्रंथ लिहितांना कोणत्या इंग्रजी ग्रंथांचा मीं मुख्यतः उपयोग केला तें पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे. तथापि या कामीं अनेक गृहस्थांचें मला निरनिराळ्या प्रकारें साहाय्य झालें आहे, व त्यांचे व्यक्तिशः आभार मानणें अशक्य आहे. परंतु या ग्रंथाच्या कामीं ठळकपणें ज्यांचें साहाय्य झालें त्यांचा नामनिर्देश करणें जरूर वाटतें. या ग्रंथाची हस्तलिखित प्रत टेक्स्ट–बुक कमिटीकडे पाठविली, तिच्या सभासदांनीं बऱ्याच दुरुस्त्या सुचविल्या; त्यांबद्दल या मंडळींचा मी अत्यंत

आभारी आहें. त्या दुरुस्त्यांपैकीं शक्य तितक्या करून ग्रंथ सुधारला आहे. तथापि ग्रंथांत दोष राहिले असतील; ते दाखवून दुरुस्त्या सुचवाव्या अशी माझी महाराष्ट्रीयांस सप्रेम विनंती आहे. पुस्तक छापत असतां माझे मित्र रा. रा. दत्तो वामन पोतदार यांनीं वेळोवेळीं सल्ला विचारला असतां तो त्यांनीं दिला व पारिभाषिक कोशासंबंधी उपयुक्त सूचना केल्या याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. हें पुस्तक उपयुक्त व्हावें व तें अधिक अधिक सुधारून सर्वांगसुंदर करण्याची परमेश्वरानें बुद्धि आणि हिंमत द्यावी अशी त्या दयाघन प्रभूपाशीं प्रार्थना आहे.

माघ वद्य नवमी ( दासनवमी )
पुणें, गुरुवार शके १८४२.

**गोविंद अनंत मोडक.**



# अनुक्रमणिका.



---

विशेष सूचनाः—शुद्धिपत्रावरून ग्रंथ शुद्ध करून घेऊन मग वाचावा.

# इंग्लंडचा इतिहास

## भाग दुसरा.

### ३५ पुनरागमन इ. स. १६६०.

१ **बजबजपुरी**——ऑलिव्हर क्रॉम्वेलच्या मागून त्याच्या ठरावास अनुसरून त्याचा मुलगा रिचर्ड हा देशसंरक्षक बनला. त्याच्या हातीं अधिकार येतांच त्यानें पार्लमेंटची सभा बोलाविली. तेव्हां पूर्वींप्रमाणें सैनिक व पार्लमेंटचे सभासद यांजमध्यें तंटा उपस्थित झाला. एका कर्तबगार सेनानायकाचे जागीं एक नेभळा मनुष्य आला आहे असें पाहतांच लष्करी कामगार नेमण्याचा अधिकार सैनिकानांच असावा अशी सैन्यानें मागणी केली. ही मागणी जेव्हां पार्लमेंटनें नाकारली, तेव्हां सैन्याच्या आग्रहावरून रिचर्डनें ती पार्लमेंट बरखास्त केली. लागलीच पूर्वींची लांडी पार्लमेंट बोलाविण्याचा निश्चय झाला. त्या पार्लमेंटपैकीं बेचाळीस सभासद लंडनांत होते; त्यांची बैठक सैन्याच्या संरक्षणाखालीं सुरू झाली ( ७ मे सन १६५९ ). रिचर्डच्या अंगीं बापाची तडफ व बुद्धिमत्ता नसल्यानें झाला या प्रकारानें गोंधळून जाऊन यापुढें दोन आठवड्यांनीं त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला आणि हर्टफर्डशायरमध्यें चेस्टनट गांवीं आपल्या खाजगी इस्टेटीची व्यवस्था पाहण्यास तो निघून गेला. तेथें तो इ. स. १७१२ त मरण पावला. अशा तऱ्हेनें संरक्षक-पद्धतीचा अंत झाला. मग लांडी पार्लमेंट व सैन्य यांमध्यें अधिकाराबद्दल तंटा सुरू झाला. पार्लमेंटनें 'आपले सर्व हुकूम सैन्यानें अक्षरशः पाळले पाहिजेत आणि १६५३ सालीं झालेल्या आपल्या बर-

खास्तीनंतर जे कायदे करण्यांत आले ते सर्व रद्द समजावेत ' असा हट्ट धरला. तेव्हां निराश होऊन सैन्याचा मुख्य अधिकारी लँबर्ट यानें ऑलिव्हर क्रॉम्वेलचा कित्ता गिरवून पार्लमेंटच्या सभासदांस हुसकून लाविलें. परंतु सैन्यांत एकी नव्हती. देशांत राजपक्षीयांचीं बंडें होऊं लागलीं. अशा वेळीं सैन्यांतील अधिकारी स्वार्थसाधु असून परस्परांविषयीं मत्सरानें ग्रस्त झालेले होते. तेव्हां कोणीतरी कर्तबगार मनुष्य पुढें येऊन देशांत माजलेली बजबजपुरी घालवून व्यवस्था लावण्यास पाहिजे होता.

**२ जनरल मंक**—स्कॉटलंडच्या सैन्यावरील जनरल मंक यानें हें घडवून आणण्याचें मनांत आणिलें. त्यानें स्कॉटलंडांत लोकांची सभा बोलावून त्यांच्यापासून ' देणग्या ' मिळविल्या व आपल्या सैन्यांतील शिपायांस पगार देऊन संतुष्ट केलें. मग तो इंग्लंडवर चालून आला. त्याला फेअरफॅक्स हा मिळाला व ते दोघे मिळून लंडनांत आले ( ३ फेब्रुवारी १६६० ). तेथें खरीखुरी पार्लमेंट सभा बोलवा म्हणून लोकांची सारखी ओरड चालली होती. मंकनें त्यांचें म्हणणें कबूल केलें, तेव्हां त्यांस अत्यानंद झाला. २६ फेब्रुवारीस लाँग पार्लमेंटची सभा भरली. तींत ज्या प्रेस्बिटीरियनांची प्राइडनें हकालपट्टी केली होती तेही सभासद म्हणून आले. तेव्हां लांड्या पार्लमेंटच्या सभासदांपेक्षां त्यांचींच मतें अधिक असल्यामुळें त्यांनीं लाँग पार्लमेंट बरखास्त झाल्याचा ठराव मंजूर केला; व अशा तऱ्हेनें १६४० सालीं बसलेली लाँग पार्लमेंट आपल्याच ठरावानें वीस वर्षांनंतर बरखास्त झाली ( १६ मार्च १६६० )! त्याच ठरावांत आतां राजा नसल्यामुळें पुढील व्यवस्थेकरितां कन्व्हेन्शन पार्लमेंट ( राजाच्या निमंत्रणावरून न बोलाविली गेलेली ) बोलवावी असेंही लिहिलें होतें.

**३ चार्लसचें आगमन**—इतक्यांत राजपुत्र चार्लस यानें इंग्लिश लोकांस उद्देशून हॉलंडमधील ब्रेडा शहरीं एक जाहीरनामा काढिला. त्यांत पार्लमेंट ज्यांना वजा घालील तेवढे शिवाय करून गेल्या बंडांत

सामील झालेल्या सर्व लोकांस मी माफी देईन आणि सैन्याच्या तुंबलेल्या बाक्याही चुकत्या करीन अशीं कलमें होतीं. हा जाहीरनामा जेव्हां कन्व्हेन्शन पार्लमेंटांत वाचला गेला तेव्हां तिनें राजास परत आणण्याचें ठरविलें ( ८ मे ). राजास हॉलंडांतून थाटानें आणण्याकरितां बरीच मंडळी गेली होती. त्यांसह २९ मे रोजीं चार्लसचा वाढदिवस येत होता, त्याच दिवशीं चार्लस डोव्हर बंदरावर उतरला; तेव्हां सर्व लोकांनीं त्याचें अतिशय उत्साहानें स्वागत केलें. डोव्हरहून लंडनला जातांना ज्या ज्या शहरांतून राजाची थाटामाटाची स्वारी जात होती, तेथें आसपासचे हजारों खेडवळ लोक जमत, निशाणें फडकत, आनंददर्शक घंटानाद होई आणि तोफांची सरबत्ती केली जात असे. लंडनांत पोंचल्यावर तेथें फारच जंगी स्वागत झालें. घरें शृंगारलीं होतीं; जिकडे तिकडे सुंदर पताका फडकत होत्या; हजारों घोडेस्वार पुढें चालत आहेत अशा थाटाच्या मिरवणुकीनें राजास व्हाईट-हॉलमध्यें पोंचविण्यांत आलें. एकंदरीनें स्वागतोत्सव इतक्या थाटाचा झाला कीं, चार्लसनें ‘ मी या पूर्वीं इंग्लंडला आलों नाहीं ही माझ्या हातून मोठी चूक झाली म्हणावयाची ’ असे उद्गार काढिले !

**४ कन्व्हेन्शन पार्लमेंट**—हें ‘पुनरागमन’ घडवून आणण्याची कामगिरी करण्यांत ज्यांचें अंग होतें त्यांस उच्च पदव्या देण्यांत आल्या. मंक हा ड्यूक ऑफ आल्बेमार्ल झाला. राजाबरोबर हॉलंडांतून परत आलेला एडवर्ड हाईड यास ड्यूक ऑफ क्लॅरेंडन ही पदवी मिळाली. लॉंग पार्लमेंटनें जे कायदे केले होते ते कायम करण्यांत आले. गेल्या दोन दशकांत स्थिर राज्य नसल्यामुळें सर्व राज्यकारभारांत बजबजपुरी माजली होती. ती काढून टाकून व्यवस्था लावण्याचें काम आतां कन्व्हेन्शन पार्लमेंटकडे होतें. मुख्यतः चार बाबींचीं त्यांना व्यवस्था लावणें अवश्य होतें. १ राजाला लागणाऱ्या खर्चाची व्यवस्था. २ जमिनीच्या मालकीचे तंटे मोडणें. ३ धार्मिक बाबतींतील गोंधळ काढून टाकणें. ४ राजकीय गुन्ह्यांबद्दल माफी देणें. या प्रश्नांची खालीलप्रमाणें त्यांनीं व्यवस्था लाविली.

**५ राजाचा खर्च व सैन्य**—सरंजामी पद्धति हळू हळू प्रचारांतून जाऊं लागली होती. तिच्यामुळें जमीनदारांवर राजास पुष्कळच हक्क असत. या हक्कांचा राजे ब-याच वेळां दुरुपयोग करीत. पालक असल्याच्या हक्काच्या जोरावर क्याथॉलिक आईबापांच्या मुलांस प्रॉटेस्टंट धर्ममताचें शिक्षण राजे देत. आपल्या प्रीतींतील एकाद्या पुरुषाशीं जमीनदाराच्या मुलीचें लग्न लावण्याची तीस तंबी देऊन तिच्याकडून पैसा उकळीत. सरबराईच्या वहिवाटीनें खेडेगांवांतील छोट्या जमीनदारांस फार त्रास होई. अशाच प्रकारचे हक्क सरंजामपद्धतीनुसार प्रत्येक वरिष्ठ जमीनदारास आपल्या कुळावर सांगण्याची सवड असे. कन्व्हेन्शन पार्लमेंटनें हे सर्व प्रचार कायद्यानें बंद करून टाकले. जमिनीच्या मालकावर जमिनीच्या कराशिवाय इतर कोणताही बोजा पडूं नये, अशीं व्यवस्था केली. अशा त-हेनें उत्पन्न कमी पडणार तें भरून काढण्याकरितां लॉंग पार्लमेंटनें देशांत जो दारूवर अन्तर्गत कर (Excise tax) बसविला होता तो कायम केला; शिवाय टनेज व पौंडेज हे कर वसूल करण्याची परवानगी दिली. येणेंप्रमाणें खाजगी जमिनीचें उत्पन्न, अन्तर्गत कर आणि टनेज व पौंडेज, अशी १२ लक्ष पौंडांची नक्त वार्षिक नेमणूक हयातीपर्यंत राजास देण्याचें ठरलें. परंतु ही रक्कम राजाचा खाजगी व सरकारी खर्च चालविण्यास पुरेशी नसल्यामुळें 'देणग्या' देतांना आपले हक्क राजाकडून पाळले जातील अशी राजाकडून कबुली घेण्याचा पार्लमेंटास अवसर होताच. सैन्याचा पगार देऊन त्यास रजा देण्यांत आली; त्यामुळें ५० हजार शिपायी शस्त्रें टाकून देऊन शेतकरी अथवा कारागीर बनले. राजाच्या शरीररक्षणासाठीं म्हणून ५००० खडी फौज मात्र ठेवण्यांत आली.

**६ जमिनी**—जमिनीच्या मालकीचा प्रश्न सोडविणें जरा अवघड होतें. राजाच्या मालकीच्या ज्या जमिनी होत्या त्या कन्व्हेन्शन पार्लमेंटनें राजास परत देण्याचा ठराव केला. परंतु धर्मखात्याच्या जमिनी आणि

१ भाग पहिला, पृष्ठ ५८ वरील टीप पहा.

खाजगी लोकांच्या ज्या जमिनी मागें पार्लमेंटनें जप्त करून विकल्या होत्या त्या नव्या मालकांकडे कायम करण्यांत आल्या. या मुद्यावर राजपक्षीयांनीं बराच वाद केला; परंतु कन्व्हेन्शननें आपल्या मतांत फरक केला नाहीं.

**७ धर्मव्यवस्था**—धार्मिक बाबतींत तर अतिशयच गोंधळ होता. सरकारनें धर्माधिकारी नेमून त्यांनीं धर्मव्यवस्था करावी असा इंग्लंडचा जुना कायदा होता. परंतु चार्लसच्या वधानंतर प्रेस्बिटीरियन पद्धति सुरू झाली होती. शेवटीं असें ठरलें कीं, जेथें आपला हक्क सांगण्यास जुने धर्माधिकारी असतील तेथें त्यांचीच नेमणूक करावयाची; पण ज्या ठिकाणीं जुना धर्माधिकारी पुढेंच येत नसेल त्या ठिकाणीं नवीन रीतीनें निवडल्या गेलेल्या प्रेस्बिटीरियन गृहस्थांचीच नेमणूक कायम समजावयाची.

**८ गुन्हेगारांचा बंदोबस्त**—इतकें झाल्यावर चार्लसला फांशीं देणाऱ्यांची चौकशी करण्याच्या कामास सुरुवात झाली. २९ जणांची चौकशी होऊन त्यांतील दहा इसमांस फांशीं देण्यांत आलें आणि बाकीच्यांना इतर शिक्षा देण्यांत आल्या. मृतांची सुद्धां या शिक्षेच्या सत्रांतून सुटका झाली नाहीं ! क्रॉम्वेल, आयर्टन, ब्रॅडशॉ यांचीं प्रेतें उकरून काढण्यांत येऊन फांसावर एक दिवसभर त्यांना लोंबकळत ठेवण्यांत आलें, व मग त्यांचीं डोकीं धडांपासून निराळीं करण्यांत आलीं ! इतकीं कामें झाल्यावर कन्व्हेन्शन पार्लमेंट राजानें बरखास्त केली ( २९ डिसेंबर १६६० ). स्कॉटलंड व आयर्लंड येथें तर राजपक्षाचें मताधिक्य असल्यामुळें राजाच्या पुनरागमनानें सर्वत्र आनंदी आनंद झाला.

---

## ३६ क्लॅरेन्डनचा राज्यकारभार १६६१–१६६७.



**१ राजनिष्ठ पार्लमेंट**—१६६१ च्या मे महिन्यांत राजानें पहिली पार्लमेंट बोलाविली. पन्नास सभासद सोडून या पार्लमेंटांत बाकी सर्व क्याव्हेलियरच होते. त्यांच्या राजनिष्ठेस अतिशय उसळी आली होती. तिच्या भरांत राजास सैन्य व आरमार यांजवर अनियंत्रित सत्ता असावी, त्याच्याशीं कांहीं झालें तरी लढाई करणें म्हणजे बेकायदेशीर आचरण करणें होय, आणि प्रजेनें राजास अर्ज करण्याचा उपयोग नियमित रीतीनेंच केला पाहिजे, असे ठराव तिनें चटाचट पास केले. प्रेस्बिटीरियन धर्ममताचा धिःकार करून तिनें धर्माधिकाऱ्यांस फिरून उमरावांच्या सभेचे सभासद होण्यास परवानगी दिली आणि इंग्लिश प्रस्थापित धर्मांत (Episcopacy) सांगितल्याप्रमाणें पार्लमेंटच्या सर्व सभासदांनीं प्रभुभोजन केलें पाहिजे असें तिनें ठरविलें.

**२ दुसऱ्या चार्लसचें धोरण**—दुसऱ्या चार्लसनें बरींच वर्षें विपत्तींत घालविलीं होतीं. पहिल्या चार्लसचा वध झाल्याबरोबर आपल्याला राज्य मिळविण्यासाठीं त्यानें उद्योग केला, परंतु त्यांत यश न येऊन देशांतर करून कष्टानें आपल्या आयुष्याचे दिवस कंठित तो बसला होता. इतक्यांत दैवयोगानें एकाएकीं त्यास इंग्लंडची गादी लाभली. तेव्हां आपल्या रंगेल स्वभावास अनुसरून साहजिकच चैन व यथेच्छ विषयोपभोग यांच्या प्राप्तींतच आपलें उरलेलें आयुष्य घालविण्याचा त्याचा संकल्प होता.

**क्लॅरेन्डन–कोड**—चार्लसनें आपल्याला फिरून राज्य मिळविण्याच्या वेळीं उपयोगीं पडलेल्या क्लॅरेंडनवर राज्यकारभार सोपवून दिला. हा क्लॅरेंडन ( पूर्वींचा हाइड ) कर्तृत्ववान् असून त्याचें वर्तन शिस्तीचें असे. त्यानें आपली मुलगी ॲन हिचा विवाह राजाचा भाऊ जेम्स याशीं करून

दिला; त्यामुळें राजघराण्याशीं त्याचें जास्तच संघट्टण होतें. तो कट्टा प्रस्थापित धर्मवादी ( Episcopalian ) असून इंग्लंडमध्यें जे नाना धर्मपंथ उत्पन्न झाले होते त्यांचा नायनाट करून एपिस्कोपसीची पूर्ण छाप इंग्लंडवर बसवावी अशी मनापासून त्याची इच्छा होती. यासाठीं त्यानें पार्लमेंटकडून चार धार्मिक कायदे करून घेतले आणि त्यांचा कडक अंमल चालविला. ते कायदे पुढीलप्रमाणें:—( १ ) पार्लमेंटनें कॉर्पोरेशन ॲक्ट पहिल्यानें पास केला ( १६६१ डिसेंबर ). त्यांत म्युनिसिपालिट्यांच्या सर्व सभासदांनीं प्रेस्बिटेरियन धर्ममताचा निषेध करून इंग्लिश प्रस्थापित धर्माचा स्वीकार करण्याची शपथ घ्यावी आणि राजाविरुद्ध हत्यार उचलणें बेकायदेशीर आहे हेंही शपथेवर कबूल करावें, अशीं कलमें होतीं. ( २ ) १६६२ च्या मे महिन्यांत 'ॲक्ट ऑफ युनिफॉर्मिटी' करण्यांत आला. सर्व धर्माधिकाऱ्यांनीं प्रस्थापित धर्माप्रमाणें तयार केलेलें प्रार्थनापुस्तकच धर्ममंदिरांत वापरलें पाहिजे व त्यांतील सर्व मतें त्यांनीं मान्य केलीं पाहिजेत, आणि सर्व शाळामास्तर, खाजगी शिक्षक, व युनिव्हर्सिटींतील कामगार यांनींही कार्पोरेशन ॲक्टमध्यें सांगितलेल्या शपथा घेतल्या पाहिजेत, अशीं या कायद्याचीं कलमें होतीं. सुमारें २००० धर्माधिकाऱ्यांनीं ह्या कायद्यांतील अटी आपल्या माताविरुद्ध असल्यामुळें तो कायदा मान्य केला नाहीं; तेव्हां त्यांना आपल्या जागांवरून हुसकून देण्यांत आलें. ( ३ ) नॉन्कन्फॉर्मिस्ट ( दुराराध्य )

---

१ इंग्लंडमधील प्यूरिटन व प्रेस्बिटेरियन लोकांना प्रस्थापित धर्मांतील बरींच तत्त्वें व आचार मान्य नसत. १६६२ पर्यंत प्रस्थापित पंथांत राहूनच आपल्याला जरूर त्या सुधारणा करतां येतील असें त्यांस वाटत असे. परंतु तेव्हांपासून प्रस्थापित पंथापासून प्यूरिटनांनीं फारकत करून घेतली व आपले निराळे धर्मसंघ स्थापिले. तेव्हां त्यांना नॉन्कन्फॉर्मिस्ट ( Nonconformist, प्रस्थापित पंथ न अनुसरणारे ) हें नांव पडलें.

टीप–८ पानावर पहा.

लोकांना सार्वजनिक प्रार्थनामंदिरें बंद झाल्यामुळें ते खाजगी रीतीनें प्रार्थनेसाठीं जमत. अशा खाजगी जमावांतून ते राजद्रोहाचा फैलाव करितात या सबबीवर कुटुंबांतील मंडळीखेरीज पांचांहून अधिक परकी मनुष्यांनीं खाजगी जागेंत प्रार्थनेकरितां जमतां कामा नये, असें फर्मा-विणारा 'कॉन्व्हेण्टिकल अॅक्ट' करण्यांत आला (१६६४). ४ या दुराराध्य लोकांच्या धर्मोपदेशकांना, राजाविरुद्ध हत्यारें उचलणें बे-कायदेशीर आहे आणि प्रस्थापित धर्म व राज्य उलथून पाडण्याचा मी कधींही प्रयत्न करणार नाहीं, अशी शपथ अगोदर घेतल्याशिवाय कोणत्याही म्युनिसिपल गांवाच्या आसपास पांच मैलांत उपदेश करण्याची, व्याख्यानें देण्याची किंवा शाळा घालण्याची बंदी करणारा 'फाइव्ह माइल अॅक्ट' (पांच मैलांचा कायदा) पास कर-ण्यांत आला (१६६५).

**४ कायद्यांचा अंमल**—या कायद्यांचा अंमल सक्तीनें होऊं लागला, व जे हे कायदे मोडीत त्यांना दंड, तुरुंग अगर गुलामगिरीच्या यमयातना भोगाव्या लागत. ज्या हजारों लोकांनीं शिक्षा भोगल्या त्यांत जॉन बनियन नांवाचा एक गरीब इसम होता. तो प्यूरिटन असून पहिल्या चार्लसच्या उलट पार्लमेंटकडून युद्धांत सामील झाला होता.

---

पहिल्यानें बॅप्टिस्ट, प्रेस्बिटीरियन व इन्डिपेन्डण्ट हे तीन नॉन्कफॉर्मिस्ट पंथ होते. पुढें १७३९ त मेथॉडिस्ट पंथाची स्थापना झाली. नॉन्कन्फॉ-र्मिस्टांच्या या चार मुख्य शाखा असून त्यांचे धर्मगुरू त्या त्या पंथाच्या स्वतंत्र धर्ममंदिरांत प्रार्थना चालवितात. क्लॅरेण्डन–कोडची उत्पत्ति प्रस्था-पित पंथास न अनुसरणाऱ्या प्रॉटेस्टंटांस नाहींसें करण्यासाठीं झाली होती. परंतु तो हेतु साध्य न होतां नॉन्कन्फॉर्मिस्टांचे व्यवस्थित धर्मसंघ स्थापन झाले व पुढील शतकांत क्लॅरेन्डन–कोडांतील कायद्यांची इतिश्री झाली. नॉन्कन्फॉर्मिस्टांना डिसेंटर (Dissenter, अमान्यता दर्शविणारे) हें नांवही दिलेलें आढळतें. मात्र नॉन्कन्फॉर्मिस्ट हे प्रॉटेस्टंट होत, हें सदैव लक्षांत ठेविलें पाहिजे.

एका शेतावर धर्मोपदेश करीत असतांना त्याला पकडण्यांत आलें. मग न्यायाधिशापुढें चौकशी होऊन तो दोषी ठरला व त्याला बेडफर्डच्या तुरुंगांत बारा वर्षें ( १६६०-७२ ) तुरुंगवास भोगावा लागला. फिरून १६७५ मध्यें त्याला तुरुंगांत धाडण्यांत आलें. तेथें असतां त्यानें 'यात्रेकरूचा प्रवास' ( Pilgrim's Progress) हें इंग्लिश वाङ्मयांतील प्रसिद्ध पुस्तक लिहिलें.

**५ पोर्तुगालच्या राजकन्येशीं विवाह**—परराष्ट्रीय व्यवहारासंबंधीं पाहतां स्पेनशीं मैत्री राखावयाची हें क्लॅरेंडनचें कायमचें धोरण बनून गेलें होतें. त्यास अनुसरून स्पेनपासून १६४० त विभक्त झालेल्या पोर्तुगाल देशच्या राजाची मुलगी क्याथराईन हिशीं चार्लसचा विवाह झाला, व जांवयास आंदण म्हणून हिंदुस्थानांतील मुंबई व आफ्रिकेच्या वायव्येकडचें टॅन्जीर हीं पोर्तुगालकडून मिळालीं ( १६६२ ). याच सुमारास क्रॉम्वेलनें मिळविलेलें फ्रान्समधील डन्कर्क बंदरही क्लॅरेंडननें फ्रान्सला विकून टाकिलें.

**६ डच युद्धाचीं कारणें**—हॉलंड व इंग्लंड या दोन देशांमध्यें समुद्रावर आपली सत्ता राहून पूर्वेकडील व्यापाराचा सर्व फायदा आपणासच उपटतां यावा यासाठीं सारखी चढाओढ लागली होती. हिंदुस्थान, आफ्रिका वगैरे देशांत वखारी घालावयाच्या व तेथील नेटिव्ह राजांपासून आपल्याला व्यापाराच्या सवलती मिळवावयाच्या, यासाठीं दोघांचीही सारखी खटपट चाललेली असे. शिवाय अमेरिकेंतही दोन्ही राष्ट्रांच्या वसाहती होत्या. या परदेशांत जाऊन राहिलेल्या इंग्रज-डच्चांमध्यें भांडणें झालीं कीं इंग्लंड व हॉलंड येथील सरकारें आपआपल्या लोकांचे हितसंबंध पाळले जावेत म्हणून परस्परांशीं युद्धें करीत. १६६५ त असेंच एक युद्ध सुरू झालें. त्याची विशिष्ट कारणें म्हटलीं म्हणजे इंग्रजांनीं पास केलेले कडक नौकानिर्बंधाचे कायदे डचांस असह्य झाले व इंग्लंड व हॉलंड यांची दुसऱ्याचा प्रदेश आपण लाटावा ही बुद्धि, हीं होत. पार्लमेंटनें एकमतानें या युद्धासाठीं २५ लक्ष पौंडांची

मंजुरी दिली. ही लढाई सुरू करण्याला दुसऱ्या चार्लसच्या दृष्टीनें एक निराळेंच कारण होतें असें म्हणतात. लढाई सुरू केली म्हणजे खर्चास पार्लमेंट जी रक्कम मंजूर करील त्यांतून आपल्या स्वतःच्या चैनीसाठीं बराच पैसा उपटतां येईल या बुद्धीनेंच त्यानें लढाईस संमति दिली !

७ **डच युद्ध ( १६६५–६७ )**.—चार्लसचा भाऊ जेम्स हा मुख्य अॅड्मिरल होता. त्यानें १३९ जहाजांचें एक आरमार बरोबर घेऊन लोस्टॉफ्टजवळ डच आरमाराशीं लढाई दिली. तींत इंग्रजांचा जय झाला, डचांचा एक अॅड्मिरल पडला, एकोणीस जहाजें बुडालीं व ७००० माणूस गारद झालें. या पुढें थोड्याच दिवसांनीं इंग्लंड देशांत प्लेगची भयंकर सांथ उद्भवली. या सांथीनें फक्त लंडन शहरांतच चार महिन्यांत एक लक्ष लोक बळी घेतले. तिचा उद्भव खलाशी लोकांतही झाल्यामुळें इंग्लिश आरमार हलक स्थितींत होतें. त्यामुळें १६६६ च्या जूनांत डच अॅड्मिरल डी रायटर व व्हॉन ट्रॉंप यांनीं इंग्लिश आरमाराचा पराभव केला. परंतु पुढें दोन महिन्यांनीं मंकनें डी रायटरचा नॉर्फोकच्या किनाऱ्यावर पराभव केला व तसाच पाठलाग करून झूडरझीच्या खाडींत १५० डच व्यापारी जहाजें बुडविलीं ! दोन्ही बाजू युद्धास कंटाळल्या होत्या; इतक्यांत प्लेगचा कहर व लढाईचें झेंगट यांच्या मदतीस लंडन शहरांत झालेला भयंकर अग्निप्रळय झाला (१६६६). या तापत्रयीमुळें इंग्लंड अगदीं जेरीस आलें ! या अग्निप्रळयांत लंडन–मधील तेरा हजार घरें जळून गेलीं व हजारों लोक उघडे पडले. या प्रसंगापासून आपला फायदा करून घेण्याकरितां झूडरझी येथील पराभवाचें उट्टें काढण्याचा डच लोकांनीं विचार केला. एकसष्ट जहाजें बरोबर घेऊन डी रायटर टेम्सच्या मुखाजवळ आला आणि नदींत शिरून टिल्बरी पावेतों येऊन त्यानें इंग्रजांचीं तीन जहाजें इंग्रजांच्या डोळ्यांसमोर बुडविलीं. मग जमिनीवर उतरून कांहीं नासधूस करून तो परत गेला. लोकांनीं तहाबद्दल अतिशय ओरड चालविली. तेव्हां १६६७ मध्यें ब्रेडा येथें तह झाला. ज्यानें त्यानें जिंकलेले

प्रांत ज्याच्यात्याच्याकडे रहावेत असें एक कलम होतें. या कलमानें इंग्रजांना अमेरिकेंत न्यू यॉर्क मिळालें व डचांकडे डच गियाना कायम झाली. नौकानिर्बंधाचा कायदा इतका ढिला करण्यांत आला कीं, हॉलंड फ्रान्स व जर्मनी येथील माल आपल्या जहाजांतून इंग्लंडला आणण्याची डचांस परवानगी मिळाली. इंग्लंड व हॉलंड यांपैकीं कोणावरही पर-राष्ट्रानें स्वारी केल्यास त्यास दुसऱ्यानें मदत करावी असें ठरलें. डचांनीं इंग्लिश खाडींत इंग्लिश जहाजांना दास्याचें चिन्ह म्हणून नव्हे तर नम्र-त्वाचें चिन्ह म्हणून सलामी देण्याचें कबूल केलें.

**८ क्लॅरेंडनची अधिकारच्युति**—प्रधान क्लॅरेंडन हा राजास अप्रिय झाला होता. तो स्वभावानें गंभीर असून त्याच्या वर्तनांत धार्मिक कडकपणा फार असे. हे गुण त्या रंगेल व चैनी राजास कसे आवडणार ? जेव्हां तो राजास अप्रिय झाला तेव्हां पार्लमेंटचें क्याव्हेलियर सभासद त्याला उघड दोष देऊं लागले. प्रेस्बिटीरियन व इतर नॉन्कन्फॉर्मिस्ट लोकांस तर त्यानें प्रस्थापित धर्माचा अंमल कडक रीतीनें सुरू केल्यामुळें तो नकोसा होताच. त्यानें क्रॉम्वेलनें मिळविलेलें डन्कर्क फ्रान्सला विकलें, आणि डच युद्धांत इंग्लंडला पराजय आला; तेव्हां त्याला कामावरून दूर करण्यांत येऊन त्याची कॉमन्सनीं ‘ चौकशी ’ केली. जीव बचावण्यासाठीं तो फ्रान्सांत पळून गेला. पार्लमेंटनें त्याला यावज्जन्म हद्दपारीची शिक्षा दिली ( १६६७ ). हद्दपारींत त्यानें आपला प्रसिद्ध ‘बंडाचा इतिहास’ लिहिला. त्यांत राजाच्या बाजूनें चार्लस व पार्लमेंट यांजमधील युद्धाचें उत्कृष्ट वर्णन केलें आहे.

---

# ३७ राजाला लांच पण देशाला जाच.



१ **केबल**—क्लॅरेन्डनला रजा दिल्यावर राजानें आपल्या मर्जीतील पांच गृहस्थांचें एक प्रधानमंडळ नेमिलें. त्यांत क्लिफर्ड, आर्लिंगटन, बकिंगहॅम, अॅश्ले व लॉडरडेल हे पांच जण होते. त्यांचीं इंग्रजींत नांवें लिहून अनुक्रमानें त्यांचीं पहिलीं अक्षरें घेतलीं तर केबल ( cabal ) हा शब्द तयार होतो. या शब्दाचा अर्थ गुप्त मंडळ असा आहे. हा शब्द पहिल्या जेम्सच्या वेळीं निवडक लोकांच्या मंडळास लावण्यांत येत असे. परंतु येथें तो वरील कारणास्तव विशेष लागू होता. या पांच लोकांचें परस्परांशीं मुळींच पटत नसे. पण राजाला ते प्रत्येकीं प्रिय असल्यामुळें त्यांचें त्यानें कूट बनविलें. बकिंगहॅम हा तीव्र बुद्धीचा असून राजाच्या व्यसनांत त्याचा सोबती असे. क्लिफर्ड हा कट्टा क्याथॉलिक असल्यानें त्याची एकतंत्री राज्यपद्धतीवर दृढ श्रद्धा असे. अॅश्ले हा प्रेस्बिटीरियन पंथाचा असून राजकारणांत हुशार होता आणि धार्मिक स्वातंत्र्याचा कैवारी होता. याप्रमाणें कोणाचा कोणाशीं मेळ नव्हता. ते एकमेकांविरुद्ध कारस्थानें करीत आणि राजाही त्यांचेविरुद्ध गुप्त कारस्थानें करी. यावरून ' केबल ' या शब्दाचा अर्थ ' पाजी लोकांचें कूट ' असा होऊन बसला आहे. परंतु केबल अधिकारारूढ झाल्यावर पहिलेंच जें कृत्य झालें तें फार दूरदर्शीपणाचें झालें, असें म्हणणें भाग आहे. फ्रान्सच्या विरुद्ध इंग्लंड, हॉलंड व स्वीडन यांचें एक त्रिकूट बनविण्यांत आलें ( १६६८ ). हें सर वुइल्यम टेंपल या मुत्सद्दयाच्या बुद्धिमत्तेचेंच फळ होय. या त्रिकुटाचें महत्त्व काय होतें हें पुढील हकीकतीवरून समजून येईल.

२ **लुईची महत्त्वाकांक्षा**—या वेळीं फ्रान्स देशचा राजा चौदावा लुई हा होता. तो एकतंत्री राजसत्तेचा भोक्ता असून त्याची महत्त्वा-

कांक्षा जबर होती. बेल्जम हा देश त्या वेळीं स्पेनच्या ताब्यांत असे, म्हणून त्याला स्पॅनिश नेदर्लँड्स म्हणत. हा देश काबीज करून फ्रान्सची ईशान्येकडील हद्द पुढें ढकलण्याचा त्याचा विचार होता. इतकें झाल्या-वर पुढचा हॉलंड देशही गडप करून ऱ्हाईन नदीच्या मुखापर्यंत फ्रान्सची ईशान्य सरहद्द शेवटीं नेऊन भिडविण्याचा त्याचा संकल्प होता. शिवाय तो स्वतः क्याथॉलिक असल्यामुळें पश्चिम युरोपांतील प्रॉटेस्टंट धर्ममत समूळ खणून काढण्याचाही त्यानें बेत केला होता. तेव्हां अशा स्थितींत प्रबळ लुईशीं आपण एकट्यानें टक्कर देणें हॉलंडला जड वाटलें. इंग्लिश लोकांनाही फ्रान्सची सत्ता अतोनात वाढणें इष्ट नव्हतें. तेव्हां जो त्रिकूट करण्याचा तह झाला तो इंग्लिशांस फारच आवडला. व कांहीं काळपर्यंत राजा अगदीं लोकप्रिय होऊन गेला.

**३ गुप्त तह**——परंतु चार्लस पडला चैनी आणि विलासी. त्याला पार्लमेंटनें जें सालीना बारा लाखांचें उत्पन्न तोडून दिलें होतें तें खर्चास मुळींच पुरत नसे. आणखी थोडाही पैसा लागल्यास पार्लमेंटची बैठक झाल्याशिवाय तो मिळणें शक्य नव्हतें; आणि पार्लमेंट कोठली सुखा-सुखी पैसे द्यावयाला ? ती बोलावली कीं, राजव्यवहारावर हटकून टीका करावयाचीच. तेव्हां हा 'सटीक' पैसा घेण्यापेक्षां एखाद्या अधिक सुलभ मार्गानें पैसा मिळूं लागेल तर बरा असें चार्लसला वाटत अस-ल्यास नवल नाहीं. लुईलाही इंग्लंडास 'चार दिडक्या' देऊन आपल्या कच्छपीं लावून घेतां आलें तर नको होतें असें नाहीं. तेव्हां बुभुक्षित आणि सुग्रास अन्न हीं जवळ आलीं म्हणजे जसा अन्नाचा चट्टा मट्टा होण्यास उशीर लागत नाहीं, तशी या वेळीं स्थिति झाली. १६७० सालीं चार्लस आणि लुई या दोघांमध्यें एक 'गुप्त' तह झाला. त्यांत चार्ल-सनें त्रिकुटांतून आपलें अंग एकदम काढून घ्यावें, व हॉलंडवर समुद्रावरून स्वारी करावी. स्वतः रोमन क्याथॉलिक धर्म स्वीकारल्याचें योग्य संधि सांपडतांच त्यानें जाहीर करावें, असा करार होता. हीं सर्व कृत्यें करण्यास लागणारें द्रव्यबल व मनुष्यबल देण्याचें लुईनें मोठ्या आनंदानें कबूल केलें ! ताबडतोब चार्लसला दीड लाख पौंडांची देणगी देऊन डच युद्ध

चालेल तेथवर सव्वा दोन लाखांचा वार्षिक तनखा चालविण्याचेंही लुईनें वचन दिलें. हॉलंड देश जिंकून झाल्यावर किनाऱ्यालगतचीं कांहीं बंदरेंही चार्लसला देण्याचें लुईनें कबूल केलें. अशा रीतीनें व्यसनाधीन असल्यामुळें इंग्लंडचा राजा लुईच्या अगदीं अंकित बनून गेला.

**४ सवलतीचा जाहीरनामा**—चार्लसनें इंग्लिश आरमार हॉलंडच्या बरोबरीचें केलें पाहिजे ही सबब सांगून पार्लमेंटपासून आठ लक्ष पौंड काढले आणि ती तहकूब करून टाकिली. मग रोमन क्याथॉलिक धर्माची दीक्षा घेण्याचा जो फ्रान्सशीं ठराव झाला होता त्याचा पहिला हप्ता म्हणून एक 'सवलतीचा जाहीरनामा' त्यानें काढला (१६७२). त्या योगानें 'प्रस्थापित मार्गाहून इतर मार्गांचें अवलंबन करणाऱ्या लोकांच्या विरुद्ध जे कडक कायदे पास करण्यांत आले आहेत त्यांचा उपयोग करण्यांत येऊं नये' असें फर्माविण्यांत आलें, प्रेस्बिटीरियन लोकांना सवलती मिळाव्यात यासाठीं ॲश्लेची खटपट होती तरी या जाहीरनाम्याप्रमाणें रोमन क्याथॉलिकांनाही सवलती मिळणार असल्यामुळें त्यानें त्याचा निषेध केला. पण त्याच्या तोंडांत 'शॅफ्ट्स्बरीचा अर्ल' ही पदवी कोंबल्यामुळें त्यानें आपला हेका सोडला!

**५ हॉलंडशीं युद्ध**—मग हॉलंडविरुद्ध लढाई सुरू करण्यांत आली. साउथवोल्ड खाडींत आरमारी लढाई होऊन इंग्रजांचा जय झाला; पण त्यांना फारच त्रास पडला. कांहीं सैन्य खुष्कीवरून फ्रान्सांस मदत करण्यासही पाठविण्यांत आलें. लुईनें हॉलंडवर फारच जोराचा हल्ला केला. ठिकाणावर ठिकाण काबीज करीत फ्रेंच लष्कर हॉलंडची व्यापारी राजधानी ॲम्स्टरडॅम याच्या अगदीं नजीक जाऊन पोंचलें. इंग्लंडच्या राजाच्या फितुरीमुळें लुई आतां हॉलंडला गिळणार असें वाटूं लागलें; परंतु डच लोकांचें राष्ट्रीय सत्त्व या वेळीं जागृत होऊन त्यांनीं वुइल्यम ऑफ ऑरेंज याच्या नेतृत्वाखालीं आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्यासाठीं शर्थ केली. हॉलंडदेश समुद्रसपाटीहून खोल आहे व त्याभोंवतीं मोठमोठे तट

बांधून समुद्राचें पाणी अडविलेलें आहे. त्या वेळीं डच लोकांनीं तट पाडून आपला देश जलमय करून टाकिला. तेव्हां फ्रेंचांस तसेंच चरफडत मागें फिरणें प्राप्त झालें ( १६७२ ).

**६ सावकारांची फसवणूक**— हें युद्ध चालू असतां लुईनें दिलेल्या देणग्या, पार्लमेंटनें दिलेला वार्षिक तनखा, आरमार वाढविण्यासाठीं दिलेली आठ लाखांची जादा देणगी, हीं सर्व चार्लसला पुरीं पडलीं नाहींत; व त्यानें आपल्या चैनीसाठीं एका निंद्य मार्गानें पैसा काढिला. देशांतील व्यापाऱ्यांकडून सरकार कर्ज घेई व सरकारी वसुलांतून त्या कर्जाची फेड सरकार करीत असे. चार्लसनें तिजोरी बंद असल्याचें सांगून सावकारांचें कर्ज परत मिळणार नाहीं असें फर्माविलें, आणि अशा कुमार्गानें १३ लक्ष पौंड चैनीकरितां उपटले (१६७१)! त्यामुळें पेढ्यांचीं दिवाळीं निघून व्यापार अगदीं बसला. परंतु इतके जरी पैसे घेतले तरी पुरवठा न पडून युद्ध चालू असतांनाच १६७३ सालीं देणग्या मिळविण्यासाठीं, तहकूब केलेली पार्लमेंट सभा त्यानें बोलावली.

**७ कसोटीचा कायदा**—सवलतीचा जाहीरनामा चार्लसनें काढणें म्हणजे पार्लमेंटला धाब्यावर बसवून ' मनः–पूतं समाचरेत् ' हें तत्त्व स्वीकारण्यासारखेंच होतें. तेव्हां त्याचा पार्लमेंटला फार राग आला होता. या बाबतींत राजा क्षमा करण्याचा आपला हक्क गाजवीत आहे असें नसून ' गुन्हा ' मनुष्याकडून होण्यापूर्वींच ' तूं अमुक गोष्ट केल्यास तो गुन्हा होणार नाहीं ' अशी त्यास अगाऊ फूसच दिल्यासारखें होत आहे अशी पार्लमेंटनें जाहीरनाम्यावर टीका केली. पार्लमेंट प्रॉटेस्टंट पंथांतील दुराराध्यांना सवलती देण्यास तयार होती; परंतु राजास रोमन क्याथॉलिकांचे हितसंबंध पाळावयाचे असल्यामुळें त्यानें पार्लमेंटशीं न भांडतां आपला जाहीरनामा परत घेतला ! पार्लमेंटनें लागलीच एक धर्म-कसोटीचा कायदा ( Test Act ) पास केला ( १६७३ ). त्या अन्वयें सर्व सरकारी अधिकाऱ्यांनीं आपण प्रॉटेस्टंट धर्माप्रमाणें प्रभु-

भोजन करण्यास तयार आहों व क्याथॉलिक धर्मांतील 'रूपांतराचें तत्त्व' ( Transubstantiation ) आपणास मान्य नाहीं, अशी शपथ घ्यावी असें ठरलें. या कायद्यामुळें क्लिफर्ड हा क्याथॉलिक असल्यामुळें त्याला फडणिशीची ( Lord treasurer ) जागा सोडावी लागली, आणि चार्लसचा भाऊ जेम्स ड्यूक ऑफ यॉर्क यानें उघड रोमन क्याथॉलिक पंथ स्वीकारला होता, त्यासही ॲड्मिरलच्या जागेचा राजीनामा देणें भाग पडलें. शॅफ्ट्स्बरी ( ॲश्ले ) हा लोकपक्षाचा पुढारी बनला व केबलचें कूट अशा रीतीनें धुळीस मिळालें.

८ **हॉलंडशीं तह**—केबल मंत्रिमंडळ मोडल्यावर राजानें लॉर्ड डॅन्बी यास आपला मंत्री नेमिलें ( १६७३ ). त्यानें राजाची सत्ता दृढ करावयाची व प्रस्थापित धर्म पक्का करावयाचा हें क्लॅरेंडनचें धोरण स्वीकारिलें. त्यानें पार्लमेंटला हातीं ठेविण्याचा एक नवीनच उपाय योजिला. मतदारसंघांस लांच भरून 'जो हुकूम' वृत्तीचे लोक निवडून घ्यावयाचे आणि निवडून आलेल्या सभासदांस लांच भरून राजाचे अंकित करून टाकावयाचे, या त्या युक्त्या होत्या. त्याचें परराष्ट्रीय धोरण मात्र क्लॅरेंडनच्या उलट होतें. १६६८ मधील त्रिकुटाचें पुनरुज्जीवन करण्यास तो आतुर होता, व इंग्लंडनें फ्रान्सचें केव्हांही मिंधें राहूं नये अशी त्याची खटपट होती. १६७४ च्या फेब्रुवारींत डचांशीं तह करण्यास राजास पार्लमेंटनें भाग पाडलें. डचांनीं इंग्लंडास फारच अनुकूळ अटींवर तह केला. युरोपच्या बाहेर इंग्रजांकडून घेतलेले सर्व प्रांत इंग्लंडला परत देण्याचें त्यांनीं कबूल केलें. इंग्लंडची ईस्ट इंडिया कंपनी व डच व्यापारी यांजमधील तंटे मिटविण्याची हमी दिली. इंग्लंडला आठ लक्ष पौंडांचा खंडही भरला. इंग्लिश खाडींत इंग्लिश निशाणास सलामी देण्याचें मान्य केलें. इतक्या देणग्यांच्या मोबदला इंग्लंडनें फक्त त्यांच्या शत्रूस न मिळण्याचें आश्वासन दिलें. पार्लमेंटनें आतां खडी फौज काढून टाकण्याची राजास विनंती केली. त्यावर लुईकडून १० लाख पौंडांची वार्षिक नेमणूक मिळण्याचें वचन मिळाल्यामुळें चार्लसनें पार्लमेंट १५ महिनेपर्यंत तहकूब केली ( १६७५ नोवेंबर ).

पुढें १६७७–७८ सालीं १० महिनेपर्यंत पार्लमेंटची बैठक लांबविण्यासाठीं लुईनें १६ लक्ष पौंड दिले. हेतु हा कीं, आपल्याला होतील तितक्या कडक अटी घालून हॉलंडशीं तह करतां यावा. परंतु चार्लसनें लुईशीं ठराव केला होता त्या वेळेच्या अगोदरच पार्लमेंट बोलाविली. तिनें लढाईची धमकी दिली, व हॉलंडशीं सख्य दृढ करण्यासाठीं डॅन्बीनें चार्लसचा भाऊ जेम्स ड्यूक ऑफ यॉर्क याची वडील मुलगी मेरी हिचा विवाह हॉलंडचा धुरीण 'वुइल्यम ऑफ ऑरेंज' याशीं केला ( १६७७ नोव्हेंबर ). हा वुइल्यम प्रॉटेस्टंट असून लुईचा कट्टा शत्रू होता. तेव्हां लुईचा चार्लसवरील विश्वास उडून त्यानें डचांशीं निम्वेगेन येथें कसाबसा तह उरकून घेतला ( १६७८ आगस्ट). डचांची एक बोट भरही जमीन न जाऊन पुढील पंचवीस वर्षांकरितां बऱ्याच व्यापाराच्या सवलती त्यांस मिळाल्या.

---

## ३८ शॅफ्ट्स्बरी शमला, मग चार्लस रमला.



**१ क्याथॉलिकांविरुद्ध लोकमत**—चार्लसनें 'सवलतीचा जाहीरनामा' काढिला होता तेव्हांपासून रोमन क्याथॉलिक लोकांस फाजील स्वातंत्र्य मिळणार अशी लोकांची तक्रार होती. शिवाय फ्रान्सशीं युद्ध पुकारण्यास तो अळंटळं करूं लागला. तेव्हां लुईशीं चार्लसचें कांहीं तरी कारस्थान असलें पाहिजे असा लोकांस जबर संशय आला. इतक्यांत निम्वेगेनच्या तहानंतर अवघ्या तीनच दिवसांनीं टायटस ओट्स नांवाच्या एका बदमाषानें अशी हूल उठविली कीं, 'रोमन क्याथॉलिक पंथाच्या लोकांनीं राजाचा खून करून जेम्स ड्यूक ऑफ यॉर्क याची राज्यावर स्थापना करावयाची आणि प्रॉटेस्टंट धर्म चिरडून टाकावयाचा असा एक कट केला आहे.' ड्यूक ऑफ यॉर्कचा सेक्रेटरी अर्ल कोल्मन, राणीचा धर्माधिकारी, स्पॅनिश वकील व खुद्द चौदावा लुई हे या कटांत सामील

आहेत असें ओट्स सांगूं लागला. इतक्यांत ओट्सचा पक्षपाती ग्रॉडफ्रे नांवाचा न्यायाधीश होता; त्याचें प्रेत एका गटारांत सांपडलें. तेव्हां त्याचा खून क्याथॉलिकांनीं चिडून केला असला पाहिजे असा लोकांनीं तर्क बांधिला. याच वेळीं चार्लस व डॅन्बी यांनीं फ्रेंच राजाला मदत केल्याचा मोबदला म्हणून पैशाची मागणी करणारीं पत्रें सांपडलीं. मग काय विचारतां? क्याथॉलिकांविरुद्ध लोकमत अतिशय क्षुब्ध झालें; व कित्येक क्याथॉलिक गृहस्थांस कटांत सामील असल्याच्या संशयावरून फांशीं देण्यांत आलें. पार्लमेंटनें डॅन्बीची चौकशी करण्याचा घाट घातला. तेव्हां राजानें त्यास वांचविण्याकरितां एकोणिस वर्षें बसलेली पार्लमेंट बरखास्त करून टाकली ( १६७९ जानेवारी ). परंतु पुन्हां जी पार्लमेंट बोलाविली तिनें त्यास बंदींत टाकलें ( १६७९ मार्च ). ड्यूक ऑफ यॉर्क हा युरोपांत पळून गेला; आणि चार्लसचा दासीपुत्र 'ड्यूक ऑफ मन्मथ' हा चार्लसमागून आपणास गादी मिळावी म्हणून यत्न करूं लागला.

**२ शरीर–संरक्षणाचा कायदा ( १६७९ )**--या पार्लमेंटनें 'हेबीअस कॉर्पस ॲक्ट' हा महत्त्वाचा कायदा पास केला. या कायद्यान्वयें अधिकाऱ्यांना कोणत्याही इसमास चौकशी केल्यावांचून अनियमित काळ पावेतों अटकेंत ठेवण्याची बंदी झाली. त्याचप्रमाणें ज्या अपराधाची एक-वार चौकशी होऊन आरोपीची मुक्तता न्यायकोर्टानें केली आहे त्या आरोपाबद्दल त्याला पुन्हां पकडण्याची किंवा पकडलेल्या आरोपीस स्व-देशाच्या हद्दीबाहेर बंदींत ठेवण्याची सक्त मनाई करण्यांत आली. इ. स. १२१५ त मिळालेली मॅग्ना चार्टा व १६२८ त पास झालेला पिटिशन ऑफ राइट (हक्क–संरक्षणाचा अर्ज) यांच्या बरोबरीनें या कायद्याची इंग्लं-डच्या सनदशीर राज्यपद्धतीच्या इतिहासांत गणना करणें योग्य होय. या कायद्यानें प्रत्येक मनुष्याचें नैसर्गिक स्वातंत्र्य कबूल करण्यांत येऊन न्यायाच्या नांवाखालीं व्यक्तिस्वातंत्र्यावर पडत असलेला घाला काढून टाकण्यांत आला. स्कॉटलंडची राणी मेरी, रॅले व लॉड हे चौकशीशिवाय किती वर्षें तरी तुरुंगांत कुजत पडले होते. पण यापुढें असा प्रकार झाल्याचें आढळून येत नाहीं.

**३ शॅफ्ट्स्बरी**—याच पार्लमेंटांत इंग्लंडचें रोमन क्याथॉलिक धर्मापासून कायमचें रक्षण करण्याच्या हेतूनें लोकपक्षाचा पुढारी शॅफ्ट्स्बरी यानें असें बिल पुढें आणलें कीं, 'जेम्स हा क्याथॉलिक असल्यामुळें त्याचा इंग्लंडच्या गादीवरील वारशाचा हक्क काढून घ्यावा. हा कायदा पास होऊं नये म्हणून राजानें पार्लमेंट बरखास्त केली (१६७९ जुलै). या पार्लमेंटांत क्याथॉलिक लोकांस पार्लमेंट सभेचे सभासद होण्याचा हक्क असूं नये हें बिल मात्र पास झालें. व या वेळेपासून १८२९ सालपर्यंत पार्लमेंट सभेस व सरकारी आणि म्युनिसिपल जागांस क्याथॉलिक पारखे झाले. १६८० च्या आक्टोबरांत नवीन पार्लमेंट भरली. तींत वारसा-रद्दीचें बिल कॉमन्स सभेंत पास झालें; पण लॉर्ड्स सभेंत हॅलिफॅक्सनें वक्तृत्व-पूर्ण भाषण करून जेम्सचें समर्थन केल्यामुळें तें नापास झालें. कॉमन्सनीं रागावून देणग्या देण्याचें नाकारिलें व हॅलिफॅक्सवर हल्ला केला. तेव्हां चार्लसनें पार्लमेंट बरखास्त केली (१६८१ जानेवारी). १६६६ चा अग्निप्रळय क्याथॉलिक भुरट्यांनीं लाविलेल्या आगीचें फळ होतें असें त्यांनीं प्रतिपादिलें. नंतर दोन महिन्यांनीं नवीन पार्लमेंट ऑक्सफर्ड येथें भरविली होती. तिला दोन्ही पक्ष सशस्त्र हजर होते, व आतां यादवी माजते कीं काय अशी भीति वाटूं लागली. क्याथॉलिक जेम्सला राजपदवी द्यावी, पण प्रत्यक्ष राज्यकारभार त्याचा जांवई वुइल्यम ऑफ ऑरेंज याजकडे ठेवावा या व्यवस्थेस चार्लस कबूल होता. परंतु लोकपक्षाचा पुढारी शॅफ्ट्स्बरी यानें 'वारसारद्दीचें बिल' संपूर्ण पास झाल्याशिवाय कांहीं एक काम न करण्याचा हट्ट धरिला. तेव्हां लोकपक्षांत फूट पडली. तंटा इतका वाढला कीं आतां रक्तपात होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली. तेव्हां भरल्यापासून एक आठवड्याच्या आंत पार्लमेंट बरखास्त करणें राजास भाग पडलें. यानंतर शॅफ्ट्स्बरीनें राजास पकडून आणून जेम्सचा वारसा रद्द करण्याच्या बिलास त्याची सक्तीनें मंजुरी मिळविण्याचा उद्योग आरंभिला. पण क्याथॉलिकांचीं कारस्थानें हीं खरोखरीचीं नसून त्यांत बराच भाग गप्पांचाच आहे, असें लोकांस दिसून येऊं लागलें होतें. तेव्हां शॅफ्ट्स्बरीच्या पक्षाचा जोर कमी होऊं लागला. इकडे चार्लसलाही

फ्रान्सच्या लुईनें दरसाल लांच देण्याचें वचन दिलें, व त्यानें यापुढें पार्लमेंट न भरवितांच राज्यकारभार करण्याचें ठरविलें. शॅफ्ट्स्बरीनें राजावर वाटेल तसें तोंडसुख घेतल्यामुळें राजा रागावला व राजघराण्यांतील मंडळीवर खोडसाळ आरोप केल्याबद्दल शॅफ्ट्स्बरीवर खटला सुरू झाला. राजानें लंडनसारख्या विरोध करणाऱ्या शहराच्या सनदाच काढून घेतल्या व त्यांच्या म्युनिसिपालट्यांत आपले हस्तक नेमून आपला पक्ष प्रबल करण्याची व्यवस्था केली. हें पाहून शॅफ्ट्स्बरी घाबरला आणि हॉलंडांत पळून गेला; तेथें तो एक वर्षानें वारला (१६८३ जानेवारी).

**४ व्हिग व टोरी**—याच वादांत इंग्लंडांतील दोन प्रमुख पक्षांस पडलेलीं नांवें निघालीं. हें वारसा–रद्दीचें बिल पास होऊं नये म्हणून चार्लस पार्लमेंट सभा बोलवीत नसे. तेव्हां शॅफ्ट्स्बरीनें पार्लमेंटची बैठक बोलवा, असे विनंती–अर्ज इंग्लंडांतील सर्व भागांतून करविले. त्यावरून शॅफ्ट्स्बरीच्या पक्षास अर्ज करणारे (Petitioners) असें पहिल्यानें म्हणूं लागले. परंतु पुढें स्कॉटिश करारनामा करणाऱ्या लोकांस देण्यांत आलेलें व्हिग हें नांव 'त्यांच्यासारखे तुम्ही राजद्रोही आहांत' याचें सूचक म्हणून त्यांस प्रतिपक्षातर्फें लावण्यांत येऊं लागलें. राजपक्षीय लोक पार्लमेंट बोलावणें ही राजाच्या मर्जीची गोष्ट आहे, त्यांत आपण हात घालण्याचें कारण नाहीं, असें प्रतिपादीत व व्हिग लोकांनीं केलेल्या अर्जांचा निषेध करीत. त्याजवरून पहिल्यानें 'निषेध करणारे' (Abhorrers) असें त्यांस नांव पडलें. परंतु ते रोमन क्याथॉलिकांचे कैवारी आहेत, अशा अर्थाचें सूचक असें आयरिश रोमन क्याथॉलिकांना लावण्यांत येणारें 'टोरी' हें नांव त्यांचे प्रतिपक्षी त्यांस लावूं लागले. अशा रीतीनें व्हिग व टोरी हे पक्ष पूर्वींच्या राउंडहेड व क्याव्हेलियर यांचे एक तऱ्हेनें अनुवादक असून हल्लींच्या लिबरल व कॉँझर्व्हेटिव्हांचेही अनुक्रमें जनकच म्हटले तरी चालतील! यानंतर पुढें पुष्कळ वर्षांनीं राजावर टीका करून धर्मस्वातंत्र्याचा कैवार घेण्याचें काम व्हिगपक्ष करी व आतां तेंच काम लिबरल पक्ष करीत असतो व त्याच्या उलट देशांतील जुन्या संस्था व

चाली यांचा कैवार घेऊन स्थापित धर्माची तळी उचलावयाची व राजावर विशेष टीका करावयाची नाहीं हें काम टोरीपक्ष करीत असे आणि आतां तेंच काम कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष करीत असतो.

**५ बंडाचा मोड**---शॅफ्ट्स्बरी पळून गेल्यानंतर जोराची प्रतिक्रिया सुरू झाली. व लोकांचा रोमन क्याथॉलिक कारस्थानांच्या गप्पांवर मुळींच विश्वास बसेना. शॅफ्ट्स्बरीच्या कित्येक कट्ट्या अनुयायांनीं चार्लसला 'रायहाऊस' मध्यें गांठून ठार करण्याचा कट केला ( १६८३ ). पण तो वेळींच उघडकीस येऊन सिड्ने प्रभृति पांच सात बड्या धेंडांना त्यांत सामील असल्याच्या संशयावरून फांशीं देण्यांत आलें. स्कॉटलंडमध्येंही प्रेसिबटीरियन पद्धति मोडून इंग्लंडप्रमाणें बिशप ( धर्माधिकारी ) लोकाच्या नेमणुका करण्यांत आल्या. तेव्हां स्कॉच लोकांनीं बंड केलें. तें चार्लसच्या राखेचा पुत्र ड्यूक ऑफ मन्मथ यानें मोडिलें. बंडवाल्यांच्या प्रमुख पुढाऱ्यांस फांशीं देऊन व इतर पुढाऱ्यांस काळ्या पाण्यावर पाठवून सर्व लोकांवर त्यानें दहशत बसविली. त्यामुळें कांहीं लोक अमेरिकेस गेले व ज्यांस तशी अनुकूलता नव्हती ते अनुकूल संधीची वाट पहात अज्ञातवासांत राहिले. मोरोक्कोंतील टॅन्जीर ठाणें चार्लसला सासऱ्यापासून अंदण मिळालें होतें. तें सोडून देऊन तेथील फौज--१७० घोडेस्वार व सात हजार पायदळ--कायद्याविरुद्ध इंग्लंडांत आणण्यांत आली व राजाच्या चाकरीस ठेवण्यांत आली; पण कोणी त्याच्या उलट एक चकारशब्दही काढिला नाहीं. आतां सर्व प्रजेवर राजाचा इतका वचक बसला कीं, राजाचा भाऊ ड्यूक ऑफ यॉर्क हा रोमन क्याथॉलिक असूनही टेस्ट ॲक्टला न जुमानतां ॲडमिरल--पदारूढ झाला. अर्थात् त्याला बेवारस ठरविणारें बिल तर बेपत्ताच झालें.

**६ चार्लसचा मृत्यु**---राजपक्षाची अशी सरशी होतांच जेम्स क्याथॉलिकांना विशेष उत्तेजन देऊं लागला. त्याचा परिणाम असंतोषरूपानें थोडथोडा दिसूं लागतांच एकदां चार्लस त्याला एकांतीं म्हणाला 'भाऊ, वडिलांच्या पश्चात् वनवासांत मी अकरा वर्षें काढिलीं आहेत.

आतां आणखी म्हातारपणीं मला वनवासांत जाण्याची इच्छा नाहीं.' यानंतर लवकरच चार्लस मरण पावला (१६८५). त्यास मरतेवेळचा उपदेश करण्यास क्याथॉलिक धर्मगुरूचीच योजना जेम्सनें केली होती. नीतिमत्तेंत इंग्लंडच्या राजमालिकेंत चार्लसचा नंबर शेवटचा लागेल. पैसा मिळाला व आपली चैन चालली म्हणजे झालें; मग काय वाटेल तें पाप आपल्या हातून झाल्यास हरकत नाहीं, असें त्याचें धोरण होतें. त्याचें लग्न पोर्तुगालची राजकन्या क्यॅथराइन हिशीं झालें होतें. तेव्हां विवाहाच्या वेळीं सासऱ्याकडून चार्लसला मुंबई बेट अंदण मिळालें होतें म्हणून मागें सांगितलें आहे. तें त्यानें १६६८ त ईस्ट इंडिया कंपनीस दिलें. या राणीपासून त्यास कांहीं अपत्य झालें नाहीं. पण त्याची अनौरस संतति बरीच होती. इंग्लंडांतील कित्येक सरदार घराणीं या लेकवळ्यांपासून झालीं आहेत.

---

## ३९ दुसऱ्या जेम्सची दडपशाही.



१ **दुसरा जेम्स**—दुसऱ्या चार्लसनंतर त्याचा भाऊ जेम्स हा 'दुसरा जेम्स' ही पदवी घेऊन गादीवर आला. त्या वेळीं तो बावन्न वर्षांचा होता. त्याचें मन संकुचित असून त्याचा स्वभाव हट्टी होता. तो रोमन क्याथॉलिक होता व इंग्लंडांतील बहुजन समाज प्रॉटेस्टंट होता; त्यामुळें आणि जेम्सच्या ठिकाणीं उदारपणा व दूरदर्शित्व यांचा पूर्ण अभाव असल्यामुळें, त्याचा प्रजेशीं तंटा होणें अगदीं साहजिक होतें. गादीवर बसल्यावर त्यानें राष्ट्राचे कायदे पाळण्याचें व धर्माचें संरक्षण करण्याचें अभिवचन दिलें; पण वचन व कृति यांचा मेळ न बसतां राजवाड्यांत क्याथॉलिक धर्माचे विधि जाहीर रीतीनें होऊं लागले. व कोणासही तेथें हजर राहण्यास मुभा असे. त्यानें चार्लसचा मंत्रि क्लॅरेंडन याचा मुलगा अर्ल ऑफ रोचेस्टर, गॉडॉलफिन, व संडर्लंड यांस आपले

मंत्री नेमिलें. त्यांनीं लांचेचा भरपूर उपयोग करून राजास अनुकूल अशी टोरी पार्लमेंट भरविली. या पार्लमेंटनें तहाहयात वीस लक्षांचें वार्षिक उत्पन्न राजास करून दिलें; व अशा रीतीनें राजास आपली गरज लागूं नये अशी व्यवस्था करून आपल्या अधिकारावर स्वतःच्या हातानें गदा आणिली.

**२ मन्मथचा राज्यप्राप्त्यर्थ प्रयत्न**—जेम्स क्याथॉलिक असल्यामुळें लोकांस अप्रिय आहे, तेव्हां प्रयत्न केल्यास आपणांस गादी मिळेल असें दुसऱ्या चार्लसचा दासीपुत्र मन्मथ यास वाटलें. पूर्वीं वारसा रद्दीचे बिलाच्या वेळीं शॅफ्ट्स्बरीशीं संगनमत करून जेम्स बेवारस ठरून आपण वारस ठरावें अशी मन्मथनें खटपट केली होती. तो देखणा असून रंगेल असल्यानें लोकप्रिय होता. शिवाय राजाचे आपण 'कायदेशीर पुत्र' आहों असेंही तो म्हणूं लागला. परंतु दुर्दैवानें 'वारसा-रद्दी' पास झाली नाहीं व मन्मथ गादीचा वारस ठरला नाहीं. आतां आपल्या दैवाची परीक्षा पाहण्याचा त्यानें निश्चय केला. तो या वेळीं हॉलंडांत होता. स्कॉटलंडांतील अर्गाइलचा ड्यूक त्याला अनुकूल झाला. उभयतांनीं अनुक्रमें इंग्लंडांत व स्कॉटलंडांत उतरून आपल्या पक्षाचें सैन्य जमविण्याचें खलबत केलें. त्याप्रमाणें अर्गाइल हा स्कॉटलंडांत ग्लास्गोनजीक दाखल झाला. पण त्याच्या बाजूला हजार दीड हजारावर सैन्य न जमून या अल्प सैन्याचा तात्काळ मोड झाला आणि अर्गाइलला राजद्रोहाबद्दल फांशीं देण्यांत आलें. मन्मथ तीन जहाजें बरोबर घेऊन निघाला. त्यानें बरोबर ऐशींच लोक घेतले होते. पण इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरल्यावर जे हजारों लोक आपणांस मिळतील अशी त्याची खात्री होती त्यांजकरितां हत्यारें मात्र त्यानें भरपूर बरोबर घेतलीं होतीं. डॉर्सेटशायरमधील लाइम बंदरांत तो उतरला आणि त्यानें आपण देशाचे कायदे, प्रजेचे हक्क व प्रॉटेस्टंट धर्म यांच्या संरक्षणार्थ आला आहों असा जाहीरनामा काढला. त्या वर्षाचीं पिकें बुडाल्यामुळें पुष्कळ गरीब शेतकरी व मजूर असंतुष्ट होते ते त्याला मिळाले. सरदार लोक व मध्यम वर्ग मात्र तटस्थ राहिला. ब्रिस्टल येथें येईपर्यंत त्याच्या सैन्याची संख्या सहा हजार झाली. धड

इकडे ना तिकडे असें करून, कुचंबणाऱ्या लोकांस आपल्या बाजूस मिळवून घेण्यासाठीं त्यानें असें जाहीर केलें कीं, आपली आई ही दुसऱ्या चार्लसची कायदेशीर राणी असून आपण गतराजाचे औरस पुत्र आहोंत. त्याला बरेच लोक मिळाले असून जय त्याला मिळणार असा रंग होता. पण मानसिक कमकुवतपणा आणि लष्करी धोरणाचा अभाव यांचा त्याच्या ठिकाणीं पक्का पगडा असल्यामुळें त्यानें बरेच दिवस 'एकदां पुढें कूच व एकदां मागें कूच' यांत घालविले. त्यामुळें राजपक्षाकडील सैन्य तयार होण्यास पुष्कळ अवसर सांपडला. सेजमूर येथें दोन्ही सैन्यांची गांठ पडली. तेथें मन्मथनें शत्रूवर रात्रीचा छापा घातला; पण त्यांत त्याचा पूर्ण पराभव होऊन तो पकडला गेला व पुढें लवकरच त्याचा शिरच्छेद झाला. ही लढाई ता. ६ जुलई १६८५ रोजीं झाली. इंग्लंडच्या भूमीवर झालेली हीच शेवटची लढाई होय. तेव्हांपासून आजतागायत सव्वा दोनशें वर्षांत इंग्लंडच्या भूमीवर एकही लढाई झाली नाहीं.

**३ रुधिरप्रिय जेफ्रिझ**—सेजमूरच्या लढाईत मन्मथचे जितके अनुयायी रणांगणावर पडले त्यांपेक्षां अधिक लोकांची पुढें शिपायांकडून कत्तल झाली. जेफ्रिझ नांवाच्या न्यायाधिशानें तर त्यांहूनही अधिक लोकांस फांशीची शिक्षा ठोठाविली. पुरावा असो वा नसो खटल्याच्या सुनावणीचा फार्स करावयाचा आणि धाकदपटशा देऊन ज्यूरीकडून दोषी ठरवून घ्यावयाचें कीं फांसावर चढवावयाचें, अशा अमानुष रीतीनें शासन करण्यांत येई. ब्रिस्टलच्या आसपास बहुतेक चवाठ्यांवर फांसावरून प्रेतें लोंबकळत असलेला देखावा कित्येक महिने सर्वांच्या परिचयाचा झाला होता. अशा रीतीनें सुमारें तीनशें लोकांस फांशीं देऊन, आठशें एकेचाळीस लोकांस 'वेस्ट इंडीज' बेटांत गुलाम म्हणून पाठवून व आणखी पुष्कळ लोकांस फटके व दंड यांजसारख्या साध्या शिक्षा देऊन मग जेफ्रिझची स्वारी आपल्या रक्तमय दौऱ्यावरून परत आली! राजानें त्याचा बहुमान करून त्यास लॉर्ड चॅन्सेलरची बहुमानाची जागा देऊन त्याचा गौरव केला!!

**४ क्याथॉलिक पंथास राजाश्रय**—— याप्रमाणें बंडाचा मोड होऊन आपलें राजपद स्थिर झालेलें पाहतांच जेम्सनें आपलें खरें स्वरूप प्रगट करण्यास सुरुवात केली. आपला अधिकार बिनतोड पाळला जाण्यास सैन्याचें पाठबळ पाहिजे, हें जेम्सच्या लक्षांत येऊन चुकलेंच होतें. मन्मथच्या बंडाचा दाखला घेऊन आयत्या वेळीं उभारलेल्या लष्करावर (Militia) भागत नाहीं असें सांगून जेम्सनें लंडनजवळ 'हाउन्स्लोहीथवर' एक खडी फौज (Standing army) ठेवून दिली. भांडणाचें मूळ राहूं नये ह्मणून पार्लमेंट तहकूब करून टाकण्यांत आली. या सैन्यावर क्याथॉलिक अमलदार नेमण्यास टेस्ट ॲक्ट आडवा येत होता. त्याची वाट राजास कोणत्याही कायद्याची ' सूट ' देतां येते, या तत्त्वावर जेम्सनें लाविली. या कृतीस न्यायकोर्टाचा आधार असावा यासाठीं बारा न्यायाधिशांचें एक स्पेशल कोर्ट नेमण्यांत आलें व त्यांच्यापुढें हा प्रश्न मांडण्यांत आला. त्यांपैकीं अकरा जणांनीं राजास कोणत्याही अपराधाबद्दल क्षमा करण्याचा जसा अधिकार आहे तसाच ' टेस्ट ॲक्ट ' सारखा जाचक कायदाही झुगारून देण्याचा अधिकार आहे असें ठरविलें. अशा रीतीनें ' टेस्ट ॲक्ट ' धाब्यावर बसवून जेम्सनें सैन्यांत क्याथॉलिक कामगार नेमिले ! व शिपायांनाही मतांतर करून क्याथॉलिक धर्म स्वीकारण्याविषयीं उत्तेजन देण्यांत आलें. हा पहिला डांव साधलासा पाहतांच लॉंग पार्लमेंटनें हाय कमिशन कोर्ट बंद केलें होतें व फिरून तसलें कोर्ट स्थापूं नये, असें ठरविलें होतें, तरी जेम्सनें तें स्थापन करून देशांतील सर्व धर्मसंबंधीं अपराधांची चौकशी त्याजकडे सोंपविण्याचें योजिलें (१४ जुलई १६८६ ). यानंतर जेसूट पंथाच्या उपदेशकांना इंग्लंडांत शाळा घालण्यास परवानगी देण्यांत आली. मग विश्वविद्यालयांतून रोमन क्याथॉलिक लोकांचा भरणा करावयाचा क्रम त्यानें सुरू केला. १६८७ च्या आरंभीं त्यानें फ्रॅन्सिस नांवाच्या एका जोग्यास नेहमींच्या शपथा घेण्याचा आग्रह न करितां एम् ए. ची पदवी द्यावी असें केंब्रिज विश्वविद्यालयाच्या व्हाइस चान्सेलरास पत्र लिहिलें. त्यानें तसें करण्याचें नाकारतांच त्यास

व त्याच्या बरोबरच्या आठ सहकाऱ्यांस–ज्यांत प्रसिद्ध गणिती सर ऐझॅक न्यूटन हा एक होता–हाय कमिशन कोर्टापुढें खेचण्यांत आलें आणि त्यांच्या जागांवरून त्यांस हुसकून देण्यांत आलें. ऑक्सफर्ड विश्वविद्यालयांतील मॅग्डॅलन कॉलेजचा मुख्याधिकारी मरण पावला. त्याच्या जागीं एका क्याथॉलिक गृहस्थाची नेमणूक करण्याबद्दल जेम्सनें मतदार लोकांस स्वदस्तुरचें पत्र पाठविलें. परंतु मतदारांनीं राजाची सूचना मान्य केली नाहीं. तेव्हां राजानें स्वतः तेथें जाऊन तेथील अधिकारी मतदारांस कामावरून दूर केलें आणि बिशप पार्कर यास मुख्याधिकाऱ्याच्या जागेवर नेमून टाकिलें. राजाची ही अरेरावी व दंडेली पाहून विश्वविद्यालयांतील सर्व प्रमुख लोक व धर्माधिकारी हे संतप्त झाले आणि तेव्हांपासून राजाची विरुद्ध बाजू बळावत चालली. पण जेम्सनें आपला क्याथॉलिक धर्माची स्थापना करण्याचा संकल्प जास्तच जोरानें अंमलांत आणण्याचें धाडस केलें ! सर्व मोठ्या शहरांतील म्युनिसिपालट्यांत क्याथॉलिक सभासद निवडून येतील अशी व्यवस्था करण्यांत आली. आयर्लंडच्या प्रॉटेस्टंट गव्हरनरास परत बोलावून त्याच्या जागीं टिर्कोनेल नांवाच्या क्याथॉलिकांची नेमणूक केली. स्कॉटलंडांतही क्याथॉलिकांविरुद्ध असलेले सर्व कायदे रद्द समजावेत असा जाहीरनामा काढिला. आणि या आतांपर्यंतच्या सर्व कार्यक्रमाचा कळस म्हणूनच कीं काय, १६८७ च्या एप्रिल महिन्यांत धार्मिक कसोटीच्या कायद्यापासून सूट देणारा जाहीरनामा त्यानें काढिला.

**५ धर्मस्वातंत्र्याचा जाहीरनामा**––हीं जेम्सचीं कृत्यें इंग्लंडच्या लोकांस पसंत न पडून त्यांच्यांत क्षोभ उत्पन्न झाला, ही गोष्ट खरी ! तरी पण जेम्सच्या मागून त्याची प्रॉटेस्टंट मुलगी मेरी ही गादीवर येईल व मग हा जुलूम आपोआपच नाहींसा होईल अशी त्यांची अटकळ असल्यामुळें त्यांनीं तटस्थपणाचें धोरण स्वीकारलें. राजाचे अन्यायी कायदे आपण स्वतः मानावयाचे नाहींत पण त्याबरोबरच त्याशीं उघड विरोधही करावयाचा नाहीं असें हें धोरण होतें. परंतु यापुढें

जेम्सचीं दंडुकेशाही जास्तच कडक होऊन तें कायम ठेविणें लोकांस अशक्य झालें. १६८८ च्या एप्रिलांत जेम्सनें फिरून धर्मस्वातंत्र्याचा जाहीरनामा काढून तो सर्व लोकांस कळावा म्हणून तो प्रार्थनामंदिरांत प्रार्थनेच्या वेळीं लागोपाठ दोन रविवारीं वाचावा असा हुकूम फर्माविला ! धर्माधिकाऱ्यांनीं तो जाहीरनामा वाचण्याचें नाकारिलें. सगळ्या इंग्लंडमधील प्रार्थनामंदिरांपैकीं केवळ चार ठिकाणीं तो जाहीरनामा वाचण्याला कबूल असलेले राजनिष्ठ धर्मोपदेशक आढळून आले; पण त्या चौघांनाही श्रोतेच मिळाले नाहींत.

**६ सात 'बिशप' वरील खटला**—क्यँटरबरीचा आर्चबिशप सॅन्क्रॉफ्ट याचा राजाच्या ईश्वरी सत्तेवर विश्वास होता. परंतु प्रस्थापित धर्माचा तो पक्का अनुयायी असल्यामुळें जाहीरनामा वाचण्याचा हुकूम त्याला मुळींच पसंत पडला नाहीं. नंतर तो व आणखी सहा बिशप यांनीं सदरहू जाहीरनामा राजाच्या राज्याभिषेकाच्या वेळच्या शपथेला व राजाच्या अधिकाराला विरुद्ध आहे असा एक अर्ज मोठ्या धैर्यानें राजाकडे सादर केला. या अर्जरूपानें एक खोटा, दुष्ट व राजद्रोही मजकूर प्रसिद्ध केल्याबद्दल राजानें या सात धर्माधिकाऱ्यांची एका जादा न्यायकोर्टापुढें चौकशी करण्याचें ठरविलें. खटला चालविणारे न्यायाधीश स्वपक्षाला अनुकूल होतील असे निवडण्याची राजानें खबरदारी घेतली होती. खटला चालू असतां धर्माधिकाऱ्यांतर्फे खालील मुद्दे मांडण्यांत आले. १ अर्ज केव्हांही प्रसिद्ध झालेला नव्हता, २ त्यांतील कारणें खोटीं नव्हतीं, कारण पार्लमेंटच्या कागदपत्रांचा त्यांना आधार होता, ३ त्यांतील मुद्दे दुष्ट बुद्धि अगर राजद्रोह यांनीं प्रेरित होऊन केव्हांही लिहिलेले नव्हते. खरोखर पाहिलें तर या खटल्यांत दोन महत्त्वाच्या गोष्टींचा निकाल लागावयाचा होता. एक, राजाच्या सूट देण्याच्या अधिकारास कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं; व दुसरें, प्रजेस केव्हांही अर्ज करण्याचा अधिकार आहे कीं नाहीं ! राजानें जरी कडेकोट बंदोबस्त केला होता तरी पंचांनीं एक मतानें 'निर्दोषी' असा निकाल दिल्यामुळें सातही धर्माधिकारी सुटले ( ३० जून १६८८ ). हा निकाल कानीं पडतांच

लंडन शहरांत आनंदीआनंद होऊन रात्रीं दीपोत्सव व होळ्या सुद्धां झाल्या. ही बातमी राजानें ठेविलेल्या फौजेस कळतांच तेथील सैनिकांनींही आनंदाचा गजर केला! तो मात्र राजाच्या कानीं पडतांच राजा चपापला. आपल्या सैन्यावरही आपणास पूर्ण विसंबून राहतां येणार नाहीं हें त्यास कळून चुकलें.

## ४० सनदशीर युगास सुरवात १६८८.



**१ अडचणींचा निरास**—जेम्स जुलूम करून इंग्लंडमध्यें रोमन क्याथॉलिक पंथ दृढमूल करण्याचा उद्योग करीत असतां त्याचे मोठमोठे अधिकारी जेम्सचा जांवई हॉलंडचा राजा वुइल्यम याशीं जेम्सला गादीवरून काढून वुइल्यमनें राजा व्हावें याविषयीं गुप्त व्यवहार करण्यांत गुंतले कर्नल चर्चिल ( प्रसिद्ध मार्लबरो ), संडर्लंड हे जेम्सच्या विश्वासांतील लोकही या मंडळींत होते. इंग्लिश आरमाराचा मुख्य अधिकारी रसेल यानें तर हॉलंडांत जाऊनच वुइल्यमशीं खलबत केलें! फ्रान्सचा चौदावा लुई यानें हॉलंड गिळंकृत करण्याचा बेत केला होता. त्यास चीत करण्यास इंग्लडची सत्ता आपल्या हातीं आल्यास सोपें जाईल असा विचार मनांत येऊन या मंडळीस हो म्हणावें असें वुइल्यमला वाटे; परंतु मन्मथचें उदाहरण डोळ्यांसमोर असल्यामुळें व तो स्वतः सावध असल्यामुळें इंग्लंडवर जाण्याचें धैर्य त्यास एकदम होईना. फ्रान्सचा राजा चौदावा लुई हॉलंडवर केव्हां स्वारी करील याचा नेम नव्हता. दुसरी अशी भीति होती कीं, वुइल्यम प्रॉटेस्टंट व जेम्स हा रोमन क्याथॉलिक असल्यानें सर्व क्याथॉलिक एक होऊन लढण्याचाही फार संभव होता. शिवाय परकीय डच सैन्याच्या बळावर वुइल्यम इंग्लंड जिंकू पाहतो, अशी बातमी पसरून इंग्लिशांचा देशाभिमान जागृत होणार व मग अर्थातच आपल्याला चुरमुरे खात परत जावें लागणार ही कल्पना

वुइल्यमच्या मनांत आली ! पण सर्व अडचणी आपोआप दूर झाल्या. जेम्सला मुलगा झाल्याची बातमी पसरली (१६८८ जून १०) व जेम्सची मुलगी व वुइल्यमची बायको प्रॉटेस्टंट मेरी गादीवर येऊन आपला छळ थांबेल ही इंग्लिश लोकांची आशा नष्ट झाली. तेव्हां ही इष्ट गोष्ट आपोआप घडून येत नाहीं तर प्रयत्न करून घडवून आणिली पाहिजे, असा इंग्लंडांतील पुढारी मंडळींनीं निश्चय केला. सात धर्माधिकारी ज्या दिवशीं निर्दोषी ह्मणून सुटले त्याच दिवशीं इंग्लंडांतून एक निमंत्रणपत्रिका वुइल्यमकडे पाठविण्यांत आली तीवर निरानिराळ्या मतांच्या सात पुढाऱ्यांच्या सह्या होत्या. सरदार व सुखवस्तु यांच्या पैकीं निदान एकोणीस विसांश व सैन्य आणि आरमार यांपैकीं निदान नऊ दशांश तरी लोक जेम्सला सोडून तुम्हांस मिळण्यास तयार आहेत असें वुइल्यमला कळविण्यांत आलें. कलोनच्या मुख्य धर्मगुरूची जागा रिकामी पडली होती. तिजवर कोणाची नेमणूक करावयाची यासंबंधीं पोप व चौदावा लुई यांजमध्यें वाद माजला. शेवटीं युद्धापर्यंत मजल येऊन लुईनें जर्मनींतील पॅलॅटिनेट प्रांतावर स्वारी केली (सप्टेंबर १६८८). तेव्हां त्याला हॉलंडकडे लक्ष पुरविण्यास मुळींच सवड राहिली नाहीं. अशा रीतीनें क्याथॉलिकांच्या मुख्य पुढाऱ्यांतच युद्ध जुंपलें ! लुईनें देऊं केलेली मदत झिडकारून दुसऱ्या जेम्सनें इंग्लंडांत शांतता राखण्यासाठीं आयरिश सैन्य आणविलें व स्कॉटिश सैन्यास बोलावणें केलें. तेव्हां इंग्लिश लोकांचा देशाभिमान जागृत होऊन ते आपल्याविरुद्ध जातील ही वुइल्यमला पडलेली भीतिही निर्मूल झाली.

**२ वुइल्यमचें आगमन**—१६८८ च्या आक्टोबर महिन्याच्या १० तारखेस हेग (हॉलंडांत आहे) येथें वुइल्यमनें एक जाहीरनामा काढिला. जेम्सचीं कृत्यें इंग्लिश लोकांच्या स्वातंत्र्यास विघातक असल्यामुळें इंग्लंडांत खुली पार्लमेंट भरवून इंग्लिश जनतेचें हक्कसंरक्षण व्हावें या हेतूनें मी इंग्लंडांत येत आहें, असें त्यांत लिहिलें होतें. इंग्लंडच्या पश्चिम किनाऱ्यावर डेव्हनशायरमधील टोर्बे येथें तो उतरला. त्याबरोबर

लोक त्याला येऊन मिळूं लागले. तो जसजसा पूर्वेकडे चाल करून येऊं लागला तसतशी त्याच्या अनुयायांची संख्या झपाट्यानें वाढत चालली. शेवटीं कर्नल चर्चिल हा जेम्सची कन्या ॲन हिच्यासह वुइल्यमला जाऊन मिळाला! तेव्हां मात्र जेम्स नरम आला आणि क्याथॉलिकांना काढून टाकून जुलमी कायदे रद्द करण्याच्या गोष्टी बोलूं लागला. पण हें 'वरातीमागून घोडें' या न्यायानें निष्फळ होतें. ॲन वुइल्यमला मिळाल्याचें कळतांच 'काय करावें माझीं मुलेंच मला सोडून चाललीं, आतां देवा, तुजवर माझा सर्व भार आहे' असें जेम्स बोलला. राणी नूतन बालकाला बरोबर घेऊन अगोदरच फ्रान्सांत निघून गेली होती. जेम्सनेंही घाबरून जाऊन तोच मार्ग स्वीकारिला. रात्रीं टेम्स नदी ओलांडित असतां त्यानें इंग्लंडचा बडा शिक्का ( great—seal ) नदींत टाकून दिला. या कृत्यानें कायदेशीर पार्लमेंट बोलावणें आपल्या शत्रूस अशक्य होईल अशी त्याची समजूत होती! तो जों किनाऱ्यावर पोंचतो तोंच एका कोळ्यानें त्यास पकडून लंडनला परत आणलें. जेम्स आयताच निघून जात असतां त्याला अडकावून ठेवून पुढील व्यवस्थेचें काम अवघड करण्याची वुइल्यमची बिलकुल इच्छा नव्हती. त्यानें जेम्सला पळून जाण्यास पुन्हां संधि दिली. तिचा उपयोग करून जेम्स फ्रान्सला पळून गेला, व तेथें चौदाव्या लुईच्या आश्रयास राहिला. नंतर वुइल्यमनें प्रमुख प्रमुख अशा सत्तर लोकांची सभा बोलावून पुढें काय करावयाचें याचा विचार चालविला. या सभेनें वुइल्यमला एक कन्व्हेंशन पार्लमेंट बोलाविण्याची सल्ला दिली. तीप्रमाणें ता. २२ जानेवारी १६८९ रोजीं ही कन्व्हेंशन पार्लमेंट भरली.

**३ कन्व्हेन्शन पार्लमेंट**—जेम्सनें राष्ट्राचे कायदे मोडल्यानें व राज्यकारभाराचा त्याग करून देश सोडून तो गेल्यानें त्याचा राज्यावरील हक्क जाऊन इंग्लंडचें सिंहासन रिक्त झालें आहे असा ठराव कॉमन्स सभेनें केला. परंतु लॉर्डांच्या सभेंत 'टोरी' पक्षाचें बहुमत असल्यामुळें 'इंग्लंडचें सिंहासन रिक्त झालें आहे' हे शब्द त्या सभेस मान्य होत ना. आर्च बिशप सॅन्क्रॉफ्ट व इतर पक्क्या टोरी लोकांचें असें मत होतें

कीं, जेम्स अकस्मात् राज्य सोडून गेला तरी तत्त्वतः तो गादीवर कायम आहे; याकरितां वुइल्यमला त्याचा प्रतिनिधी म्हणून राज्याधिकार द्यावा. डॅन्बीसारख्या उभयान्वयी लोकांचा विचार असा पडला कीं, जेम्सच्या राज्यत्यागामुळें त्याची वडील मुलगी मेरी ही गादीची मालक झालीच आहे, तरी तिच्या नांवानें द्वाही फिरवावी, आणि तिचा नवरा वुइल्यम यानें मुखत्यार म्हणून राज्यकारभार करावा. व्हिग पक्षाचें म्हणणें रिकाम्या झालेल्या गादीवर वुइल्यम व मेरी यांस बसवावें असें होतें. ही वाटाघाट वुइल्यमच्या कानीं पडतांच त्यानें चकचकित सांगितलें कीं, "मी कांहीं जेम्सचा प्रतिनिधी किंवा मेरी राणीचा मुखत्यार म्हणून राज्यकारभार करण्यास आलों नाहीं. तुमचा धर्म व तुमचें स्वातंत्र्य यांचें रक्षण करण्याकरितां तुम्हीच पाचारण केल्यावरून मी आलों." वुइल्यमचा हा निश्चय कळल्यावर टोरींनीं आपला हेका सोडिला व वुइल्यम व मेरी या दोघांस मिळून राजपद देण्याचा कॉमन्सचा मूळ ठराव पास केला. त्यांत पहिल्यानें दुसऱ्या जेम्सच्या जुलमी कृत्यांची याद देऊन तसें करणें बेकायदेशीर आहे असें म्हटलें होतें. नंतर राजपदाच्या व्यवस्थेचें कलम होतें. त्याप्रमाणें वुइल्यम व मेरी या दोघांना मिळून राजपद दिलें असून प्रत्यक्ष राज्यकारभार वुइल्यमचे हातीं रहावयाचा, त्या दोघांपैकीं मागून जिवंत रहाणाराकडे राजपद रहावयाचें, नंतर मेरीच्या अपत्यांस, त्यांच्या अभावीं राजकन्या ॲन व तिचीं अपत्यें यांस, व त्यांच्या अभावीं वुइल्यमला मेरी शिवाय इतर स्त्रीपासून झालेल्या अपत्यांस गादी मिळावयाची, अशी व्यवस्था होती. १३ फेब्रुवारी १६८९ रोजीं हा 'हक्कांचा खुलासा व राजपदव्यवस्था' करणारा ठराव वुइल्यम व मेरी यांना सादर करण्यांत आला, व त्यांनीं त्याचा साभार स्वीकार केला. अशा रीतीनें दुसऱ्या जेम्सनें केलेले अत्याचार आम्ही केव्हांही करणार नाहीं, अशी स्पष्ट कबुली देऊन तिसरा वुइल्यम आणि दुसरी मेरी हें जोडपें पार्ल-

---

१ दुसऱ्या जेम्सच्या तान्ह्या मुलाचें जन्मशुद्धत्व इतिहासकारांनीं कबूल केलें आहे; परंतु त्या वेळीं तें वादग्रस्त होतें.

मेंटच्या ठरावाच्या आधारावर सिंहासनारूढ झालें व इंग्लंडच्या इतिहासांतील ‘ सनदशीर युगास ’ आरंभ झाला. दुसरा जेम्स जाऊन त्याच्या जागीं तिसरा वुइल्यम व मेरी हें जोडपें राज्यावर आलें येवढेंच या वेळीं झालें नाहीं. राजसत्ता पार्लमेंटवर चालावी कां पार्लमेंटची हुकमत राजावर चालावी या प्रश्नाचें उत्तर या वेळीं पार्लमेंट वरिष्ठ असून राजानें तिचे हुकूम मान्य केले पाहिजेत, इतकेंच नव्हे तर राजा जो गादीवर येतो तो पार्लमेंटच्या संमतीनेंच येतो, असें देण्यांत आलें; आणि यापुढील इंग्लंडच्या गादीवर येणारा प्रत्येक राजा पार्लमेंटचा हुकूम मानीत आला आहे. नंतर कन्व्हेन्शन पार्लमेंटनें ‘ जरी आपली निवडणूक राजानें काढिलेल्या निमंत्रण-पत्रिकेवरून झाली नसली तरी हीच पार्लमेंट पक्की पार्लमेंट आहे ’ असा ठराव पुढें आणिला व त्याला या नव्या राजा-राणींची संमति मिळून तो पास झाला.

**४ तिजोरीवर सत्ता**—या पक्क्या पार्लमेंटनें राजसत्तेवर निर्बंध घालण्यासाठीं कित्येक कायदे ताबडतोब पास केले. त्यांपैकीं तिजोरीवर पार्लमेंटची सत्ता प्रस्थापित करण्याचा कायदा अत्यंत महत्त्वाचा होय. दुसरा चार्लस व दुसरा जेम्स यांना राज्यकारभाराचा खर्च भागविण्यास लागणारें उत्पन्न पार्लमेंटनें त्यांच्या कारकिर्दीच्या आरंभीं एकदम तोडून दिलें होतें. त्यामुळें ‘ नित्य ’ व्यवहार करतांना राजास पार्लमेंटची कांहींच फिकीर वाटत नसे. एकादें युद्धासारखें खर्चाचें ‘ नैमित्तिक ’ सदर निघावें, तेव्हां पार्लमेंटची राजास आठवण होई. या स्थितींत पालट पाडण्यासाठीं पार्लमेंटनें राजाच्या खर्चाचे १ खाजगी खर्च व २ सरकारी खर्च असे भाग पाडिले. एकंदर खर्चाकरितां दरसाल १२ लक्ष पौंड मंजूर केले. परंतु या रकमेपैकीं ७ लक्ष पौंड राजाच्या जमिनी, दारूवरील कर इत्यादि राजाच्या पूर्वोपार्जित सदरांतून उत्पन्न होत; तेव्हां हें त्याचें खाजगी उत्पन्न होय असें ठरवून त्याची त्यास हयातीपर्यंत ‘ नेमणूक[१] ’ करून देण्यांत आली. बाकीच्या ५ लक्ष रकमेची मात्र चार

१ या नेमणुकीसच इंग्रजींत ( Civil List ) म्हणतात. पहिल्यानें

( पुढील पानावर चालू ).

वर्षेपर्यंत मंजुरी दिली तेव्हां वुइल्यम रागावला. याचा परिणाम उलट होऊन पार्लमेंटनें यापुढें ' सरकारी खर्च ' एक वर्षपर्यंतच मंजूर करण्याची वहिवाट पाडिली. ती आजपर्यंत चालत आहे. वर्षांत काय खर्च लागेल याचें अंदाजपत्रक वर्षारंभीं पार्लमेंटपुढें मांडण्यांत येतें व तें पास झाल्यावर त्याबरहुकूम वर्षभर खर्च चालतो या पद्धतीनें पार्लमेंट ' नित्याची गोष्ट ' होऊन तिजशिवाय वर्षानुवर्ष राज्यकारभार चालविणें राजास अशक्य झालें. ' तिजोरीवरील सत्ता ' हें या अधिकारास नांव असून राजसत्तेवर पार्लमेंटनें जे इतर निर्बंध घातले त्यास हा अधिकार मूलाधार असल्यामुळें तो अत्यंत महत्त्वाचा आहे.

**५ धार्मिक सवलत**— स्टुअर्ट राजांनीं रोमन क्याथॉलिक पंथाची तळी उचलली होती तरी प्रॉटेस्टंट पंथांतील एपिस्कोपसी ( राजानें धर्माधिकारी नेमून धर्मविधी चालविण्याची पद्धती ) हून इतर जे पोटपंथ होते त्यांना कडक रीतीनेंच वागविलें ! या पार्लमेंटनें असल्या पंथांच्या लोकांना प्रार्थनेसाठीं एकत्र जमण्यास सवलत देणारा सवलतीचा कायदा ( Toleration act ) पास केला. या कायद्यांत दिलेल्या सवलतीपासून क्याथॉलिक व त्रयी न मानणारे वगळण्यांत आले होते. या नव्या राजाराणींची सत्ता आह्मांस मान्य आहे अशा अर्थाची शपथ प्रत्येक सरकारी नोकरानें घेण्याबद्दलचा कायदा (Act of Supremacy)

---

हींतूनच राजाच्या कायमच्या बिनलष्करी कामगारांचा पगार भागवीत. परंतु राजाच्या खाजगी नेमणुकींतून वास्तविकपणें सरकारी खर्च भागविण्याची पद्धति पुढें बंद पडली व राजाच्या उच्च पदास शोभेल अशा इतमामानें राहण्यास लागेल तेवढा खर्च करण्यास पुरेशी रक्कम ठरविली जाऊं लागली. नवा राजा गादीवर आला कीं, त्याच्या हयातीपर्यंतची ' वार्षिक नेमणूक ' पार्लमेंट मंजूर करते. बादशहा पांचवे जॉर्ज यांच्या खाजगी खर्चास ४ लक्ष ७० हजार पौंड वार्षिक नेमणूक मंजूर झाली आहे.

पास झाला; तेव्हां चारशें धर्माधिकाऱ्यांनीं शपथ न घेतां आपल्या जागा सोडिल्या.

**६ बंडाचा कायदा**—क्रॉम्वेलनें लष्करच्या जोरावर राज्यकारभार केला तेव्हांपासूनच खडी फौज ठेवण्याचा इंग्लंडांत प्रघात पडला. शिवाय पूर्वींप्रमाणें सरंजामी पद्धति अंमलांत नसल्यामुळें सरदार लोकांकडून लोकांचा भरणा होऊन आयत्या वेळीं फौज तयार होणेंही आतां शक्य नव्हतें. दुसऱ्या चार्लसनें खडी फौज ठेविली होती; पण ती थोडी होती. जेम्सनें मात्र मोठ्या प्रमाणावर खडी फौज ठेवून पार्लमेंटची सत्ता झुगारून देण्याचा प्रयत्न केला. तेव्हां पार्लमेंटनें बंडाचा कायदा( Mutiny Act ) करून सैन्यावर पार्लमेंटचीच हुकमत राहील अशी व्यवस्था केली. या कायद्यांत पुढील कलमें होतीं. १ खड्या फौजेवर बंडाचा कायदा पास झाल्यापासून वर्षभरच राजाचा अधिकार चालावा. २ सैन्याचा पगार द्यावयाचा तो पार्लमेंटचा वेळोवेळीं कायदा करून घेतल्याशिवाय देऊं नये, ३ सैन्यांत बंडावा झाल्यास त्याचा मोड दरसाल बंडाचा कायदा पास करून घेतल्याशिवाय करतां येऊं नये. यापुढें आजतागायत दरसाल हा बंडाचा कायदा पास होतो व त्यामुळेंच राजाची सैन्यावर हुकमत चालते.

**७ हक्कांची मंजुरी**—सरते शेवटीं कन्व्हेन्शन पार्लमेंटनें हक्कांचा जो खुलासा केला होता आणि जो वुइल्यम आणि मेरी यांनीं मान्य करण्याचें अभिवचन दिलें होतें त्यांतील सर्व हक्क एकत्र करून हक्कांची मंजुरी ( Bill of Rights ) हा महत्त्वाचा कायदा पास करण्यांत आला ( ९ आक्टोबर १६८९ ); त्यांत खालीलप्रमाणें मुख्य कलमें होतीं.

१ दुसऱ्या जेम्सप्रमाणें कायद्याची सूट देण्याचा अथवा व्यक्तीस माफी करण्याचा अधिकार राजानें उपयोगांत आणणें बेकायदेशीर आहे.

२ पार्लमेंटच्या संमतीशिवाय शांततेच्या वेळीं राजानें खडी फौज ठेवूं नये.

३ राजानें कोणताही कर पार्लमेंटच्या संमतीशिवाय प्रजेवर बसवूं नये.

४ आपलीं दुःखें नाहींशी करण्यासाठीं राजास अर्ज करण्याचा हक्क प्रजाजनांपैकीं प्रत्येकास आहे.

५ पार्लमेंटच्या सभासदांची निवडणूक होत असतां राजानें त्यांत ढवळाढवळ करूं नये.

६ पार्लमेंट सभा वारंवार बोलावण्यांत यावी आणि तिचे वादविवाद बिनहरकत चालावे.

७ कोणाही रोमन क्याथॉलिकास किंवा रोमन क्याथॉलिकाशीं विवाह करणाऱ्या व्यक्तीस इंग्लंडची गादी मिळूं नये.

वरील कलमांवरून हा कायदा किती महत्त्वाचा आहे हें तेव्हांच लक्षांत येतें. इंग्लंडांत आज जी लोकसत्ताक राज्यपद्धति चालू आहे तिचें नियम एके ठिकाणीं लिहिलेले असे नाहींत. पण १२१५ तील मॅग्नो-चार्टा, १६२८ तील पिटिशन ऑफ राइट आणि १६८९ तील बिल ऑफ राइट्स या तीन पायांच्या आधारावर सनदशीर इंग्रजी राज्याची दैदीप्यमान मूर्ति निर्भयपणानें उभी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रसिद्ध लॉर्ड चॅथम ( मोठा पिट ) यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, ' हे तीन कायदे म्हणजे इंग्लंडच्या इतिहासाचें बायबल ( श्रुति–ग्रंथ ) होय,

---

१ हेबिअस कॉर्पस ॲक्टमधील हक्क मॅग्ना चार्टांत गर्भित रीतीनें मान्य केलेले आहेत. बिल ऑफ राइट्सबरोबर १७०१ सालीं पास झालेला ॲक्ट ऑफ सेटलमेंट घ्यावा; म्हणजे इंग्लंडच्या राज्यपद्धतीस आधारभूत सर्व कायदे आले.

# ४१ जेम्सच्या साथीदारांचा मोड.



**१ ग्लेंकोमधील कत्तल**— इंग्लंडांत रक्ताचा एक थेंबही न सांडतां राज्यक्रांति झाली तरी स्कॉटलंड-आयर्लंडांत जेम्सच्या पक्षपाती लोकांनीं बंडाचीं निशाणें उभारलीं. स्कॉटलंडच्या उत्तर भागांतील डोंगरी मुलखांतील लोकांनीं व्हायकाउंट डंडी याच्या नेतृत्वाखालीं जेम्स-करितां शस्त्र उचललें; परंतु किलिक्रँकी येथील लढाईंत ( १६८९ ) डंडीच मारला गेल्यामुळें डोंगरी लोक पांगून गेले आणि नव्या राजाराणींची सत्ता मान्य असल्याची शपथ घेण्यास ते तयार झाले. हा शपथविधि १६९१ च्या डिसेंबरच्या ३१ तारखेच्या आंत केला पाहिजे असा जाहीर-नामा लागला. ग्लेंको दरींत राहणाऱ्या डोंगरी लोकांचा मुख्य वृद्ध मॅक आयन हा स्टुअर्ट घराण्याचा भक्त असल्यामुळें त्याच्या मनाची बराच वेळ चलबिचल चालली होती. पण शेवटीं त्यानें शपथ घेण्याचें ठरविलें. परंतु दिवस फार थोडे राहिले होते व ते थंडीचे दिवस असल्यामुळें त्याला शपथ घेण्याच्या ठिकाणीं पोंचण्यास पांच सहा दिवस उशीर झाला. तरी त्यानें शपथ घेतली व ती मंजूर झाली अशा समजुतीनें तो घरीं येऊन स्वस्थ होता. यावेळीं स्कॉटलंडचा कारभार मास्टर ऑफ स्टेअर याजकडे होता. त्याचा ग्लेंको दरींतील मॅक्डोनल्ड जातीवर दांत होता. तेव्हां मॅक आयनच्या या चुकीचा फायदा घेऊन त्या जातीचा संपूर्ण नायनाट करण्याचाच त्यानें व्यूह रचिला. मॅक आयनशिवाय इतरांनीं शपथा घेतल्या असें वुइल्यमला कळवून मॅक आयनचा राजद्रोहाबद्दल नाश करावा असा हुकूमही त्यानें मिळविला ! मग त्यानें 'मॅक्डोनल्ड'चे कट्टे शत्रु जे क्यॉम्प्बेल घराणें त्यांतील शिपायांची ग्लेंकोदरींत रवानगी केली. त्यांनीं मॅक आयनच्या घरीं दहा बारा दिवस यथेच्छ पाहुण-चार झोडला व मग एके दिवशीं रात्रीं अचानक यजमानाची व त्याच्या अनुयायांची कत्तल करण्याचा सपाटा चालविला. मॅक्डोनल्ड घराण्यांतील

मंडळी अगदीं भांबावून गेली व सैरावैरा पळत सुटली. परंतु 'क्याम्प्बेल' शिपायांनीं सर्व मार्ग रोखले असल्यामुळें त्यांना बाहेर पडणें अशक्य झालें; व प्रहराच्या आंत एकशेंवीस लोक ठार झाले. पुढें सुमारें एक वर्षपर्यंत ही ग्लेंकोंतील कत्तल गुतच राहिली. परंतु जेम्सच्या पक्षपाती लोकांनीं तो जगप्रसिद्ध केला. पहिल्यानें ती केवळ एक भाकडकथा आहे असें व लोकांस वाटलें; परंतु सरकारनें एक 'रॉयल कमिशन' नेमून चौकशी केली; तेव्हां या हकीकतीचा खरेपणा सिद्ध झाला. यावर वुइल्यमचें असें म्हणणें होतें कीं, आपल्याला खरा प्रकार माहीत नसल्यामुळें कामाच्या गर्दीत आपण कागदावर सही करून गेलों. परंतु ज्यांनीं हा अमानुष प्रकार केला त्यांना शिक्षा करण्याचें वुइल्यमनें मनावर घेतलें नाहीं; त्यामुळें वुइल्यमच्या कीर्तीवर हा डाग लागून राहिला आहे.

२ **आयर्लंडांत जेम्स**—स्कॉटलंडपेक्षां आयर्लंडांतील बंड जास्त मोठ्या प्रमाणावर होतें. एक तर तेथील बहुजन समाज रोमन क्याथॉलिक असल्यामुळें त्यास जेम्सचा अंमल मान्य होता. तो पळून जाऊन त्याचे जागीं वुइल्यम आल्याचें कळल्यावर आयर्लंडच्या उत्तरेकडील ज्या अल्स्टर परगण्यांत प्रॉटेस्टंट इंग्रजांची वसाहत होती तेवढा परगणा सोडून बाकीच्या आयरिश लोकांनीं त्याचा अंमल कबूल केला नाहीं. दुसरें असें कीं, जेम्सला आयरिश लोक आपणास खात्रीनें मिळतील असें वाटल्यावरून फ्रेंच राजा लुई याजकडून फौज व पैसे बरोबर घेऊन किन्सेल या बंदरांत येऊन तो स्वतः दाखल झाला ( १६८९ मार्च ). आयर्लंडचा क्याथॉलिक गव्हरनर टिरकॉनेल हाही त्यास मिळाला. व डब्लिन येथें त्यानें पार्लमेंट सुद्धां बोलाविली ! मग उत्तरेकडील प्रॉटेस्टंट इंग्रजांचा पाडाव करून इंग्रजी सत्तेचें आयर्लंडांतून अजीबात उच्चाटण करण्यासाठीं जेम्स सैन्यासह उत्तरेकडे गेला. लंडनडेरी हें एक इंग्रजांचें मुख्य ठाणें होतें. त्याला जेम्सनें वेढा घातला. चार महिनेपर्यंत हें वेढ्याचें काम चालून ८००० पर्यंत लोक रणांगणीं पडले. आंतल्या लोकांची अगदीं उपासमार होण्याची वेळ आली.

अन्नसंग्रह संपल्यानें त्यांनीं घोडे, कुत्रीं, मांजरें, घुशी, उंदीर, चरबी आणखी अखेर कोळसे सुद्धां खाल्ले; पण ते शरण आले नाहींत. अखेरीस तीन इंग्लिश गलबतें मोठ्या शिकस्तीनें वेढा फोडून नदीच्या मुखांतून बंदरांत शिरलीं आणि त्यांनीं त्या शहरास संकटसमयीं जीवनसाधनांचा पुरवठा केला. मग जेम्सनें मात्र निराश होऊन वेढा उठविला. एनिस्किलिन हेंही ठाणें याचप्रमाणें भांडलें व जेम्सच्या सैन्यास तें घेतां आलें नाहीं. मग जेम्स दक्षिणेकडे परत आला.

२ **लिमरिकचा तह**—१६९० च्या जून महिन्यांत वुइल्यम बेलफास्ट बंदरांत मोठ्या फौजेनिशीं उतरला, व डब्लिनवर चालून जाऊं लागला. जेम्सच्या सैन्याची व त्याची बॉइन नदीवर गांठ पडली. ड्रॉघेडाजवळ बॉइन नदीच्या दक्षिणेस मोठें तुंबळ युद्ध झालें. लढाई चालली असतां वुइल्यमला दुखापतही झाली; पण शेवटीं विजयश्री त्याच्याच बाजूला आली आणि जेम्स फजीत होऊन फ्रान्सांत पळून गेला. यापुढें पॅरिसजवळ सेंटजर्मेनमध्यें लुईचें पेन्शन खात आपल्या आयुष्याचे राहिलेले दिवस त्यानें घालविले. ही लढाई झाल्यावर आयरिशांचीं ठाणीं एकामागून एक सर करण्याचा वुइल्यमनें क्रम सुरू केला. लिमरिक हें त्यांच्या ताब्यांतील अखेरचें ठाणें होतें; त्यालाही वेढा बसला. लिमरिक किल्ल्यांत प्रसिद्ध आयरिश देशभक्त सार्सफील्ड हा होता, त्यानें सहा आठवडेपर्यंत किल्ला लढविला. नंतर १ क्याथॉलिक लोकांना चार्लसच्या कारकिर्दीतल्याप्रमाणें धर्मस्वातंत्र्य मिळेल, २ क्याथॉलिकांच्या जमिनी त्यांच्या त्यांजकडेच राहतील, ३ आणि ज्या कोणा क्याथॉलिक इसमास परदेशीं जाऊन रहावेंसें वाटत असेल त्यास परदेशीं जाण्यास परवानगी दिली जाईल, या अटींवर सार्सफील्डनें किल्ला स्वाधीन केला; आणि तो आपल्या बारा हजार अनुयायांसह फ्रान्सला निघून गेला. परंतु यापुढें लिमरीकच्या तहांतील अटी आयरिश लोकांच्या दुर्दैवामुळें पाळण्यात न येतां आयरिश लोकांचा छळ करण्यास सुरवात झाली. क्याथॉलिक लोकांची लाखों एकर जमीन जप्त करण्यांत येऊन

त्यांच्यापैकीं कोणीही शिक्षक, अज्ञानपालक किंवा वकील यांपैकीं कोणचाही धंदा करूं नये असा सक्त निर्बंध घालण्यांत आला. क्याथॉलिक व प्रॉटेस्टंट यांच्यामधील विवाह बेकायदेशीर ठरविण्यांत येऊन प्रॉटेस्टंट मनुष्याच्या जमिनीवर क्याथॉलिक मनुष्याचा वारसा कोणत्याही प्रकारें असूं नये व क्याथॉलिकांनीं शस्त्रें बाळगूं नयेत असाही कायदा पास झाला. या कडक निर्बंधांनीं क्याथॉलिक धर्म नाहींसा होईल अशी अधिकाऱ्यांची समजूत होती. परंतु तसें न होतां आयर्लंडांत आजही बहुजनसमाजाचा धर्म रोमन क्याथॉलिकच आहे !

**४ आरमारी युद्ध**—फ्रेंच राजा लुई यानें पॅलॅटिनेटवर हल्ला केल्यापासून ( १६८८ ) जर्मन लोक त्याच्याविरुद्ध अगदीं चिडून गेले. लवकरच इंग्लंड, हॉलंड, ऑस्ट्रिया, जर्मनी व स्पेन या सर्वांनीं मिळून फ्रान्सविरुद्ध एक संघ बनविला. इंग्लंड व हॉलंड यांस समुद्रावर चीत करण्याच्या हेतूनें लुईनें एक बडें आरमार तयार केलें. फ्रेंच ॲडमिरल टुर्व्हिल यानें सत्तर जहाजांनिशीं इंग्रज व डच या दोघांच्या मिळून छपन्न जहाजांच्या काफिल्याशीं ' बीची हेड ' नजीक लढाई दिली ( १६९० जून ३० ). इंग्रजांचे आरमारी अधिकारी कसलेले नव्हते व डच लोक जरी मोठया शौर्यानें लढले तरी फ्रेंचांचाच जय झाला. या जयानें फुगून जाऊन पन्नास जहाजांतून तीस हजार फ्रेंच सैन्य इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरवून दुसऱ्या जेम्सच्या वतीनें तेथें बंड उठविण्याची लुईनें तयारी केली. इंग्लिश खाडी मोकळी करण्याच्या उद्देशानें फ्रान्सच्या किनाऱ्यावर ला होगच्या नजीक असलेल्या इंग्लंड व डच यांच्या ९० जहाजांच्या संयुक्त आरमारावर टुर्व्हिलनें फिरून छापा घातला ( १६९२ मे ). पांच तासपर्यंत खूप निकराची लढाई झाली. शेवटीं फ्रेंचांचा पुरा मोड झाला. त्यांचीं तेरा जहाजें सेंट मेलोकडे गेलीं व बाविसांनीं चेरबुर्ग व ला होग येथील खाड्यांत तळ दिला; परंतु इंग्रजांनीं त्यांचा पाठलाग करून फ्रेंच सैन्याच्या डोळ्यांदेखत त्यांस आगी लावून त्यांचा फन्ना उडविला. या लढाईंत इंग्रजांचा मुख्य रसेल हा

असून तो अत्यंत शौर्यानें लढला. या जयानें दुसऱ्या जेम्सला गादीवर बसविण्याची कल्पना निष्फळ होऊन वुइल्यमच्या सत्तेस स्थैर्य आलेंच. परंतु त्याचा अत्यंत महत्त्वाचा परिणाम म्हटला म्हणजे फ्रेंचांच्या 'नाविक सत्तेस' असा जबर धक्का बसला कीं, पुनः जरी फ्रेंच आरमाराची दुरुस्ती झाली तरी टुर्व्हिलसारख्या कर्त्या पुरुषासही इंग्रज आरमाराशीं फिरून लढाई देण्याची छाती झाली नाहीं! चौदाव्या लुईच्या यशास उतरती कळा लागली व त्याच्या महत्त्वाकांक्षेस आळा घालून स्वसंरक्षण साधूं पाहणाऱ्या दोस्तांस धीर आला.

**५ जमिनीवरील युद्ध व तह**—याच वेळीं लुईची फौज फ्रान्सांतच अडकवून ठेवण्याची वुइल्यमनें युक्ति काढिली होती. त्यानें स्वतः हॉलंडांत उतरून फ्रेंचांशीं तेथें लढाई चालू ठेविली. त्याचे स्टीनकर्क येथें ( १६९२ आगष्ट ) व नीर्विन्डेन येथें ( १६९३ जुलै ) पराभव झाले. परंतु या दोन्ही लढायांत लुईच्या सैन्याचें इतकें कांहीं नुकसान झालें कीं, तह करणें बरें असें त्यास वाटूं लागलें. शेवटीं १६९५ मध्यें वुइल्यमनें नामूरचा किल्ला सर केला; तेव्हां मात्र लुईची चिंता अधिकच वाढली. आणखी दोन वर्षें लढाई चाललीच होती; पण आतां कांहीं लांबण लावण्यांत अर्थ नाहीं असें दोन्ही पक्षांस आढळून येऊन रिस्विक येथें तह ठरला ( सप्टेंबर १६९७ ). या तहांत फ्रान्स व इंग्लंड या दोघांमध्यें जीं कलमें होतीं त्यांपैकीं हें मुख्य होतें कीं, लुईनें वुइल्यम हा इंग्लंडचा राजा असल्याचें मान्य करावें व जेम्सला इंग्लंडच्या गादीवर बसविण्यासाठीं करण्यांत येणाऱ्या प्रयत्नास कोणत्याही प्रकारें साहाय्य न करण्याचें कबूल करावें.

**६ वुइल्यमची अप्रियता**—जेम्स जाऊन वुइल्यम गादीवर आल्यावर पहिल्या उसळीला जरी इंग्लंडांतील सर्व लोकांनीं वुइल्यमची तळी उचलून धरली होती तरी वुइल्यम परकीय असल्यामुळें व त्याचा स्वभाव थंड व गंभीर असल्यामुळें इंग्लंडांतील पुष्कळ लोकांनीं जेम्सला परत आणण्यासाठीं कट केले. कर्नल चर्चिल ( आतां मार्लबरो ) व आर-

मारावरचा मुख्य रसेल हे सुद्धां या कटांतून सामील होते. पुढें १६९४ त मेरी राणीही वारली. तेव्हां तर इंग्लिशांना वुइल्यमबद्दल स्वीयत्व वाटण्याचें कांहींच कारण राहिलें नाहीं. वुइल्यम इंग्लंडच्या राज्यकारभांत सर्व लक्ष घालतो म्हणून डचांस वैषम्य वाटे व तो डच सल्लागारांच्या मसलतीप्रमाणें चालतो म्हणून इंग्रज रुष्ट असत. कोणत्या इंग्रजावर विश्वास ठेवावा हेंच वुइल्यमला कळेना; कारण गॉडॉल्फिन, मार्लबरो व रसेल यांनींही जेम्सशीं गुप्त पत्रव्यवहार सुरू केल्याचें त्याच्या कानीं आलें! १६९६ सालीं तर वुइल्यमला ठार मारून जेम्सला पुन्हां गादीवर आणण्यासाठीं मोठा कट झाला. परंतु वुइल्यमच्या सुदैवानें तो वेळींच उघडकीस आला. तेव्हां राजनिष्ठेचें प्रदर्शन मोठ्या जंगी प्रमाणांत करण्यांत आलें. पार्लमेंटनें राजाचें जीवित-संरक्षण व्हावें, यासाठीं एक संरक्षक स्वयंसेवकमंडळ स्थापन केलें. कांहीं अंशीं लोकमतानें अशी उलट खाल्ल्यामुळें परंतु पुष्कळ अंशीं फ्रेंच राजा लुई यानें जेम्सला इंग्लंडचे गादीवर बसविण्याचा उद्योग सोडून दिल्यामुळें असले कट पुढें फारसे ऐकूं आले नाहींत.

---

# ४२ राज्यसुधारणा.



**१ कॉमन्सची अडचण**—वुइल्यम गादीवर आला त्या वेळीं जी क्रांति झाली तींत वरून दिसावयास जरी केवळ राजांची अदलाबदल झाली येवढाच फरक झाल्याचें दिसलें तरी वस्तुतः इंग्लंडच्या राज्यपद्धतींत तीमुळें अतिशय मोठा फरक झाला असें म्हणणें रास्त होय. वुइल्यम गादीवर आल्याबरोबर राष्ट्रांतील सर्व वसुलावर आपला ताबा असल्याचें लोकसभेनें जाहीर केलें; व या वसुलांतून सरकारी खर्च चालण्यासाठीं फक्त वर्षभर पुरतील अशाच 'देणग्या' देण्याचीही रीति त्यांनीं पाडिली. आतां पार्लमेंट न बोलावितां वर्षानुवर्ष राज्यकारभार

करीत राहणें राजास अशक्य झालें. शिवाय सैन्य व आरमार यांचाही ताबा पार्लमेंटनें आपल्याकडे ठेविला असल्यामुळें तर स्टुअर्ट राजांप्रमाणें सैन्याच्या जोरावर कायदा धाब्यावर बसविणेंही शक्य नव्हतें. अशा रीतीनें राज्यकारभारावर कॉमन्सची सत्ता बसली खरी; पण ती सत्ता प्रत्यक्ष अंमलांत कशी आणावयाची? राज्यकारभार चालविणारे प्रधान तर राजाच नेमीत असे; व प्रधान आपण राजाचे नोकर आहों, असें समजत असत. आतां हें खरें कीं, एकाद्या प्रधानानें दुर्वर्तन केल्यास कॉमन्स त्याची चौकशी करून त्यास शिक्षा करण्यास समर्थ असत. परंतु असा दुर्वर्तनी प्रधान काढून टाकल्यावर आपल्याला आवडता प्रधान नेमूनच त्याची जागा भरून काढण्याचें कोठें कॉमन्सच्या हातीं होतें? तेव्हां सरकारच्या कृत्यावर टीका करून अप्रत्यक्ष रीतीनें सरकारास आपल्या म्हणण्याप्रमाणें करण्यास भाग पाडावें येवढाच कॉमन्सचा अधिकार होता. अशा स्थितींत कॉमन्सच्या इच्छेप्रमाणें राज्यकारभार चालण्यास प्रत्यक्ष साधन नसल्यामुळें सरकार व कॉमन्स यांच्यामध्यें नेहमीं तेढ पडे. एकाद्या मनुष्याकडे केवळ टीका करून दोष दाखवावयाचे, येवढेंच काम असलें म्हणजे तो मग ज्या कांहीं सूचना करतो त्यांत व्यवहार्य किती आणि दिसण्यास उत्तम परंतु अव्यवहार्य असा भाग किती हें पाहण्याच्या भानगडींत कोणी पडत नाहीं; त्याप्रमाणेंच कॉमन्सची या वेळीं स्थिति होती. आपल्या सूचना प्रत्यक्ष अंमलांत यावयाच्या आहेत अशी जाणीव असल्यामुळें जबाबदार मनुष्य जशा व्यवहार्य व उपयुक्त सूचना करतो तशा त्यांच्या हातून होत नसल्यास काय नवल?

**२ एकपक्षाचें प्रधानमंडळ**— कॉमन्स ही एक टीकाकार सभा न बनतां प्रत्यक्ष सरकार बनण्यास काय तोड काढावी हा त्या वेळीं इंग्लिश राष्ट्रापुढें मोठा प्रश्न होता. हा प्रश्न अर्ल ऑफ सन्डर्लंड

---

१ हा दुसऱ्या जेम्सच्या वेळीं टोरी होता, पण आतां तो आपलें मत बदलून व्हिग बनला होता.

नांवाच्या हुशार मुत्सद्द्यानें सोडविला. त्यानें अशी सल्ला दिली कीं, ज्या पक्षाचें कॉमन्ससभेंत माताधिक्य असेल त्याच पक्षाचे पुढारी राजानें आपले प्रधान नेमावेत. अशा रीतीनें एकाच पक्षाचे प्रधान नेमले गेले म्हणजे राज्यकारभारांत एकसूत्रीपणा येईल; व कॉमन्स व सरकार यांचा जो नेहमीं तंटा चालतो तो कायमचा बंद होईल. ही संडलँडची सल्ला वुइल्यम अंमलांत आणण्यास नाखूषच होता. पहिल्यानें त्यानें आपले प्रधान टोरी व व्हिग या दोन्ही पक्षांतून नेमिलें होते; परंतु पुढें टोरी फ्रान्सशीं चालविलेल्या युद्धास विरोध करूं लागले. १६९४ सालीं मेरी वारल्यावर तर टोरी पक्ष वुइल्यमला जास्तच विरोध करूं लागला, व प्रधानमंडळांत भांडणें होऊं लागलीं. तेव्हां मात्र संडलँडचें म्हणणें मान्य करण्याचें वुइल्यमनें ठरविलें. त्यानें हळू हळू एक एक टोरी प्रधान काढून टाकून त्यांच्या जागीं 'व्हिग' नेमिले. अशा रीतीनें एक व्हिग प्रधानमंडळ ( whig Junto ) तयार झालें. ड्यूक ऑफ श्रूस्बरी हा सेक्रेटरी ऑफ स्टेट ( अन्तर्गत कार्यकारी मंत्री ) होता. सॉमर्स, रसेल व मॉंटेग हेही या मंडळांत होते. या पद्धतीनें प्रधान मंडळाच्या कृत्यांस एकसूत्रीपणा आला. यापूर्वीं जो तो प्रधान आपण राजाचे स्वतंत्र नोकर असें समजत असल्यामुळें इतर प्रधानांशीं एकोप्यानें काम करण्याची आपल्यावर जबाबदारी येते हें त्याच्या स्वप्नींही नसे. क्लॅरेंडन-सारखा एकादा कर्तृत्ववान प्रधान सर्वांवर छाप बसवून राज्यकारभारांत एकसूत्रपिणा आणी. परंतु क्लॅरेंडन गेला कीं एकसूत्रीपणाही त्याच्या-बरोबरच नाहींसा होई. परंतु आतां आपण एका पक्षाचे प्रतिनिधी-असून राज्यकारभार करीत आहों अशी प्रधानांत जागरूकता उत्पन्न झाली व तीमुळें सर्व प्रधान एकजुटीनें कारभार करूं लागले. शिवाय कॉमन्ससभेंतील बहुमतवाल्या पक्षाचें मूर्तिमंत सरकार बनावयाचें, अशी स्थिति झाल्यामुळें कॉमन्समध्यें सरकारास अनुकूल सभासद व प्रतिकूल सभासद असे दोन पक्ष पडून तेथील वादविवादास निराळाच कांहीं रंग येऊं लागला. हे नवे प्रधान कॉमन्स सभेंत आपलें बहुमत जेणेंकरून राहील त्याची काळजी वाहूं लागले. यामुळें प्रधान 'राजाचे नोकर'

असें नांवाचेच राहून कॉमन्ससभेचे ते खरेखुरे नोकर अशी स्थिति झाली. हा बदल पूर्णपणें होण्यास बराच काळ लागला; परंतु तो पूर्ण होऊन हल्लींची इंग्लिश राज्यपद्धति म्हणजे कॉमन्समधील बहुमतवाल्या पक्षाचे पुढारीच प्रधान नेमिले जावयाचे या तत्वाचें पक्क फळ होय !

**३ बँक ऑफ इंग्लंड व राष्ट्रीय कर्ज**—दुसरा चार्लस व दुसरा जेम्स यांस पुष्कळ पैसे पाहिजे असले म्हणजे निरनिराळ्या श्रीमंत सावकारांकडून ते पैसे उसने घेत. आतां कांहीं श्रीमंत भांडवलवाल्यांचें भांडवल एक करण्यांत येऊन ' बँक ऑफ इंग्लंड ' स्थापण्यांत आली ( १६९४ ). सरकारास दहा लाख पौंड कर्ज देण्याचें या पेढीनें कबूल केलें व त्याचा मोबदला म्हणून तिला कांहीं जादा हक्क देण्यांत आले. ही पेढी स्थापण्याचें श्रेय वुइल्यमच्या प्रधान मंडळांतील फडणीस मॉंटेग यास आहे. त्याचप्रमाणें आजपर्यंत निरनिराळ्या कारणांसाठीं काढलेलें कर्ज एक करून त्याला ' राष्ट्रीय कर्ज ' असें नांव द्यावें व त्याचा व्याजाचा दर दरसालास एकच ठरवून मुद्दलाची फेड सरकारला सवड होईल तेव्हां करावी. व्याज मात्र ठरलेल्या दरानें नियमितपणें देत जावें असें ठरलें. हाच इंग्लंडच्या राष्ट्रीय कर्जाचा ( National Debt ) आरंभ होय. या राष्ट्रीय कर्जाच्या व्यवस्थेनें वुइल्यम राजास स्थैर्य आलें. जेम्स परत आल्यास हें कर्ज तो कसचें परत देणार ? असें लोकांस वाटत असल्यामुळें स्वार्थाच्या दृष्टीनें लोकांस वुइल्यमचेंच राज्य हवेंसें वाटणें साहजिक झालें.

**४ नाण्याची शुद्धि**—एलिझबेथच्या वेळीं नाणीं पाडण्यांत येऊन नाण्याची खरी किंमत व छापील किंमत यांमध्यें मेळ बसविण्यांत आला होता. परंतु त्यानंतर आतां बराच काळ लोटला होता, त्यामुळें नाणीं बरींच झिजलीं होतीं. शिवाय त्या काळीं नाण्यांच्या कडा हल्लींप्रमाणें चरे पाडलेल्या नसून गुळगुळीत असत. त्यामुळें नाण्यांतून तुकडे कापून घेतले तरी तें समजणे कठीण होतें. व्यापारी लोक मोठमोठ्या देवं-

घेवी करतांना पैसे वजन करून घेत असल्यामुळें व्यापारास मोठाच प्रतिबंध होई. आपल्याकडील रुपयाची खरीखुरी किंमत दहा आणे असते. परंतु त्याची छापील किंमत सोळा आणे असते. त्याचप्रमाणें इंग्लंडची त्या वेळची चलनी नाण्यांची खरीखुरी किंमत छापील किंमतीपेक्षां फारच कमी होती. अर्थशास्त्रदृष्ट्या ही एक मोठी हानि होय असें असल्यामुळें १६९६ सालीं सरकारनें जुनीं नाणीं काढून टाकून टांकसाळींतून नवीं नाणीं पाडलीं व नाण्यावर छापलेली किंमत व त्याची खरी किंमत या जवळ जवळ सारख्या केल्या. या सुधारणेकरितां सरकारास १२ लक्ष पौंड कर्ज काढावें लागलें, व त्या कामास बँक ऑफ इंग्लंडचा पुष्कळ उपयोग झाला.

**५ पार्लमेंटचा काल**—१६४१ सालीं लाँग पार्लमेंटनें असा ठराव पास केला होता कीं, राजानें तीन वर्षांतून एकदां तरी पार्लमेंटची बैठक भरविलीच पाहिजे, व निदान तीन वर्षांनीं पार्लमेंटची नवी निवडणूक केली पाहिजे. परंतु १६६४ सालीं क्याव्हेलीयर पार्लमेंटनें तो कायदा रद्द केला. त्यामुळें एकदां निवडलेली पार्लमेंट किती काळ टिकावी याला कांहींच निर्बंध राहिला नाहीं. खुद्द क्याव्हेलियर पार्लमेंट अठरा वर्षें कायम होती. पार्लमेंट म्हणजे लोकमताची निदर्शक पाहिजे, या दृष्टीनें एकदां निवडलेली पार्लमेंट इतकीं वर्षें कायम ठेविणें अन्याय्य होतें. आतां आपलें प्रातिनिधिक स्वरूप शुद्ध राखण्यासाठीं पार्लमेंटनें असा कायदा केला कीं, निदान तीन वर्षांनीं पार्लमेंटची नवी निवडणूक व्हावयास पाहिजे ( १६९४ ). बंडाचा कायदा व तिजोरीवरील सत्ता या निर्बंधांनीं एक वर्षापेक्षां अधिक काळ पार्लमेंटशिवाय राज्यकारभार चालविणें अशक्य करून टाकिलें होतेंच. तथापि या कालनिर्बंधक कायद्यांत तीन वर्षांवर विगर पार्लमेंट राज्यकारभार चालवावयाचा नाहीं असें स्पष्ट कलम घालण्यांत आलें. या कायद्यांत पुढें १७१५ सालीं बदल होऊन एकाच पार्लमेंटची कमाल मर्यादा सात वर्षें ठरविण्यांत आली.

६ **मुद्रणस्वातंत्र्य**—दुसऱ्या चार्लसचे पुनरागमनानंतर छापखानेवाल्यांवर सक्त निर्बंध ठेविण्यासाठीं सरकारकडून लायसेन्स ( परवाना ) मिळविल्याशिवाय छापखानेवाल्यानें कोणतेंही कायद्यासंबंधीं, राजकीय, धार्मिक, अगर शास्त्रीय पुस्तक छापावयाचें नाहीं असा कायदा पार्लमेंटनें केला होता. त्या कायद्याची मुदत १६९५ सालीं संपली. तेव्हां त्या वेळच्या पार्लमेंटनें त्या कायद्याचें पुनरुज्जीवन करण्याचें नाकारिलें व अशा रीतीनें अप्रत्यक्षपणें मुद्रणस्वातंत्र्य मान्य केलें. तरी अद्यापि पार्लमेंटांत चाललेले वादविवाद छापणें मात्र बेकायदेशीर मानण्यांत येत होतें; व पार्लमेंटचे वादविवाद गुप्त ठेविणें हा एक त्या सभेचा विशेष आहे असें मानण्यांत येत असे.

७ **ॲक्ट ऑफ सेटलमेंट**—इ. स. १७०० च्या जुलैत मेरीची बहीण ॲन हिचा वारस असा एकुलता एक मुलगा मरण पावला. वुइल्यमलाही मूल नव्हतें. तेव्हां ॲनमागून राज्यास वारस कोण, हा प्रश्न उत्पन्न झाला. तेव्हां पार्लमेंटनें कायदा केला ( १७०१ ), व ॲनमागून पहिल्या जेम्सची नात सोफाया ( इलेक्ट्रेस ऑफ हॅनोव्हर ) व तिची **प्रॉटेस्टंट** संतति यांचा इंग्लंडच्या गादीवर वारसा चालावा असें ठरविलें. याच वारसा ठरविण्याच्या कायद्यांत राजसत्तेवर आणखी निर्बंध घालणारीं कलमें घातलीं होतीं; म्हणून त्यास 'हक्कांच्या मंजुरी'ची पुरवणी म्हणण्यास हरकत नाहीं.

( १ ) इंग्लंडच्या राजांनीं युरोपखंडांतील आपल्या जहागिरींचा तंटा भांडण्यासाठीं इंग्लंड देशास पार्लमेंटच्या संमतीशिवाय युद्धांत पाडूं नये. ( २ ) प्रधानाची चौकशी कामन्सनीं केली व लॉर्डांनीं त्यास शिक्षा दिली म्हणजे राजानें आपल्या क्षमा करण्याच्या हक्काचा उपयोग करून त्या प्रधानाची शिक्षा माफ करावयाची नाहीं. ( ३ ) न्यायाधीश एकदां नेमिले म्हणजे पार्लमेंटनें हरकत आणली नाहीं तर त्यांनीं हयातीपर्यंत आपल्या जागेवर राहावें. ( ४ ) ज्या लोकांनीं सरकारी चाकरी अगर पेन्शन पत्करिलें असेल त्यांस पार्लमेंटचे सभासद होण्याचा हक्क नसावा.

हें शेवटचें कलम पुढें सैल करण्यांत आलें. नवीन निर्माण केलेल्या जागा किंवा पेन्शनें ज्यांनीं स्वीकारलीं असतील त्यांसच हा निर्बंध लागू असावा असें ठरविण्यांत आलें; व जे लोक पार्लमेंटचे सभासद असतां नोकऱ्या स्वीकारितील त्यांचा सभासद होण्याचा हक्क अशा तऱ्हेनें नाहींसा झाला असतां मतदारसंघांस त्यांसच फिरून निवडून द्यावयाचें असलें तर त्यांस तसें करण्यास सवलत देण्यांत आली. न्यायाधिशांसंबंधानें तिसरें कलमही महत्त्वाचें आहे. न्यायाधिशांची बहाली-बडतर्फी राजाच्या हातीं असल्यास ते राजाचे मिंधे होऊन खरा न्याय देण्यास कसे कचरतात याचा अनुभव स्टुअर्ट राजांच्या काळीं पुरा आला होता. तेव्हां पार्लमेंटनें या कलमानें न्याय-देवतेस राजसत्तेच्या अंकितत्वापासून मोकळें केलें व लोकांस सरकारशीं विरोध असतांही शुद्ध न्याय मिळणें शक्य झालें.

---

# ४३ स्पॅनिश वारशाचें युद्ध.



**१ साम्राज्याकरितां झगडा**—१६८८ मध्यें तिसरा वुइल्यम गादीवर आला, तेव्हांपासून इंग्लंडच्या इतिहासांत एका नवीन कालविभागास सुरवात झाली. हा भाग १६८८ पासून १८१५ पर्यंत म्हणजे सुमारें सव्वाशें वर्षांचा आहे; यांत खुद्द इंग्लंडांत घडलेल्या गोष्टींस विशेष महत्त्व नसून इंग्लंडचें परराष्ट्रीय धोरण अत्यंत महत्त्वाचें आहे. अमेरिकेत इतर युरोपियन राष्ट्रांप्रमाणें इंग्लंडच्याही वसाहती होत्या. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत व्यापाराकरितां इंग्लंड व फ्रान्स ह्या दोन्ही राष्ट्रांचीं ठाणीं होतीं. इतर युरोपियन राष्ट्रें आतां मागें पडलीं असून

---

१ पार्लमेंटच्या ज्या सभासदाची प्रधानमंडळांत नेमणूक होते त्यास मतदारसंघाकडून पुनः निवडून येऊन आपलें सभासदत्व कायम ठेवण्यास या सवलतीचा उपयोग होतो.

फ्रान्स व इंग्लंड या दोघांचीच परदेशांतील व्यापाराकरितां व वसाहती-करितां विशेष धडपड होती. त्यामुळें त्या दोघांत चुरस लागणें अगदीं अपरिहार्य होतें. १६८८ पासून १८१५ पर्यंतचा अठराव्या शतकांतील इंग्लंडचा इतिहास म्हणजे या चुरशीचाच सविस्तर वृत्तांत होय. हा झगडा केवळ युरोपमध्यें सुरू नसून विशाल दर्या, अफाट अमेरिका व विस्तृत हिंदुस्थान हीं त्याचीं मुख्य क्षेत्रें होतीं. पण फ्रान्सनें व्यापार-संरक्षणाबरोबरच आपल्या पूर्व व ईशान्य सरहद्दीवरील देश पादाक्रान्त करून आपली सरहद्द पुढें ढकलण्याचीही कामगिरी ह्याच वेळीं अंगावर घेतली. तेव्हां दोहोंकडे शक्ति विभागल्यामुळें फ्रान्सला या झगड्यांत अपयश आलें. तथापि त्यानें इंग्लंडचा सूड उगविण्यास कमी केलें नाहीं. इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें अठराव्या शतकांत सहा सात युद्धें झालीं. त्यांचीं तात्कालिक कारणें निरनिराळीं असत. तथापि या सर्व युद्धांचें मुख्य कारण ही साम्राज्य–तृष्णा होय. तेव्हां हीं युद्धें म्हणजे एका शतसांवत्सरिक महायुद्धाचे केवळ भाग होत हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे, व हें युद्ध इंग्लंडच्या अठराव्या शतकांतील इतिहासाची मुख्य बाब असून इतर गोष्टी केवळ गौण आहेत हेंही मनांत वागविलें पाहिजे; म्हणजे दिशाभूल होण्याचा संभव नाहीं.

**२ स्पॅनिश राज्याचा वारसा**—स्पेनचा राजा दुसरा चार्लस हा मरावयास टेकला असून त्याला मुलगा नव्हता. त्याची वडील बहीण फ्रान्सचा राजा चौदावा लुई यास दिली होती. आणि तिचें लग्न होतांना तिच्या संततीचा स्पेनच्या गादीवर हक्क नाहीं असा ठराव झाला होता, तरी सोडचिठ्ठी बाजूस ठेवून चौदावा लुई स्पेनच्या गादीवर आपल्या कुटुंबांतील एकाद्या मुलास बसविण्यास सिद्ध होईल अशीं स्पष्ट चिन्हें होतीं. असें झालें तर फ्रेंच सत्तेची छाया केवळ स्पेनवर पडावयाची असें नसून स्पॅनिश नेदर्लंड्ससुद्धां (बेल्जम) फ्रान्सच्या छायेखालीं येऊन हॉलंडच्या स्वातंत्र्यावर गदा येण्याचा संभव होता. मिलन, नेपल्स व सिसिली हीं फ्रान्सला वश होऊन ऑस्ट्रियाच्या बादशहाचा इटली-वरील स्वामित्वासही धोका पोंचण्याचा त्यामुळें संभव होता. व सर्वांत

महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे स्पॅनिश अमेरिकेंत फ्रेंचांचा पाय घुसला म्हणजे इंग्रजांच्या तिकडील वसहतींस हटकून त्रास पोंचावयाचाच अशी भीति होती. एका इंग्रज वकिलानें लिहिलें आहे कीं, 'युरोपियन राजकारणी पुरुषांच्या मनोवृत्ती स्पॅनिश राजाच्या प्रकृतीवर अवलंबून आहेत. तो जरा जास्त अजारी म्हटलें, कीं झाले हे खिन्न, व त्याचा आजार कमी झाला कीं झाले हे प्रफुल्लित !'

**३ फारकत–पत्रें**––स्पॅनिश राज्यास आणखीही दोन वारस होते. एक ऑस्ट्रियाचा बादशहा लिओपोल्ड व दुसरा बव्हेरिया संस्थानचा अधिपति. आतां हें स्पेनचें सर्व राज्य यांपैकीं एकासच न मिळतां फ्रान्स व ऑस्ट्रिया येथील वारसांस थोडथोडे मुलुख देऊन मुख्य गादी बव्हेरियाच्या अधिपतीस मिळावी, म्हणजे युरोपियन राष्ट्रांतील कोणतेंही एक राष्ट्र डोईजड होणार नाहीं अशी वुइल्यमनें यावर मसलत काढिली. लुईसही ती मान्य झाली. मग फ्रान्स, ऑस्ट्रिया व इंग्लंड यांच्या संगनमतानें एक स्पॅनिश राज्याची वांटणी करणारें फारकतपत्र ठरलें. त्यांत फ्रेंच राजपुत्राच्या वांटणीला नेपल्स व सिसिली एवढेच प्रांत येणार असून बहुतेक सर्व घबाड बव्हेरियन वारसाला मिळावयाचें होतें; पण दुर्दैवानें तो संस्थानिक १७०० त वारला; व फारकत–पत्र फुकट गेलें. आतां दोघां हिस्सेदारांमध्येंच वांटणी करावयाची. तेव्हां फ्रेंच राजपुत्राच्या वांटणीला एक मिलन प्रांत अधिक आला आणि बाकीचें घबाड ऑस्ट्रियन बादशहाच्या दुसऱ्या मुलास मिळावें, असें दुसऱ्या फारकतपत्रांत ठरलें. हे सर्व बेत मरणाच्या दारीं बसलेल्या चार्लसला कळवायाचे नाहींत असा करार होता. परंतु सर्व बातमी चार्लसला कळेल अशी लुईनें व्यवस्था केली ! राजा चार्लस व स्पॅनिश प्रजा यांना जेव्हां आपल्या राज्याच्या या आगंतुकांनीं परभारें लावलेल्या विल्हेवाटीची बातमी समजली, तेव्हां त्यांना आश्चर्य वाटलें व संताप आला; व राजा चार्लस यानें आपल्या राज्याची वांटणी न करितां सर्वच राज्य फ्रेंच युवराजाचा दुसरा मुलगा फिलिप ऑफ अँजू यांस देण्यांत यावें असें

मृत्युपत्र करून ठेविलें व मग लवकरच तो मरण पावला ( १७०० ). त्याच्या मृत्यूची वार्ता कळतांच लुईनें फारकतपत्र गुंडाळून ठेवून चार्लसच्या मृत्युपत्रास अनुसरून आपला नातू फिलिप ऑफ अँजू यास मोठ्या इतमामानें स्पेन देशांत गादीचा स्वीकार करण्यासाठीं पाठवून दिलें. त्याला निरोप देतेवेळीं लुई बोलला " आतां स्पेन व फ्रान्स यांच्यामध्यें असलेला पिरिनीज पर्वत असून नसल्यासारखाच आहे. "

**४ वुइल्यमचा निश्चय**—आपण केलेली व्यवस्था फुकट जाऊन लुईनें आपलें वचन मोडून स्पेनवर आपल्या नातवाची रवानगी केली, हें पाहून वुइल्यमला मनस्वी राग आला. इतक्यांत आपल्या नातवाच्या वतीनें नेदर्लंडच्या दक्षिण सरहद्दीवरील कोटकिल्ले घेण्याचा उद्योग लुईनें आरंभल्याचीही बातमी येऊन धडकली. मग काय विचारितां ? आगींत तेल ओतल्याप्रमाणें झालें. पण १६९८ पासून पार्लमेंटांत टोरी पक्षाचीच सरशी असून राजानें शांततेचेंच धोरण स्वीकारावें असा तिचा हट्ट होता. शिवाय राष्ट्रीय कर्ज जास्त वाढूं नये या बुद्धीनें सैन्याची संख्या पार्लमेंटनें दहा हजारांवरून सात हजारांवर आणिली होती. वुइल्यम डच लोकांचें फाजील प्रस्थ वाढवितो अशा समजुतीनें तिनें असेंही ठरविलें कीं, सर्व सैनिक इंग्रजच पाहिजेत ! अशा तऱ्हेनें पार्लमेंट विरुद्ध असतां इंग्लंड, ऑस्ट्रिया व हॉलंड यांची जूट करून लुईशीं दोन हात करण्याचा आपला निश्चय त्यानें कायम केला ( १७०१ सप्टेंबर ७ ). या संघाचा असा हेतु जाहीर करण्यांत आला कीं, स्पॅनिश नेदर्लंड्स फ्रान्सच्या ताब्यांत जाऊं द्यावयाचीं नाहींत, स्पेनच्या ताब्यांतील इटलींतील मुलुख लिओपोल्डला मिळवून द्यावयाचे व पुढें स्पेन व फ्रान्स ह्या दोन्ही गाद्या एक होणार नाहींत अशी तजवीज करावयाची.

**५ इंग्लिशांचा उत्साह**—इतक्यांत सर्व इंग्रज राष्ट्रांत खळबळ उडून जाऊन तें मोठ्या उत्साहानें वुइल्यमला साह्य करण्यास तयार होण्याचा सुयोग घडून आला. तो असा; याच सुमारास दुसरा जेम्स

फ्रान्सांत मरण पावला आणि लुईनें त्याचा मुलगा जेम्स स्टुअर्ट यास 'तिसरा जेम्स' अशी पदवी देऊन तोच इंग्लंडचा खरा राजा होय असा पुकारा केला. त्यावरून मात्र इंग्रज लोकांत गडबड उडून जाऊन वुइल्यमबद्दल सहानुभूतीची जंगी लाट उसळली ! तिजपासून आपला फायदा करून घेण्यासाठीं चाणाक्ष वुइल्यमनें जुन्या पार्लमेंटास निरोप देऊन पार्लमेंटची नवी निवडणूक करविली. तींत वुइल्यमच्या अटकळीप्रमाणें व्हिग पक्षाचें मताधिक्य होऊन पार्लमेंट सभेनें त्याच्या लढाईच्या धोरणास दुजोरा दिला. तिनें फ्रेंच लोकांशीं युद्ध करण्यास लागेल तितकें सैन्य ठेवण्याची व लागेल तो खर्च करण्याची मंजुरी दिली.

**६ वुइल्यमचा मृत्यु**—परंतु इतका दुर्मिळ सुयोग जमून आला असतां दुर्दैवानें वुइल्यम एकाएकीं घोड्यावरून पडून मरण पावला ( १७०२ ), व त्याचे युद्धाचे बेत जेथल्या तेथेंच राहिले. वुइल्यम कांहींसा थंड स्वभावाचा व उदासीन मनोवृत्तीचा असल्यामुळें तो इंग्लंडांत फारसा लोकप्रिय झाला नाहीं हें खरें; तथापि त्याची चिकाटी, धैर्य व अश्रांत उद्योग हीं इतकीं कांहीं विलक्षण होतीं कीं, या गुणांच्या जोरावर लुईसारख्या बलाढ्य व कर्तृत्ववान् राजाशीं टक्कर देऊन त्याचे सर्व बेत त्यानें फिसकटून टाकिले ! प्रत्यक्ष रणांगणावर चपळाईचे डावपेंच करून आपल्याच बाजूस जय मिळविण्यांत जरी तो फारसा वाकबगार नसला तरी एकंदर युद्धाचें धोरण ठरवून युद्धप्रसंगाची रचना करण्यास व युद्धाच्या शेवटीं आपलीच बाजू यशस्वी करण्यास जें लष्करी धोरण (Strategy) लागतें तें त्याच्या ठायीं पूर्णपणें वसत होतें, असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं.

**७ मार्लबरो**—तिसरा वुइल्यम मरण पावतांच दुसऱ्या जेम्सची दुसरी मुलगी ॲन ही गादीवर आली. तिचें शिक्षण लंडनचा बिशप कॉम्प्टन याचे हाताखालीं झाल्यामुळें ती प्रॉटेस्टंट पंथाची पक्की अनुयायी बनून गेली होती. मार्लबरोची पत्नी सेरा जेनिंग्ज हिचा तिच्या मनावर लहानपणापासून पूर्ण पगडा बसला होता. तिच्याच सल्ल्यावरून ॲननें वुइल्यमनें केलेली राष्ट्रांची जूट कायम राखून फ्रान्सशीं युद्ध

चालू करण्याकरितां मार्लबरोची निवड केली. हा मार्लबरो ( चर्चिल ) दुसऱ्या जेम्सच्या कारकीर्दीत फितूर होऊन वुइल्यमला मिळाला व पुढें वुइल्यम गादीवर आल्यावर त्याच्या विरुद्धही जेम्सच्या वतीनें कारस्थानें करण्यास यानें सोडिलें नाहीं. परंतु या युद्धांत तो पडल्यावर त्याच्या हातून असला विश्वासघात झाल्याचें ऐकिवांत नाहीं. सेनापति या नात्यानें मात्र त्याच्या यशास तोडच नाहीं. फ्रेंच ग्रंथकार व्हालटेअरनें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, 'मार्लबरोनें जी जी लढाई दिली तींत त्याची फत्तेच झाली, आणि ज्या किल्याला त्यानें वेढा दिला तो किल्ला त्यानें घेतल्याशिवाय कधींही सोडिला नाहीं.' त्याचा सेनापतीला अवश्य असा एक मोठा गुण म्हटला म्हणजे चित्ताची स्थिरता हा होय. अगदीं लढाईच्या ऐन प्रसंगीं तोफांच्या धडाक्यांत, सैनिकांच्या हल्ल्यांत व कत्तलींत सुद्धां त्याचें डोकें इतकें शांत असे कीं, एकीकडे लढाईच्या हालचालीचे हुकुम सोडीत असतां तो आपल्या सरकाराकडे पाठवावयाचे अहवाल किंवा घरीं पत्नीला पाठवावयाचीं पत्रें लिहीत असे.

**८ संयुक्त पक्षाचे हेतु**—संयुक्त पक्षास ( इंग्लंडचे पक्षास ) पुढील गोष्टी साधावयाच्या होत्या. ( १ ) ऑस्ट्रियाचा आर्चड्यूक चार्लस यास स्पेनच्या गादीवर बसविणें. ( २ ) इटलींतील नेपल्स, सिसिली व मिलन हे स्पेननें जिंकलेले प्रांत परत मिळविणें. ( ३ ) ऱ्हाईन नदीवरील लुईनें जिंकलेलें स्पॅनिश नेदर्लंड्स सोडविणें, हॉलंडचें संरक्षण करणें, व जर्मनी हा रणभूमीचा पाया करून फ्रान्सच्या मध्यावर हल्ले चढविणें. ( ४ ) युरोपच्या बाहेर फ्रान्स व स्पेन यांच्या वसाहतींवर हल्ले करून त्याही घेणें.

**९ ब्लेनहीम**—पहिल्यानें मार्लबरोनें हॉलंडची बाजू मजबूत करण्याचें ठरवून लुईनें घेतलेल्या नेदर्लंड्स मधील किल्ल्यांपैकीं पांच किल्ले हल्ला चढवून घेतले ( १७०२–३ ). या अर्ल ऑफ मार्लबरोच्या कृत्यांनीं संतुष्ट होऊन ॲननें त्यास ड्यूक ऑफ मार्लबरो ही बहुमानाची पदवी दिली. १७०४ सालीं लुईनें बव्हेरियाच्या राजास आपला दोस्त

करून घेतलें; व त्याच्या साहाय्यानें एकदम ऑस्ट्रियाच्या राजधानीवर चालून जाण्याचा लुईचा डाव होता. परंतु एकाएकीं रणभूमि बदलून ऱ्हाईन नदीच्या तीरानें पुढें येत येत मार्लबरो बव्हेरियामध्यें अचानक येऊन दाखल झाला. मग ब्लेन्हीम या खेड्यानजीक मार्लबरो व जर्मन जनरल युजीन हे एका बाजूला व फ्रेंच दुसऱ्या बाजूला असें होऊन दोहों पक्षांत मोठेंच रणकंदन झालें. त्यांत फ्रेंचांचा पूर्ण पराजय झाला. ही मार्लबरोची कामगिरी इंग्लिश राष्ट्रास इतकी पसंत पडली कीं, पार्लमेंटनें राजाची वुडस्टॉक येथील पुरातन शेतीवाडी मार्लबरोस देऊन तेथें ' ब्लेन्हीम ' नांवाचा एक टोलेजंग राजवाडा सार्वजनिक खर्चानें त्यास बांधून दिला !

१० **युद्धाचा वृत्तांत**—या युद्धास लुईची महत्त्वाकांक्षा हें एक कारण होतेंच. परंतु इंग्लंड व फ्रान्स यांमध्यें विशेष तेढ उत्पन्न होण्यास दुसरेंही एक कारण होतें. इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही देशांच्या अमेरिका खंडांत वसाहती होत्या व हिंदुस्थानांतील बरींच ठिकाणें त्यांच्या ताब्यांत होतीं. आपल्या वसाहतींशीं चाललेला व्यापार इंग्लिश जहाजांतूनच चालावा याविषयीं इंग्रज दक्ष होते. त्याचा परिणाम असा झाला कीं, नौकाबांधणी व नौकानयन या दोन्ही कलांस अतीशय उत्तेजन मिळून फारच मोठ्या प्रमाणावर हे धंदे इंग्लंडांत चालू लागले. इ. स. १६८८ च्या नंतर इंग्लंडच्या परराष्ट्रीय धोरणांत हा जगांतील व्यापार आपल्या ताब्यांत कसा राहील या प्रश्नास अग्रस्थान मिळालें होतें. तेव्हां या स्पॅनिश वारशाच्या युद्धांत या धोरणास अनुसरूनच इंग्लंडचें वर्तन होतें. या युद्धांत जिब्रॉल्टर ( १७०४ ), मिनोर्का ( १७०८ ), व नोव्हास्कोशिया ( १७११ ) हीं महत्त्वाचीं ठिकाणें इंग्रजांनीं घेतलीं. जिब्रॉल्टरचा जंजिरा स्पेनच्या नैर्ऋत्येस आहे. तेव्हां तेथून स्पेनवर हल्ला करणें सुलभ झालें. पण इंग्रजांच्या ताब्यांतील अत्यंत महत्त्वाच्या ठिकाणांमध्यें जिब्राल्टरची गणना होते, त्याचें कारण निराळेंच आहे. तें हें कीं, अॅटलँटिक महासागरांतून भूमध्य समुद्रांत शिरण्याची जागा या किल्ल्याच्या माऱ्यांत आहे. यावरून जिब्रॉल्टरला ' भूमध्य समुद्राची

किल्ली ' म्हणतात. १७०४ नंतर नेदर्लँड्समध्यें रॅमेलीज ( १७०६ ), औडेनार्ड ( १७ ८ ), मॅल्पॅक्वेट ( १७०९ ) टूर्नें, मॉन्स येथें लागोपाठ लढाया देऊन मार्लबरो फ्रेंच राजधानीवर चालून जाऊं लागला. लुई एकसारखा तह करण्यासाठीं बोलणीं करीत होता, परंतु संयुक्तांचा त्याला धुळीस मिळविण्याचा विचार असल्यामुळें त्यांनीं त्याचीं तहाचीं बोलणीं ऐकलीं नाहींत.

११ **युट्रेचचा तह**—याच सुमारास जर्मन बादशहा जोसेफ वारला ( १७११ ), व स्पेनचें राज्य ज्याला मिळावें म्हणून संयुक्त झगडत होते तो चार्लस बादशाही गादीवर आला. तेव्हां फ्रान्स व स्पेन एकाच्या हाताखालीं येऊन फ्रान्स डोईजड होऊं नये म्हणून जे दोस्त झगडत होते ते यशस्वी झाले तरी फ्रान्सचे जागीं जर्मन बादशहा सहावा चार्लस याच्या हाताखालीं स्पेन व जर्मनी एकवटून तो डोईजड होण्याची आपत्ति आतां उत्पन्न झाली. त्यामुळें दोस्तांपैकीं इंग्लंड व हॉलंड हीं राष्ट्रें आतां अंग चोरून काम करूं लागलीं. शिवाय या वेळीं इंग्लंडांत टोरीपक्षाचीच सरशी झाली होती व तो पक्ष तर लढाईस अगदी विरुद्ध असून मार्लबरोविरुद्ध त्या पक्षानें सारखी ओरड चालविली होती. शेवटीं मार्लबरोस सेनापतिपदावरून काढून टाकण्यांत आलें. सैन्याच्या खर्चाकरितां जे मक्ते देण्यांत येतात त्यांतून आपणांस पैसे खावयास सांपडतात व लढाई जिंकली म्हणजे चहूंकडे आपला बडेजाव होतो या स्वार्थपर हेतूनेंच तो लढाईची लांबवण लावीत आहे असा आरोप ठेवून कॉमन्सनीं त्यास दोषी ठरविलें. टोरी प्रधानांनीं लुईशीं बोलणीं सुरू करून युट्रेचचा तह घडवून आणिला ( १७१३ ). या तहांत लुईनें ॲन राणी व तिच्या मागून पार्लमेंटनें ठरविलेल्या सोफाया व तिची संतती या प्रॉटेस्टंट वारसांचा इंग्लंडच्या गादीवरील हक्क मान्य केला. दुसऱ्या जेम्सचा मुलगा जेम्स यास फ्रान्सांतून हाकून देण्याचें

१ याला व्हिग लोक तोतया म्हणत व जॅकोबाइट ( स्टुअर्ट घराण्याचे पक्षपाती ) तिसरा जेम्स ही पदवी लावीत. टोरी पक्षांत जॅकोबाइटांचा भरणा होता.

लुईनें कबूल केलें व त्यास यापुढें मदत न करण्याचेंही मान्य केलें. इंग्लंडनेंही फिलिप ऑफ अॅन्जूचा स्पेनच्या गादीवरील हक्क मान्य केला. मात्र स्पेन व फ्रान्स या दोन्ही गाद्या एक न व्हाव्यात म्हणून फिलिप व त्याचे वंशज यांनीं फ्रेंच गादीवरील आपले हक्क अजीबात सोडण्याची शर्त फिलिपनें कबूल केली. इंग्लंडला फ्रेंचांपासून अमेरिकेंत न्यूफौंडलँड व नोव्हास्कोशिया मिळालीं, व युरोपांत जिब्रॉल्टर व मिनोर्का हीं स्थळें स्पेनपासून मिळालीं व त्यायोगें इंग्रजांचा भूमध्य समुद्रांतील संचार भक्कम आधारावर प्रस्थापित झाला. याशिवाय स्पॅनिश अमेरिकन वसाहतींस 'निग्रो' गुलामांचा पुरवठा करण्याचा मक्ता मिळाला, व दरसाल एक जहाज पाठवून स्पॅनिश अमेरिकेशीं व्यापार करण्याची परवानगी मिळाली. जर्मन बादशहाला नेपल्स, मिलन, सार्डिनिया व नेदर्लँड्स मिळालीं, आणि ड्यूक ऑफ सॅव्हायला सिसिली बेट मिळालें.

---

# ४३ व्हिग कां टोरी ?



**१ अॅनचीं टोरी मतें**—अॅन राणी १७०२ मध्यें गादीवर आली. तिची बुद्धि फारशी तीव्र नसून तिच्यांत आपल्या बापापासून हट्ट मात्र चांगलाच उतरला होता, तरी ती बरीच समजूतदार होती. लहानपणापासून टोरी लोकांचाच सहवास तीस घडल्यामुळें ती मतानें पक्की टोरी झाली होती. राजकीय व्यवहारांत जुनें कायम राहून होईल तितकें करून लोकपक्षाचे अधिकार आणखी वाढूं नयेत असें टोरी लोकांचें सामान्य मत अॅननें पूर्णपणें स्वीकारलें होतें. धार्मिक बाबतींतसुद्धां प्रस्थापित धर्माचीं बंधनें होतील तितकीं कडक करावींत व व्यक्तीस धर्मस्वातंत्र्य होईल तितकें कमा ठवावें हें टोरी लोकांचें मत असे. त्यांस उत्कट धर्माभिमानी ( High church ) म्हणत. राणी याच मताची होती. व्हिग लोकांचीं मतें याच्या उलट असत. राजकारणांत काय किंवा

धार्मिक बाबतींत काय सवलतीचें धोरण स्वीकारावें असें त्यांचें म्हणणें असे. ॲन राज्य करूं लागली तेव्हां प्रधान मंडळांत टोरी लोकांचीच सरशी होती. परंतु टोरी लोक मार्लबरोनें चालविलेल्या युद्धाच्या उलट जाऊं लागल्यामुळें, मार्लबरो टोरी होता तरी प्रधानमंडळांत हळू हळू त्यानें व्हिग मंडळी लढाईला अनुकूळ असल्यामुळें त्यांचाच भरणा करण्याचें धोरण स्वीकारलें. त्याची बायको राणीची दोस्त असल्यामुळें तिच्या वतीनें आपले बेत मार्लबरो अंमलांत आणीत असे. अशा तऱ्हेनें शेवटीं १७०८ मध्यें प्रधानमंडळ पूर्णपणें व्हिग बनलें. राणीला व्हिग लोकांच्या हातीं सत्ता जाणें अगदीं आवडत नसे; परंतु मार्लबरोची पत्नी ( सेरा जेनिंग्ज ) हिच्या आग्रहामुळें ती त्यांना अधिकारारूढ करण्यास कबूल झाली होती; परंतु पुढें राणीची सेरा जेनिंग्जवरची मर्जी उडून दुसऱ्याच एका मिसेस हिल नांवाच्या बाईच्या कलाप्रमाणें ती चालूं लागली. ही हिलबाई मिसेस मॅशॅम म्हणून पुढें प्रसिद्धीस आली. हिचें टोरी पक्षाचा पुढारी हार्ले याशीं नातें असून चांगलें दळणवळण होतें. राणीला व्हिगपक्ष नकोसा होतांच या बाईनें टोरी पक्षासच अधिकारावर आणणें इष्ट आहे असें राणीच्या मनांत भरविलें. इतक्यांत व्हिग प्रधानमंडळाच्या हातून एक चूक होऊन राणीला व्हिग प्रधान मंडळीस रजा देऊन त्यांच्या जागीं टोरी निवडण्याची आयतीच संधि मिळाली.

**२ साशेव्हरेलवरील खटला**—डॉ. साशेव्हरेल नांवाच्या एका धर्माधिकाऱ्यानें ' सेंट पॉल्स ' क्याथीड्रलमध्यें एक व्याख्यान दिलें. त्यांत राजास कोणत्याही प्रसंगीं नमूनच वागलें पाहिजे असें प्रतिपादन करून नुकत्याच झालेल्या राज्यक्रांतीच्या विरुद्ध बरेच अक्षम्य उद्गार त्यानें काढिले. क्रांतीनंतर लवकरच प्रस्थापित धर्मपंथाहून इतर पंथांच्या लोकांस सवलतीनें वागविण्याचा एक कायदा (Toleration Act) झाला होता. त्यानें या तत्त्वाचा जोरानें निषेध करून अधिकारारूढ व्हिग प्रधानमंडळावर बरीच टीका केली; त्यांतल्या त्यांत लॉर्ड हाय ट्रेझरर ( खजि-

जदार ) गॉडॉल्फिन याच्यावर तर त्यानें शिव्यांचा भडिमारच केला ( १७०९ नवंबर ५ ). हें व्याख्यान पुढें प्रसिद्ध करण्यांत आलें; तेव्हां तर व्हिग प्रधानमंडळास इतका संताप आला कीं, त्यांनीं साशेव्हरेलवर फिर्याद करून त्याची लार्डांच्या सभेपुढें चौकशी सुरू केली. टोरी पक्षाच्या पुढाऱ्यांनीं हा खटला म्हणजे आपल्या पक्षाची बदनामी आहे, असें लोकांस सांगून लोकमत बरेंच प्रक्षुब्ध करून सोडिलें. तें इतकें कीं, साशेव्हरेलचा खटला तीन आठवडेपर्यंत चालला होता. तोंपर्यंत दररोज साशेव्हरेलबरोबर हजारों लोक कोर्टाकडे त्यास पोंचवावयास जात. राणीसुद्धा हा खटला ऐकण्यास जात असे. तेव्हां वाटेनें " राणीचा व साशेव्हरेलचा जयजयकार असो " अशा आरोळ्या उठत ! शेवटीं साशेव्हरेलला दोषी ठरविण्यांत आलें. तीन वर्षेपर्यंत त्यानें पुराण सांगू नये असें ठरविण्यांत येऊन त्याचीं पूर्वीं छापलेलीं व्याख्यानांचीं पुस्तकें जाळून टाकण्यांत आलीं. परंतु ही शिक्षा इतकी थोडी होती कीं, त्याच्या अनुयायांनीं आपला जय झाला या समजुतीनें दीपोत्सव केले व आनंदसूचक होळ्या केल्या !

**३ टोरी मताची सरशी**—ॲन राणी याच गोष्टीची वाट पहात होती. तिनें व्हिग प्रधानांस रजा देऊन टोरी प्रधानमंडळ नेमिलें ( १७१० ). त्यांत हार्ले व सेंट जॉन ( लॉर्ड बोलिंगब्राक ) हे मुख्य होते. नवीन पार्लमेंटमध्येंही टोरी पक्षाचेंच मताधिक्य होतें. पुष्कळ सरकारी नोकर टेस्ट ॲक्टप्रमाणें प्रस्थापित धर्माचे आपण अनुयायी असल्याची शपथ घेत व प्रस्थापित धर्माच्या देवळांत वर्षांतून एकदा प्रभुभोजन करीत; पण नतर नेहमीं आपल्या मताप्रमाणें प्रार्थना चालविणाऱ्या धर्ममंदिरांत प्रार्थना करावयास जात. टोरी लोकांना प्रस्थापित धर्माचीं बंधनें घट्ट करावयाचीं असल्यामुळें त्यांनीं अशा तऱ्हेनें केवळ प्रासंगिक अनुमति दर्शविणाऱ्या लोकांस नोकरीवरून काढून टाकण्यांत यावें व जबर दंड ठोठावण्यांत यावे, असें बिल (Occasional Conformity Bill ) पास केलें ( १७११ ). त्याचप्रमाणे सर्व शाळामास्तर प्रस्थापित

धर्मांचे पाहिजेत असाही कायदा (SchismAct) पास झाला (१७१४). पुढील कारकिर्दींत हे दोन्ही कायदे रद्द करण्यांत आले (१७१८).

**४ बारा नवे लार्ड ( १७१२ )**—हें जें टोरी प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें त्यास युद्ध केव्हां एकदा संपतें असें झालें होतें. कॉमन्ससभेचें बहुमत त्यास अनुकूळ होतेंच. परंतु लॉर्डांच्या सभेंत मात्र शांततेचें धोरण स्वीकारावें या मतास पुरेशीं अनुकूळ मतें नव्हतीं. हार्लेनें राणीस लॉर्डांच्या सभेंत कायमचें मताधिक्य संपादन करण्याचा मार्ग सुचविला. बारा नवे लॉर्ड बनवावे, म्हणजे आपल्या सूचना लोकसभेप्रमाणेंच लॉर्डांच्या सभेंतही पसार होऊन आपणास लढाई बंद करतां येईल अशी ही युक्ति होती. राणीस ती पसंत पडून तिनें लागलीच बारा नवे उमराव बनविले ( १७१२ ). यांत हार्लेनें स्वार्थाकडे पाहूनच जरी हा मार्ग सुचविला असला तरी इंग्लंडच्या सनदशीर राज्यपद्धतीच्या इतिहासांत या कृतीनें एक मोठें तत्त्व अन्तर्भूत झालें आहे. कॉमन्सना एकादें बिल मान्य असलें व लार्ड्समध्यें मताची कमतरता पडल्यामुळें ते त्या सभेंत पास होणें अशक्य होईल तर नवे लार्ड बनवून राजास लॉर्डांच्या सभेंत त्या बिलास पुरेशीं अनुकूळ मतें मिळवून तें पास होण्याची व्यवस्था करतां येते; यावरून इंग्लंडच्या राज्यपद्धतींत कॉमन्ससभाच सर्वश्रेष्ठ होय हें कायमचें ठरून गेलें.

**५ ॲनचा मृत्यु**—यानंतर बोलिंगब्रोक हा ॲनच्या मागून जेम्सच्या मुलास गादीवर आणण्याची खटपट करूं लागला. त्यानें सरकारी जागांवर जॅकोबाइट लोक नेमण्यास सुरवात केली. परंतु या कामीं त्याचा मित्र हार्ले ( अर्ल ऑफ ऑक्सफर्ड ) हा त्यास साहाय्य करीना. २७ जुलै १७१४ रोजीं रात्रीं या बाबतींत राणी ॲन ही आजारी असतां तिच्या खोलींत या दोघा मुत्सद्यांचा मोठा तंटा झाला. ॲननें त्या वेळीं बोलिंगब्रोकचा पक्ष उचलून धरला व हार्लेस कामावरून दूर केलें. ३० जुलैस राणीचा आजार विकोपास जाऊन ती बेशुद्ध झाली. त्या वेळीं बोलिंगब्रोकनें मंत्र्यांची सभा बोलाविली. तींत श्रूस्बरी होता. हा पूर्वीं

व्हिग होता, पण अलीकडे टोरी प्रधानमंडळांत काम करीत असे. त्याच्याशीं अंतस्थ सूत्र बांधून, डयूक ऑफ सॉमर्सेट व अर्गाइल हे मंत्र्यांच्या सभेंत एकदम गेले व आपण प्रिव्ही कौन्सिलचे सभासद असल्यानें मंत्रिसभेस बसण्यास आपणांस हक्क आहे असा हट्ट धरून बसले. श्रूस्बरीनें त्यांच्या म्हणण्यास दुजोरा दिला व त्यांनीं श्रूस्बरीस मुख्य प्रधान (ट्रेझरर) करण्याबद्दल सूचना केली. लागलीच मृत्युमुखीं पडलेल्या राणीच्या हातून त्या पदाचा दंड श्रूस्बरीच्या हातीं देण्यांत आला. मग आगस्टच्या १ तारखेस राणी वारली. मंगळवारीं हार्ले कामावरून गेला; शुक्रवारीं श्रूस्बरी रुजू झाला; रविवारीं राणी वारली. अशा रीतीनें प्रसंग अतिशय भराभर व अकल्पित घडून आले व बोलिंगब्रोकचे बेत सपशेल फसले ! ! तेव्हां श्रूस्बरीनें १७०१ सालीं पास झालेल्या कायद्यास अनुसरून सोफायाचा प्रॉटेस्टंट मुलगा जॉर्ज ऑफ हॅनोव्हर याच्या नांवानें द्वाही फिरविली.

**६ दोन पार्लमेंटांचें ऐक्य ( १७०७ )**—इंग्लंड व स्कॉटलंड देशाचे राजे पहिल्या जेम्स या राजापासून एक झाले; तरी पण त्यांच्या पार्लमेंट सभा निरनिराळ्याच होत्या. वुइल्यमच्या कारकीर्दींत इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीप्रमाणें आपणही एक कंपनी स्थापून व्यापार करावा व अमेरिकेंत वसाहत करावी, अशी कल्पना कांहीं स्कॉच लोकांच्या मनांत आली आणि उत्तर व दक्षिण अमेरिकेस जोडणाऱ्या संयोगीभूमीवर ही वसाहत स्थापण्याचा प्रयत्न करण्यांत आला. परंतु त्याला ईस्ट इंडिया कंपनी, डच व स्पॅनिश लोक यांनीं हरकत केल्यामुळें व कांहीं नैसर्गिक अडचणींमुळें हा वसाहतीचा बेत फसला. यांत इंग्रज लोकांच्या स्वार्थसाधुत्वाचा स्कॉटिश पार्लमेंटच्या सभासदास राग आला. त्यावरून १७०३ मध्यें स्कॉच पार्लमेंटनें ठराव केला कीं, व्यापार आणि नौकानयन या बाबतींत स्कॉच लोकांना इंग्रजांचे बरोबरीनें हक्क मिळाल्याखेरीज ॲन राणीच्या पश्चात् होणाऱ्या इंग्लंडच्या राजाचा हक्क स्कॉटलंडनें कबूल करूं नये. या ठरावाला पुष्टी देण्याकरितां स्कॉच लोकांनीं कवायती सैन्य तयार करण्यास प्रारंभ केला. इतक्या थराला गोष्टी गेल्या तेव्हां इंग्लिश

मुत्सद्यांनीं उभय पक्षांची एक कमिटी नेमिली. त्या कमिटीनें स्कॉच व इंग्रज पार्लमेंट एक करून दोन्ही देशांचा एकजीव करण्याची शिफारस केली. मग एकीकरणाचा ठराव दोन्ही पार्लमेंटांत पास झाला (१७०७). त्यांत पुढील शर्ती होत्या. (१) इंग्लंड व स्कॉटलंड हे दोन्ही देश मिळून एक देश मानण्यांत यावा आणि त्याला ग्रेट ब्रिटन असें नांव द्यावें. इंग्रज साधु जॉर्ज याचा तांबडा क्रॉस, व स्कॉच साधु ॲण्ड्र्यू याचा पांढरा क्रॉस यांचा मिलाफ करून या संयुक्त देशाचें निशाण 'यूनियन जॅक' बनविण्यांत यावें. (२) ॲनच्या पश्चात सोफाया ऑफ हॅनोव्हर व तिचे प्रॉटेस्टंट वारस यांनीं ग्रेट ब्रिटनवर राज्य करावें. (३) खुष्कीवरील व दर्यावरील व्यापारांत उभय राष्ट्रांस समसमान हक्क असावेत. (४) स्कॉटलंडमध्यें प्रेस्बिटीरियन धर्मपंथ व त्यांच्या आजपर्यंतच्या चालीरीती व कायदे कायम रहावे. पण इंग्लिश वजनें, मापें व नाणीं स्कॉटलंडांतही वापरण्यांत यावीं. (५) स्कॉटलंडमधून लंडनमध्यें भरणाऱ्या पार्लमेंटांतील लॉर्ड्ससभेंत १६ व कॉमन्स सभेंत ४५ सभासद निवडून पाठविण्यांत यावेत. या एकीकरणानें स्कॉटलंडचें निराळें सरकार न राहिल्यामुळें त्यानें इंग्लंडच्या शत्रूशीं मैत्री करण्याची भीति आतां इंग्रजांस राहिली नाहीं. आपल्या राष्ट्रीयत्वावर घाला येतो या कल्पनेनें स्कॉच लोक कांहीं काळ या 'संयोगा'मुळें असंतुष्ट होते, व हायलंड्समध्यें जॅकोबिटिझमचें वारें बरींच वर्षें जागृत राहिलें. तथापि धर्म व कायदा या बाबतींत स्कॉटिश लोकांस पूर्ण स्वातंत्र्य दिल्यामुळें स्कॉटलंडची भावना फारशी दुखविली गेली नाहीं. शिवाय इंग्लिश वसाहतींशीं व्यापार करण्याची पुरी सवड ठेविल्यामुळें स्कॉटलंडची सांपत्तिक भरभराट फार झपाट्यानें झाली. लवकरच ग्लास्गोसारखीं उद्योगधंद्यांनीं भरभराटलेलीं शहरें चमकूं लागलीं. परदेशाशीं व्यापार करणारीं बंदरें अस्तित्वांत आलीं व दारिद्र्य जाऊन

---

१ पुढें आयर्लंडची पार्लमेंट मोडून तिचा इंग्लिश पार्लमेंटांत समावेश करण्यांत आला (१८०१). त्यावेळीं 'यूनियन जॅक' निशाणामध्यें आयर्लंडचा साधु पॅट्रिक याचा तांबडा क्रॉस समाविष्ट झाला.

देशास संपन्नता आली. शेवटीं आपणांस स्वातंत्र्य व संपन्नता असल्यावर 'निराळें पार्लमेंट' नसलें तरी आपलें राष्ट्रीयत्व बुडणार नाहीं असा स्कॉटिश लोकांस भरंवसा वाटूं लागला व आज इंग्लंड व स्कॉटलंड यांच्यामध्यें पूर्ण ऐक्य नांदत आहे.

## ४४ व्हिग घराण्यांची राजवट सुरू झाली.



**१ पहिला जॉर्ज**—तिसऱ्या वुइल्यमच्या कारकीर्दीत झालेल्या वारशाच्या कायद्याप्रमाणें ( १७०१ ) सोफायाचा मुलगा जर्मनींतील हॅनो-व्हर संस्थानचा अधिपती जॉर्ज हा ॲनच्या मागून इंग्लंडचे गादीवर

हॅनोव्हर घराणें १७१४–
पहिला जॉर्ज १७१४–१७२७
|
दुसरा जॉर्ज १७२७–१७६०
|
फ्रेडरिक — वुइल्यम (डयूक ऑफ कंबलँड)
|
तिसरा जॉर्ज १७६०–१८२०
|
चौथा जॉर्ज १८२०–३० — चौथा वुइल्यम १८३०–३७ — एडवर्ड ( डयूक ऑफ कँट )
|
व्हिक्टोरिया १८३७–१९०१
|
सातवा एडवर्ड १९०१–१९१०
|
पांचवा जॉर्ज १९१०–

आला ( १७१४ ). व्हिगपक्षाचेंच त्याला पाठबळ असल्यामुळें त्यानें व्हिगपक्षाचें प्रधानमंडळ नेमिलें. जॉर्ज राजा चौपन्न वर्षांचा म्हातारा असून दिसावयास ओंगळ व बुद्धीनें मंद होता. त्याची चालचालणूक जर्मन असून त्याचें जें काय थोडेंबहुत शिक्षण झालें होतें तें जर्मन तऱ्हेवरच होतें. उच्च शिक्षणाचा अभाव त्याचे ठिकाणीं पूर्णपणें वसत होता, व त्याची अभिरुचिही उन्नत नसे. तो गादीवर आला तेव्हां त्याला इंग्लंडबद्दल कांहीं माहिती नव्हती व इंग्लिश भाषाही त्याला मुळींच येत नव्हती यांत कांहीं नवल नाहीं; परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, ज्या देशावर आपण राज्य करणार व ज्यांतील राजधानींत आपण कायमचे राहणार त्या इंग्लंडची माहिती आपणास असावी व इंग्लिश भाषा आपण शिकावी अशी कधीं त्यानें इच्छा सुद्धां केली नाहीं! इंग्लंडच्या राज्यामुळें प्राप्त झालेल्या ऐश्वर्याचा भोग घ्यावा व हॅनोव्हरचें कल्याण चिंतावें अशा पद्धतीनें त्यानें आपला सर्व जन्म घालविला. असा हा परकीय राजा इंग्लंडांत केव्हांच लोकप्रिय झाला नाहीं.

२ **व्हिग घराण्यांची सत्ता**—हॅनोव्हरचें घराणें गादीवर आलें तें व्हिग पुढाऱ्यांच्या खटपटीनें आलें. शिवाय पहिला जॉर्ज व त्याचा मुलगा दुसरा जॉर्ज हे राज्यकारभारासंबंधीं उदासीन असत. त्यामुळें सर्व राज्यकारभार व्हिग प्रधानांच्या हातीं आला. या वेळीं टोरी-पक्ष इंग्लिश राष्ट्राच्या मनांतून पार उतरला होता, व पुढील पन्नास वर्षांत एकही टोरी पुढारी अधिकारारूढ झाला नाहीं. पन्नास वर्षेपर्यंत सर्व सत्ता व्हिग पुढाऱ्यांच्या हातीं होती. राजांनीं औदासीन्य स्वीकारल्यामुळें पार्लमेंटचें महत्त्व विशेष वाढलें, व पार्लमेंट आपल्या पक्षास अनुकूल राखण्याचा व्हिगपक्षानें प्रयत्न केला व त्यांत त्यास यश आलें. लॉर्डांच्या सभेंत व्हिगांचें जबर मताधिक्य होतेंच. कॉमन्स सभेंत शहरांतून व परगण्यांतून सभासद निवडून येत. वरींच शहरें व्हिग जमीनदारांच्या मालकीचीं असत व इतर शहरांतूनही मताधिकार आकुंचित प्रमाणावर असल्यामुळें वजन खर्च करून म्हणा अगर पैसा भरून म्हणा आपल्याला अनुकूल उमेदवार त्यांतून निवडून आणणें सत्ताधिकारी व्हिग पुढाऱ्यांस सोपें होतें.

परगण्यांतून श्रीमंत जमीनदारांसच उमेदवारीचा अधिकार असल्यामुळें व जमीनदार मतदारांवर व्हिग श्रीमंत जमीनदारांचें चांगलें वजन असल्यामुळें व्हिग उमेदवार सहज निवडून येत. आणखी अधिकारारूढ व्हिग पुढारी श्रीमंत, हुशार व कार्यदक्ष असल्यामुळें पुढील पन्नास वर्षें कॉमन्समध्यें त्यांचें मताधिक्य अबाधित राहिलें. १६८८ च्या क्रांतीपासून सत्ता पार्लमेंटच्या हातीं आली खरी; परंतु पहिल्या जॉर्जच्या कारकीर्दीपासून तिचा उपभोग घेण्याची संधी पार्लमेंटच्या पुढाऱ्यांस मिळाली, व व्हिगपक्षानें तिचा उपभोग घेऊन इंग्लिश राज्यपद्धतीस विशिष्ट वळण लावून दिलें. टोरी-पक्ष लुला झाला असतां व्हिग पक्षांत एकामागून एक तेजस्वी पुढारी निघाले व त्यांनीं आपल्या पक्षास शिस्त लावून इंग्लंडची राज्यनौका अर्धशतकभर हांकली. या काळांत इंग्लंडच्या गादीवर प्रॉटेस्टंट घराणें स्थिर झालें; १७२७ पासून टेस्ट व कॉर्पोरेशन ॲक्टांतील निर्बंधांपासून सवलत देणारा कायदा प्रतिवर्षीं पास करून त्यांनीं डिसेंटरांस सरकारी नोकरी मिळण्याची मोकळीक केली व अप्रत्यक्षपणें धर्म-स्वातंत्र्यास उत्तेजन दिलें. शांततेचें व व्यापारविषयक सवलतीचें धोरण स्वीकारून त्यांनीं इंग्लंडची सांपत्तिक भरभराट घडवून आणिली. त्यांच्या वर्चस्वाच्या काळीं आश्चर्यकारक राजकीय घडामोडी झाल्या नसल्या तरी देशास स्वस्थता मिळाली व पुढें होणाऱ्या इंग्लंड व फ्रान्स यांजमधील झगड्याची पूर्वतयारी झाली.

**३ जॅकोबाइटांचा बंदोबस्त**—फ्रान्सशीं युट्रेचचा नुकसानकारक तह करून इंग्लंडास मिळण्यासारखी बरीच मिळकत फुकट घालविली हा आरोप ठेवून माजी टोरी प्रधान हार्ले व बोलिंगब्रोक यांचें वर्तन दूषणास्पद होतें कीं नाहीं याची चौकशी करण्यासाठीं व्हिगप्रधानमंडळानें अधिकारावर येतांच कॉमन्सच्या कांहीं सभासदांची कमिटी नेमली. शिवाय हार्ले व बोलिंगब्रोक यांनीं तोतया जेम्सशीं गुप्त पत्र व्यवहार केला व कायदा धाब्यावर बसवून त्यास इंग्लंडच्या गादीवर आणण्याचा प्रयत्न केला. यामुळें राजद्रोहाच्या आरोपावरून त्यांची लॉर्डांपुढें कॉमन्सनीं चौकशी चालविली. त्यांपैकीं बोलिंगब्रोक फ्रान्सांत पळून गेला. हार्ले ( ऑक्सफर्ड )

दोन वर्षें तुरुंगांत खितपत होता. शेवटीं दोन्ही सभांचा मतभेद झाल्यामुळें तो वांचला. जॉर्ज हा लोकांना अप्रिय होताच. आणखी या खटल्यामुळें लोकमत अधिकच क्षुब्ध झालें. अशा या अनुकूल परिस्थितीमुळें 'जेम्सला' गादीवर आणण्याचा जॅकोबाइट लोकांनीं निश्चय केला. ठिकठिकाणीं गुप्त मंडळ्या स्थापल्या जाऊन राज्यक्रांतीचे कट होऊं लागले. त्यामुळें प्रधान मंडळानें सभाबंदीचा कायदा पास केला. बारा असामींपेक्षां अधिक लोक एकत्र जमले असून जर दंगा होण्याचा संभव दिसला तर मॅजिस्ट्रेटनें त्यांस एका तासाची सूचना देऊन पिटाळून लावावें असें ठरलें. आणि 'जेम्स' ब्रिटनच्या किनाऱ्यावर उतरेल तर त्यास पकडून देणारास एक लक्ष पौंडांचें बक्षिस मिळेल असें जाहीर करण्यांत आलें.

**४ जॅकोबाइट बंड (१७१५)**—याच वेळीं जेम्सही इंग्लंडवर स्वारी करून येण्यासाठीं मोठ्या जोरानें तयारी करीत होता. परंतु इतक्यांत चौदावा लुई वारला व त्याचा मूळ आधारच तुटून त्यास स्वारीचा बेत लांबणीवर टाकणें भाग पडलें. तथापि स्कॉटलंडांत व इंग्लंडच्या उत्तरेकडे त्याला राज्यावर आणण्यासाठीं दोन बंडें झालींच! स्कॉटलंडांत अर्ल ऑफ मार यानें बंडाचें निशाण उभारलें. त्याला दहा हजार लोक मिळाले व त्यानें आपलें मुख्य ठाणें पर्थ येथें दिलें. इकडे सरकारचा सेनापती डयूक ऑफ अर्गाईल यानें स्टर्लिंग येथें ठाणें देऊन मार यास खालीं येऊं दिलें नाहीं. इंग्लंडांत नॉर्दम्बर्लंड कौन्टीतर्फेचा पार्लमेंटचा सभासद फॉर्स्टर व डर्वेंटवॉटर या दोघांनीं 'जेम्स'च्या वतीनें बंडाचें निशाण उभारलें. इंग्लंड व स्कॉटलंड यांच्या सरहद्दीवरील थोडे सरदार त्यांस येऊन मिळाले व मारनें स्कॉटलंडांतून कांहीं हायलंडर त्यांच्या साहाय्यास पाठविले. या सर्वांनीं मिळून लँक्याशायरमधील प्रेस्टन या गांवापर्यंत चाल केली. तेथें त्यांची व कार्पेंटरच्या हाताखालील सरकारी फौजेची गांठ पडली. सरकारी फौजेनें शेवटीं त्यांना त्या गांवांत कोंडिलें. तेव्हां बहुतेक सर्व बंडवाले शरण आले (१३ नोव्हेंबर १७१६). त्याच दिवशीं अर्गाइल मारवर चालून गेला व शेरिफमूर येथें लढाई होऊन

मार रणांगणावरून पळून गेला. अशा तऱ्हेनें जेम्सला गादीवर आणण्याच्या दोन्ही प्रयत्नांची वाट लागली. इतक्यांत फ्रेंच मंत्र्यानें हांकून दिल्यामुळें खुद्द जेम्स आपलें राज्य मिळविण्यासाठीं स्वतः स्कॉटलंडांत येऊन दाखल झाला. तो आला तेव्हां त्याजबरोबर फक्त सहा लोक होते व हत्यारें, धान्य अगर पैसा यांपैकीं कांहींही नव्हतें! आपल्या निराश झालेल्या अनुयायांत उत्साह उत्पन्न करण्यासाठीं पर्थ येथें त्यानें राजशाही थाटानें प्रवेश केला. मग स्कोन येथें आपल्याला राज्याभिषेक करून घेण्याची तयारी करण्यांत त्यानें बरेच महत्त्वाचे दिवस व्यर्थ दवडले. इतक्यांत सरकारी फौज घेऊन अर्गाइल पर्थवर चालून येऊं लागला. आपल्यावर सरकारी फौज चालून येते, असें कळतांच जेम्सचा धीर सुटून तो मारसह बोटींत बसून युरोपांत पळून गेला व त्यानें आपल्या अनुयायांस पुरें तोंडघशीं पाडिलें. अशा पळपुट्या नायकास साहाय्य केल्याबद्दल बऱ्याच स्कॉटिश वीरांस पश्चात्ताप झाला. लॉर्ड डर्वेंटवॉटर, केनमूर व निथ्स्डेल यांस फांशीची शिक्षा झाली. त्यांपैकीं निथ्स्डेल याच्या धैर्यशाली पत्नीनें त्याची तुरुंगांत भेट घेतली; त्याला आपला स्त्रीवेष दिला आणि आपण त्याचे जागीं राहून त्याची सुटका केली. आणखी सुमारे पंचवीस सामान्य लोकांस देहान्त प्रायश्चित्त मिळालें. इतक्या थोड्या मंडळीच्या शिक्षेनें बंडवाल्यांचें शासन संपलें, त्याचें कारण राजदरबारीं दुटप्पी लोकांचा भरणा असून पुढें मागें राज्यक्रान्ति यशस्वी झाल्यास जॅकोबाइटांशीं आपला वैरभाव वाढला नसलेलाच बरा, या बुद्धीनें व्हिग लोकांनीं गय केली हेंच होय.

५ **सप्तवार्षिक कायदा**—या बंडाळीमुळें पार्लमेंटच्या मुदतीसंबंधानें एक महत्त्वाचा कायदा पास झाला. पूर्वीं १६९४ सालीं पार्लमेंटची जास्तींत जास्ती मुदत तीन वर्षें असून निदान तीन वर्षांनीं नवी निवडणूक होऊन नवी पार्लमेंट झालीच पाहिजे असा कायदा पास करण्यांत आला होता. देशांत अजून स्थिरस्थावर नसल्यामुळें याच वेळीं पार्लमेंटच्या निवडणुकीची दंगल उसळल्यास शांततेस धोका येईल असें वाटून व्हिग प्रधानमंडळानें असा कायदा पार्लमेंटमध्यें पास करून घेतला

कीं, ही पार्लमेंटच्या बैठकीची कमाल मर्यादा सात वर्षांची असावी. हाच सप्तवार्षिक कायदा ( Septennial Act ) होय. अशा रीतीनें एकदां निवडलेल्या पार्लमेंटची कमाल मुदत सात वर्षांची झाल्यानें पुढील अर्ध शतकपर्यंत व्हिग पुढाऱ्यांस आपली सत्ता दृढमूल करतां आली. शिवाय या दीर्घ मुदतीमुळें सरकारचें धोरण स्थिर राहून अल्पकाल टिकणाऱ्या लोकक्षोभाच्या वादळांत सांपडून राज्यकारभाराचें तारूं भडकून जाणें अशक्य झालें. पार्लमेंटच्या सभासदांसही स्वतंत्रपणें विचार करून आपलीं मतें देतांना चंचल लोकमताला भिण्याचें फारसें कारण राहिलें नाहीं. १९११ सालीं या कायद्यांत बदल झाला व एकाच पार्लमेंटची कमाल मर्यादा पांच वर्षे ठरविण्यांत आली. याचा असा मात्र अर्थ नव्हे कीं नवी निवडणूक पांच वर्षांनींच केली पाहिजे. नवी निवडणूक एक वर्षांतही करतां येते. या कायद्यानें येवढाच नियम घालून दिला आहे कीं पांच वर्षांनीं तरी नवी निवडणूक व्हावी.

**६ परराष्ट्रीय राजकारण**—जॉर्ज गादीवर आला तेव्हां जें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें, त्यांत टाउन्शेंड, वॉल्पोल, स्टॅन्होप व संडरलंड हे प्रमुख होते. परंतु लवकरच या व्हिग पुढाऱ्यांत फूट पडण्याचा प्रसंग आला. हॅनोव्हरच्या हितार्थ स्वीडनशीं युद्ध करण्याचें जॉर्जनें ठरविलें व त्या युद्धाच्या खर्चाची तरतूद करण्यास स्टॅन्होपची संमति मिळविली. टाउन्शेंड व वॉल्पोल यांचा या बाबतींत स्टॅन्होपशीं मतभेद होऊन त्यांनीं आपल्या जागांच राजीनामे दिले ( १७१७ ), व तेव्हांपासून अधिकारसूत्रें स्टॅन्होप व संडरलंड यांचे हातीं आलीं. १७१८ सालीं स्वीडनचा महत्त्वाकांक्षी राजा बारावा चार्लस वारल्यामुळें स्वीडिश युद्ध टळलें. परंतु याच सुमारास स्पेनशीं युद्ध करणें भाग पडलें. युट्रेचचा तह स्पेनच्या फिलिपला मुळींच पसंत नव्हता. तशांत यावेळीं स्पेनच्या मंत्रिपदावर आल्बेरोनी या कारस्थानी गृहस्थाची नेमणूक झाली होती. त्यानें युट्रेचच्या तहास हरताळ फासण्याचा बेत केला. चौदाव्या लुईमागून फ्रान्सच्या गादीवर त्याचा रोगट अल्पवयी नातू पंधरावा

लुई बसला होता. त्याला मूल होण्याची आशा नव्हती; तेव्हां युट्रेचचा तह बाजूस सारून फिलिपलाच पुढें फ्रेंच गादी मिळेल अशी व्यवस्था करण्याचा आल्बेरोनीनें घाट घातला. त्याचप्रमाणें युट्रेचच्या तहानें स्पेनच्या ताब्यांतून गेलेला इटलींतील मुलूख परत मिळविण्याची त्यानें खटपट चालविली. परंतु या दोन्ही बाबतींत त्याच्या प्रयत्नांस फळ येणें कठिण होतें. फ्रान्सच्या मंत्रिपदावर ड्यूक ऑफ ऑर्लीन्स हा राजघराण्यांतील पुरुष होता. त्यानें लुई संतानहीन झाल्यास आपणास व आपल्या वंशास गादी मिळावी यासाठीं उद्योग आरंभिला. इंग्लंडला युट्रेचचा तह पाळला जाणें इष्ट असल्यानें, इंग्लंडनें ऑर्लीनिस्ट वारसा व फ्रान्सनें हॅनोव्हेरियन वारसा मान्य करावा या अटीवर इंग्लंड, हॉलंड व फ्रान्स यांचा स्नेहवर्धक तह तेव्हांच घडून आला ( १७१७ ). इतक्यांत स्पॅनिश अरमारानें सार्डिनिया बेट हल्ला करून घेतलें व सिसिलीवर हल्ला केला ( १७१८ ). तेव्हां इंग्लिश ॲड्मिरल बिंग यानें सिसिलीच्या दक्षिणेकडील पसॅरो भूशिराजवळ स्पॅनिश अरमार पार बुडविलें. त्यामुळें इंग्लंड, फ्रान्स व हॉलंड यांचे त्रिकुटास जर्मन बादशहा मिळून चतुरंगी संघ झाला. स्कॉटलंडांत जॅकोबाईट बंड उठविण्याचा आल्बेरोनीचा प्रयत्नही निष्फळ झाला. येणेंप्रमाणें स्पेनला पराजय आल्यामुळें आल्बेरोनीस कामावरून दूर करणें फिलिपला भाग पडलें व मग त्यानें युट्रेचचा तह पाळण्याचें कबूल करून चतुरंगी संघाशीं सख्य केलें ( १७१९ ).

७ **पीरेज बिल**—हल्लीं लॉर्ड्ससभेंत टोरींचे ( कॉंझर्व्हेटिव्ह ) प्राबल्य विशेष असतें; पण त्यावेळीं व्हिग लोकांचेंच प्राबल्य त्या सभेंत असे. उदाहरणार्थ हार्ले या टोरी प्रधानास टोरींचा आवडता युट्रेचचा तह घडवून आणण्याच्या कामीं लॉर्ड्ससभा व्हिग बहुमताची असल्यामुळें विरोध करूं लागली. तेव्हां त्यानें नवे बारा लार्ड करून आपल्या मतवाल्यांची सरशी केली. हें व्हिगपक्षास इष्ट वाटलें नाहीं. तेव्हां संडरलंडनें १७१९ त ' पीरेज बिल ' पार्लमेंटपुढें आणिलें. त्यांत त्या वेळीं

सभागृहांत असलेल्या १७८ लार्डांत सहा लॉर्डांपेक्षां जास्त भर घालण्याचा राजास अधिकार असूं नये असें प्रतिपादिलेलें होतें. तें लॉर्डांच्या सभेंत तेव्हांच पास झालें. परंतु सरकारपासून फटकून निघालेल्या वॉल्पोल आदिकरून व्हिग पक्षांतील लोकांनींच कसून विरोध केल्यामुळें हें बिल कॉमन्ससभेंत नामंजूर झालें. हें बिल पास झालें असतें तर कॉमन्स हे लॉर्डांपेक्षां श्रेष्ठ होत हें तत्त्व हार्लेच्या कृतीनें सिद्ध झालें होतें त्यास हरताळ फासला गेला असता. सुदैवानें तो प्रसंग टळला.

**८ साउथ सी कंपनी**—युट्रेचच्या तहानंतर दक्षिण अमेरिकेशीं इंग्लिशांचा व्यापार वाढून पुष्कळच व्यापारी कंपन्या निघाल्या. 'साउथ सी कंपनी' ही हार्लेनें १७११ त स्थापिली होती. युट्रेचच्या तहानें दक्षिण अमेरिकेशीं चालणाऱ्या सर्व व्यापाराचा मक्ता या कंपनीस सरकारानें दिला होता. त्यामुळें या कंपनीची अतिशय भरभराट झाली. तिनें १७१९ त सरकारास असें सुचविलें कीं, राष्ट्रीय कर्जाची व्यवस्था आपल्याकडे दिल्यास, सर्व कर्जाबद्दल शेकडा ५ या हलक्या दरानें आपण सरकारपासून व्याज घेऊं व या सवलतीबद्दल सत्तर लक्ष पौंड रोख देऊं. ही सूचना प्रधानमंडळानें मान्य केली व कंपनीस सरकारी आश्रय दिल्याचा कायदा पार्लमेंटनें पास केला ( १७२० एप्रिल ). सर रॉबर्ट वॉल्पोल यानें मात्र कंपनीच्या अटी अशक्य आहेत, त्या तिजकडून पाळल्या जाणार नाहींत असा इशारा दिला. पण त्याचें कोणी ऐकिलें नाहीं. सरकारच्या कंपनीला आश्रय मिळाल्याचें कळतांच तिच्या शंभर पौंडांच्या शेअरची किंमत एक हजारावर आली ! गरीब व श्रीमंत स्त्री-पुरुष या सर्वांस कंपनीचे शेअर विकत घेण्याची हांव सुटली. या वेळीं कंपन्यांचे शेअर विकत घेण्याचें वेड लोकांस इतकें कांहीं लागलें होतें कीं विचारूं नये ! त्यामुळें कंपन्यांची संख्याही झपाझप वाढली. मग लोकांच्या भोळेपणामुळें आपला फायदा करून घेण्यास टपलेले लबाड भराभर पुढें आले व त्यांनीं अशक्य असलीं तरी लोकांची कल्पनाशक्ति हालवून सोडणारीं ध्येयें पुढें ठेवून कंपन्या काढिल्या. एक कंपनी बीच

झाडापासून सोन्याची निष्पत्ती करून देणार होती! कोणत्याही यंत्रास कायमचें चालू ठेवण्यास अनंत गतीचें एक चक्र पैदा करून देण्याचें दुसऱ्या एका कंपनीनें अंगावर घेतलें! तिसऱ्या कंपनीच्या धूर्त चालकानें तर सर्वांवर ताण केली! आम्ही ज्या कामासाठीं पैसे जमवीत आहोंत तें काम पुढें सांगण्यांत येईल अशीच मुळीं त्यानें जाहिरात दिली! लोक इतके भोळसर झाले होते कीं अवघ्या पहिल्याच दिवशीं सकाळीं त्याचे २००० पौंड किंमतीचे शेअर खपले! मग काय विचारतां? त्या राजश्रीनें तितके पैसे घेतले व स्वारी जी गडप झाली ती फिरून कोणास तोंड दाखवावयास बाहेर येईल तर शपथ!!

**९ दिवाळीं वाजलीं!**—याचप्रमाणें सर्व कंपन्यांचा 'बुडबुडा' एकदांचा फुटला; साउथ सी कंपनीचीही तीच गत झाली. पहिल्यानें एक महिन्यांत तिच्या शेअरचा भाव एक हजारावरून १७५ पौंडांपर्यंत उतरला. पुढें तर कंपनीच्या शेअरला बाजारांत कोणीही पुसेना. तेव्हां कंपनीचें दिवाळें निघून ज्या बायाबापड्यांनीं आपली कष्टानें मिळविलेली पुंजी या व्यापारांत घातली होती त्यांस भीक मागण्याची पाळी आली. साउथ सी कंपनीला प्रधान मंडळानें पाठिंबा दिला व आपला फायदा करून घेऊन गरिबांना बुडविलें असा सरकारावर टपका आला. पार्लमेंटनें या प्रकरणाची चौकशी करण्याकरितां एक कमिटी नेमिली. त्या कमिटींतील एक सभासद रागानें म्हणाला, "साउथ सी कंपनीच्या डायरेक्टरांना पोत्यांत भरावें व तीं पोतीं शिवून नदींत टाकून द्यावीं, म्हणजेच त्यांच्या पापाचें त्यांस योग्य प्रायश्चित्त मिळेल." या कमिटीची चौकशी आपणास जाचक होईल तेव्हां यापुढें जगणें नको असें म्हणून पोस्टमास्टर जनरल क्रॅग्ज यानें जीव दिला. स्टॅन्होप व संडरलंड यांचा लांचलुचपतींत कांहीं संबंध नव्हता; तथापि त्या दोघांसही जबर धक्का बसून ते लवकरच वारले. नंतर १७१७ सालीं फुटून गेलेले वॉल्पोल व टाउन्शेंड यांनीं या बिकट प्रसंगीं अधिकार-सूत्रें हातीं घेतलीं (१७२१ मार्च). आर्थिक व्यवस्थेंत तरबेज असलेल्या वॉल्पोलनें राष्ट्रास या कठिण परिस्थितींतून निभावून नेण्याचा निश्चय केला. कंपनीकडून सरकारला मिळा-

वयाच्या सत्तर लाख पौंडांच्या मोठ्या रकमेची माफी करण्यांत आली. कर्जावरील व्याज देण्याच्या करारांतून कंपनीस मोकळें केलें. कंपनीच्या शेअरपैकीं कांहीं शेअर ईस्ट इंडिया कंपनीनें घ्यावे, कांहीं बँक ऑफ इंग्लंडनें घ्यावे, असें ठरवून कशीबशी रोकड रक्कम उभारिली आणि शेअर विकत घेणारांचें जें सर्वस्वी नुकसान झालें होतें त्याचेऐवजीं त्यांस दर पौंडामागें ६ शिलिंग ८ पेन्स परत मिळाले.

---

# ४५ मालकी राजाची व वहिवाट प्रधानांची !



**१ वॉल्पोलचें स्वभाववर्णन**— साउथ सी कंपनीच्या वादळांतून इंग्लंडास वॉल्पोलनें बचावलें. तेव्हांपासून इंग्रज लोकांचा त्याच्यावर पक्का विश्वास बसला; व इंग्लंडचीं राज्यसूत्रें बावीस वर्षेंपर्यंत त्याच्याच हातीं राहिलीं. वॉल्पोल ( १६७६–१७४५ ) हा नॉर्फोक कौन्टींतील एका इनामदाराचा (Country Gentleman) मुलगा असून सामान्य मध्यमस्थितींतील इंग्रज गृहस्थास जें कांहीं शिक्षण लागतें तितकें झाल्यावर वयाच्या चोविसाव्या वर्षीं तो पार्लमेंटांत शिरला. गाढ विद्वत्ता, संस्कृत अभिरुचि, मुत्सद्देगिरीचीं सूक्ष्म तत्त्वें व उदात्त नीतिकल्पना या गुणांपैकीं त्याच्या ठिकाणीं कोणताच नव्हता. हे लोकांचे डोळे दिपवून सोडणारे गुण त्याच्या ठिकाणीं नसले तरी व्यवहारज्ञानांत तो चांगला मुरला असून आपल्या देशाचें कल्याण करण्याची बुद्धि त्याच्या अंतःकरणांत सारखी जागृत होती. पुस्तकांचा त्याला कंटाळा होता व कलांपैकीं शिकार, मद्यपान व जुगार हीं सर्व व्यसनें त्याला असून त्यांत तो बऱ्याच वेळां रंगून जात असे. मोठमोठ्या कठीण प्रसंगींही राज्यकारभारासंबंधीं पत्रांचे अगोदर तो आपल्या गेमकीपरकडून आलेलीं पत्रें वाचीत असे. त्याच्या ठिकाणचा आत्मविश्वास कांहीं विलक्षण होता. तो एकदां म्हणाला " मी जर मुख्य प्रधान झालों

नसतों तर क्यान्टरबरीचा मुख्य धर्माधिकारी तरी खचीत झालों असतों." त्याच्या मनावर व्यवहारज्ञतेचा इतका पगडा बसला होता कीं त्याची सौंदर्यसृष्टि व नैतिक उदात्त कल्पना यांजबद्दलची अभिरुचि अगदीं गारठून गेली होती. नैतिक, उदात्त व शुद्ध हेतूबद्दल बोलणें निघाल्यास शाळेंतील पोरांच्या गोष्टी म्हणून तो त्यांची हेटाळणी करीत असे ! देशाभिमान व सार्वजनिक हितबुद्धि यासंबंधीं कोणी तरूण बोलूं लागला तर त्याचें एक ठरावेिक सरळ उत्तर असे; " कांहीं दिवस जाऊं द्या, तुम्ही मोठे झालां म्हणजे तुमचीं मतें पालटतील व तुम्ही जास्त शहाणे व्हाल. "

२ **प्रधानमंडळ**—पहिला जॉर्ज राजा मंद असून त्याचा हॅनोव्हरकडे सदोदित ओढा असल्याचें मागें सांगितलेंच आहे. इंग्लंडच्या राज्यकारभारांत मुळींच लक्ष न घालतां गादी मात्र बिनबोभाट आपणाकडे चालण्याची व्यवस्था झाल्यास त्यांत त्याला आनंद होता. व्हिग लोकांनीं जॉर्ज प्रॉटेस्टंटधर्मी होता येवढ्याच त्याच्या गुणाला भुलून त्याच्याकडे व त्याच्या वंशाकडे गादी चालविण्याचा संकल्प केला होता. टोरी लोकांचा ओढा जेम्सकडेच असे. तेव्हां जॉर्जनें व्हिग आश्रयदात्यांवर राज्याचा सर्व भार टाकून सुखानें दिवस काढण्याचें ठरविलें. कॉमन्स सभा व लॉर्डांची सभा या दोहोंनीं पास केलेला कायदा नामंजूर करण्याचा अधिकार राजास होता. परंतु जॉर्जनें तो केव्हांही उपयोगांत आणिला नाहीं, प्रधानमंडळाच्या बैठकीसही तो हजर रहात नसे. या दोन्ही कृत्यांनीं राजसत्तेवर नियंत्रण पडून हे दोन्ही अधिकार इंग्लंडच्या राजानें केव्हांही गाजवावयाचे नाहींत अशी इंग्लिश राज्यपद्धतीची वहिवाट होऊन बसली. प्रधानमंडळांतील निरनिराळे प्रधान एकाच पक्षाचे असावयाचे ही पद्धति वुइल्यमच्या कारकीर्दीपासूनच हळूहळू सुरू झाली होती. या प्रधानांच्या कृतींत एकसूत्रीपणा राखण्याचें काम आजपर्यंत राजाच करीत असे. आतां मात्र जॉर्ज राजानें हेंही काम करण्याचें नाकारिलें. तेव्हां प्रधानमंडळाच्या बैठकीमध्यें स्वतः अध्यक्ष

व्हावयाचें व इतर प्रधानांच्या नेमणुकीही आपणच करावयाच्या ही पद्धति वॉल्पोलनें पाडिली. त्यामुळें त्याला इग्लंडांतील पहिला मुख्य प्रधान म्हणतात. वॉल्पोल आपली मुख्य प्रधानगिरी गाजवीत असतां टाउन्शेंड नांवाच्या प्रधानानं आपली योग्यता समान आहे असें दाखविण्याचा आव घातला. त्यावर वॉल्पोल त्यास म्हणाला " आपण जे येथें आहोंत ते वॉल्पोल व टाउन्शेंड या क्रमानें येथें आहोंत; टाउन्शेंड व वॉल्पोल या क्रमानें नव्हे." १७४१ सालीं कांहीं लॉर्ड सभासदांनीं अशी तक्रार केली कीं, 'मुख्य प्रधान इंग्लिश कायद्यास माहित नसून इंग्लिश राज्यपद्धतीच्याही विरुद्ध आहे." त्यावेळीं वॉल्पोलनें ही पदवी आपल्याला लाविलीच पाहिजे असा हेका धरला नाहीं, हें त्याच्या व्यवहारकुशलतेचें द्योतक आहे. परंतु पुढें प्रसिद्ध धाकट्या पिटनें मुख्य प्रधान असणें युक्त आहे असें जाहीरपणें म्हटलें व आतां हेंच मत सर्वमान्य झालें आहे. इंग्लंडांत प्रधानमंडळ[1] हें राजकीय सत्ताधिकारी असून मुख्य प्रधान प्रधानमंडळाचा सूत्रचालक असतो. मुख्य प्रधानास प्रीमियर (Premier) किंवा प्राइम मिनिस्टर (Prime Minister) म्हणतात. कॉमन्ससभेंत ज्या पक्षाचें मताधिक्य असेल त्या पक्षाच्या मुख्य पुढाऱ्यास राजानें प्राइम मिनिस्टर नेमावयाचें व मग त्यानें इतर प्रधान निवडून आपलें प्रधानमंडळ बनवायाचें अशी पद्धति हळूहळू प्रचारांत येऊं लागली व हल्लीं ती पूर्णपणें अमलांत आहे.

**३ वॉल्पोलची कामगिरी**—१७२७ सालीं पहिला जॉर्ज मरण पावला व त्याचा मुलगा 'दुसरा जॉर्ज' ही पदवी धारण करून इंग्लंडचा राजा बनला. कांहीं वर्षें इंग्लडांत घालविल्यामुळें त्याला इंग्लिश चालीरीतींची व राज्यकारभाराची कांहीं माहिती झाली होती व थोडेंबहुत इंग्लिश बोलतां येत असे. त्याला वॉल्पोल आवडत नव्हता परंतु त्याची

१ ही मंडळी राजाच्या क्याबिनेट ( खोली ) मध्यें त्याची सल्ला घेण्याकरितां जमत म्हणून प्रधानमंडळास क्याबिनेट ( Cabinet ) म्हणतात.

राणी त्याच्यापेक्षां जास्त हुशार व विचारी होती. तिच्याच सल्ल्यानें जॉर्ज चालत असल्यामुळें वॉल्पोलचा अधिकार तसाच कायम राहिला. १७२० पासून १७४२ पर्यंतचीं बावीस वर्षें वॉल्पोल मुख्य प्रधान होता. येवढ्या मोठ्या अवधींत फारच थोडया महत्त्वाच्या गोष्टी घडून आलेल्या दिसून येतात. परंतु वॉल्पोलचें धोरण असें होतें कीं, शांतता राखावयाची व व्यापार आणि उद्योगधंदे यांस उत्तेजन द्यावयाचें. त्यानें परदेशांतून येणाऱ्या कच्या मालावरील जकाती कमी केल्या; त्यामुळें इंग्लंडांत तयार होणारा पक्का माल अधिक चांगला व स्वस्त होऊं लागला. लवकरच इंग्लंडचा व्यापार वाढून ६० लक्ष पौंडांचा माल देशांतून बाहेर जात होता तो १ कोटी २० लक्ष पौंडांहून जास्त किंमतीचा माल निर्गत होऊं लागला. वॉल्पोलनें राष्ट्रीय कर्ज ८० लक्षांनीं कमी केलें. शिवाय व्याजाचा दर कमी झाला म्हणजे त्या दरानें कर्ज काढावयाचें व व्याजाचा दर भारी असतां काढिलेलें कर्ज त्या पैशांतून फेडावयाचें अशी पद्धति अमलांत आणून त्यानें सरकारास दरसाल द्याव्या लागणाऱ्या व्याजाचा भार कमी केला. वार्षिक उत्पन्नांतून खर्च जाऊन शिल्लक उरली तर ती चक्रवाढीनें व्याजीं लावून सर्व राष्ट्रीय कर्जाची फेड करण्यासाठीं त्यानें एक कायमचा निर्धाही ( Sinking Fund ) करून ठेविला. परदेशांशीं शांतता राखण्याचें त्याचें धोरण होतें. स्पेनचें सरकार आपले युट्रेचच्या तहानें गेलेले प्रांत परत मिळविण्यासाठीं कारस्थानें करितें हें पाहून फ्रान्स, हॉलंड व प्रशिया या देशांशीं त्यानें सख्य जोडिलें (१७२५) व स्पेनलाही तह करण्यास भाग पाडलें ( १७२९ ). हा हेतु त्यानें परदेशच्या मंत्र्यांना लांच भरूनच साधिला. देशांतील राज्यकारभार चालवितांनाही पार्लमेंटच्या सभासदांस लांच भरून तो आपला कार्यभाग साधून घेत असे. कॉमन्ससभेंत जे सभासद निवडून येत त्यांतील कांहीं बरोंमधून ( मोठीं गांवें ) व कांहीं कौन्टींमधून ( परगणे ) असे येत असत. त्यांतलीं पुष्कळशीं बरो वॉल्पोलच्या व्हिग साहाय्यकाऱ्यांचीं वतनेंच बनून गेलीं होतीं ! ही वतनदारी व लांच या दोन गोष्टींमुळें वॉल्पोलला विरोध करणारा टोरी पक्ष पार्लमेंटांत अतिशयच दुबळा झाला.

**४ जकातीचें बिल**—इंग्लंडांत परदेशाहून येणाऱ्या मालावर जकात असे. ही जकात बंदरावर घेत. परंतु जकातीकडील अधिकाऱ्यांची नजर चुकवून कोठें तरी किनाऱ्यावर माल उतरावा व जकात चुकवावी असा प्रकार फार होई व जकातीच्या उत्पन्नांत पुष्कळ नुकसान येई. हा प्रकार बंद करण्यासाठीं वॉल्पोलनें एक युक्ति काढिली. त्यानें पार्लमेंट सभेपुढें असें बिल आणिलें कीं, 'दारू व तंबाखू या दोन पदार्थांवर बंदरावर जकात न घेतां ते पदार्थ सांठविणाऱ्या किंवा विकणाऱ्या दलाल व्यापाऱ्यांकडून ती घ्यावी.' या बिलाप्रमाणें बंदरावर जकात घ्यावयाची नसल्यामुळें लंडन हें 'खुलें बंदर' होऊन परदेशीं परत निर्गत करावयाचा माल बिनजकातीनें निर्गत करण्यास मोकळीक होती. त्यामुळें लंडन उतारपेठ होऊन जगाच्या बाजारांत त्याचें महत्त्व वाढणार होतें. शिवाय वॉल्पोलचें म्हणणें असें होतें कीं, जकात चुकविल्यामुळें सरकारचें नुकसान होत आहे तें या नवीन पद्धतीनें भरून येऊन उत्पन्न वाढेल व त्यामुळें इतर कर माफ करतां येतील. परंतु व्यापाऱ्याजवळच्या जिनसांचा सांठा तपासण्यासाठीं जकात–कामगाराला कोणच्याही कारखान्यांत, दुकानांत, किंबहुना घरांत सुद्धां शिरण्याचा या बिलानें अधिकार दिला होता. तेव्हां आपल्या स्वातंत्र्यावर घाला येतो असें वाटून इंग्लिश लोकांनीं या बिलाविरुद्ध गिल्ला केला. वॉल्पोलच्या पक्षाचे सभासद लांच खाऊन त्याचे मिंधे असल्यामुळें त्यांच्या बहुमताच्या जोरावर हें बिल पास झालें असतें. पण सामान्य जनसमूह विरुद्ध आहे असें पाहून 'लोकांवर जबरदस्तीनें कायदे लादणारा प्रधान मी नव्हें' असें म्हणून वॉल्पोलनें तें बिल परत घेतलें.

**५ विरोधी पक्ष**—व्यवहारज्ञतेबरोबर सत्तेचा लोभही वॉल्पोलच्या ठिकाणीं होता. त्यामुळें त्याला प्रतिस्पर्धी खपत नसे. त्यानें कर्तृत्ववान् व्हिग लोकांस प्रधानमंडळांतून व हुद्याच्या जागांवरून काढून टाकिलें. तेव्हां त्यांच्यापैकीं कांहींनीं जुना टोरी पुढारी बोलिंगब्रोक आणि फ्रेड्रिक प्रिन्स ऑफ वेल्स यांचे नेतृत्वाखालीं एक वॉल्पोलला विरोधी

टोरी पक्ष निर्माण केला. बोलिंगब्रोकला पार्लमेंटनें हद्दपारीची शिक्षा केली होती ( १७१५ ); परंतु १७२४ त त्याला इंग्लंडांत परत येण्याची परवानगी मिळाली. प्रिन्स फ्रेड्रिकचा बापाशीं–दुसऱ्या जॉर्जशीं–तंटा असून त्यानें प्रधानमंडळास विरोध करणाऱ्या टोरी पक्षाचें पुढारीपण स्वीकारिलें ! या गोष्टीनें इंग्लंडचा एक मोठा फायदा झाला. देशांतील व्हिग लोक राजाकडे तर टोरी राजपुत्राकडे अशी वांटणी होऊन जॅकोबाइट पक्षाला कोणाचाच आधार राहिला नाहीं व त्यामुळें पुनः राज्यक्रान्ति होणें अशक्य झालें. अधिकारावरून निघालेल्या दुसऱ्या कांहीं व्हिग लोकांनीं पेट्रियट ( देशभक्त ) नांव घेऊन एक 'व्हिग विरोधी पक्ष' स्थापिला. "मला एकाद्यानें आचरटपणाची विनंती केली व ती मी मान्य केली नाहीं कीं, विनंती करणारा झाला 'पेट्रियट,' असा हा पेट्रियट होण्याचा सोपा मार्ग आहे" असें वॉल्पोल नेहमीं थट्टेनें म्हणे. या पेट्रियट पक्षांतील तरुण सभासदांसंबंधीं बोलतांना वॉल्पोल त्यांचा 'बॉय पेट्रियट' या नांवानें उल्लेख करी. जकातीच्या बिलाचे वेळीं या पेट्रियट पक्षानें मोठाच गिल्ला केला असून वॉल्पोलच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं तर याचा जोर फारच वाढला होता. येथें एक गोष्ट नमूद करून ठेवण्यासारखी आहे; ती ही कीं, प्रसिद्ध वुइल्यम पिट हा एक 'बॉय पेट्रियट' असून वॉल्पोलच्या लांचलुचपतीवर कडक टीका करीत असे.

---

# ४६ स्पेन व फ्रान्स यांशीं दोन हात.



१ **स्पेनविरुद्ध कुरापत**—स्पेनच्या दक्षिण अमेरिकेंत वसाहती होत्या. १७१३ सालीं झालेल्या युट्रेचच्या तहाप्रमाणें अमेरिकेंतील स्पॅनिश वसाहतींस वर्षांतून एक गलबतभर माल पुरविण्याची इंग्लिशांस सवलत मिळाली होती. परंतु हा व्यापार इतका फायदेशीर होता कीं, इंग्लिश व्यापाऱ्यांनीं तो तह लबाडीनें धाब्यावर बसवून जास्त गलबतें स्पॅनिश वसाहतींवर

उतरविण्याचा क्रम चालविला होता. परंतु स्पॅनिश सरकारनें बरींच वर्षे तिकडे दुर्लक्ष केलें. युट्रेचच्या तहाप्रमाणें युरोपची व्यवस्था लावावयाची असें इंग्लंड व फ्रान्स यांचें पक्कें मत असल्यामुळें त्या दोन्ही देशांत स्नेह होता. परंतु पुढें स्पेन व फ्रान्स येथील राजे बुर्बोन घराण्याचे असल्यानें त्या दोन्ही देशांत १७३३ सालीं 'गुप्त कुटुंबसंघ' झाला व मग स्पेनमध्यें इंग्लिश व्यापाऱ्यांच्या लबाडीविरुद्ध जोरानें ओरड सुरू होऊन, स्पॅनिश लोकांनीं इंग्लिश जहाजांची झडती घेण्यास सुरवात केली. त्यामुळें इंग्लिश लोकमत स्पेनविरुद्ध खूप खवळलें. १७३८ सालीं जेंकिन्स नांवाच्या कप्तानानें आपला कापलेला कान कॉमन्स सभेपुढें दाखविला व तो स्पॅनिश लोकांनीं कापल्याचें सांगून त्यानें स्पेनच्या जुलमाचें तिखटमीठ लावून वर्णन केलें! तेव्हां स्पेनशीं ताबडतोब युद्ध करण्याविषयीं सर्व देश-भर क्रोधोद्गार निघूं लागले. स्पेनच्या राजानें इंग्रजांचें नुकसान भरून देण्याकरितां चौदा हजार पौंड देण्याचें कबूल केलें. परंतु इंग्लिश गलबतांची कोणत्याही प्रकारची तपासणी न करितां तीं अमेरिकेला जाऊं द्यावीं असा इंग्रज व्यापाऱ्यांनीं हट्ट धरिला. ही अट कबूल करणें म्हणजे स्पेननें आपला व्यापार स्वतःच्या हातानें बुडविण्यासारखें होतें! सबब ही अट स्पेननें कबूल केली नाहीं व युद्धाचा पुकारा झाला. वॉल्पोलनें शांतता राखण्या-साठीं अत्यंत प्रयत्न केले, पण लोकक्षोभामुळें त्याला शेवटीं युद्धास संमति देणें भाग पडलें. युद्ध सुरू होणार ही बातमी ऐकून जिकडे तिकडे आनंदसूचक घंटा वाजूं लागल्या! त्या ऐकून वॉल्पोल म्हणाला, 'काय मूर्ख लोक हे! आज युद्ध सुरू झाल्याबद्दल आनंदसूचक घंटा वाजवीत आहेत; परंतु लवकरच हात चोळीत बसण्याची पाळी येईल याची त्यांस फिकीर वाटत नाहीं.'

**२ स्पेनशीं युद्ध**—१७३९ मध्यें व्हर्नान यास स्पॅनिश वसाहतींचीं बंदरें काबीज करण्यासाठीं पाठविण्यांत आलें. त्यानें पहिल्या सपाट्यास पोर्टो बेलो सर केलें (१७३९); परंतु कार्थागेना घेण्याच्या प्रयत्नांत त्याला अपयश येऊन त्याचे निम्मे लोक जाया झाले (१७४१). तेव्हां

त्याच्या साहाय्यार्थ अॅन्सन यास पाठविण्यांत आलें. अॅन्सनच्या हातून हें काम बरोबर झालें नाहीं. तथापि त्यानें अमेरिकेच्या दक्षिणेकडून पश्चिम किनारा गांठिला, व तिकडे स्पॅनिश लोकांकडून बरीच लूट मिळवून तो पॅसिफिक महासागरांतून केप ऑफ गुड होपच्या रस्त्यानें पृथ्वी-प्रदक्षिणा करून साडेतीन वर्षांनीं इंग्लंडांत परत आला. या युद्धांत एकंदरीनें इंग्रजांस वॉल्पोलनें म्हटल्याप्रमाणें अपयशच आलें. त्याचें खापर वॉल्पोलच्या माथींच फोडण्यांत येऊन नव्या निवडणुकींत कॉमन्स-सभेंतील त्याचें बहुमत नाहींसें झालें व प्रधानाच्या जागेचा त्याला राजीनामा द्यावा लागला ( १७४२ ). जॉर्ज राजानें त्याला ४००० पौंडांचें वार्षिक पेन्शन करून दिलें व अर्ल ऑफ ऑर्फड ही पदवी देऊन त्याला लॉर्ड बनविलें.

**३ नैतिक अवनति**—राजीनामा दिल्यानंतर तीन वर्षांनीं वॉल्पोल वारला. बावीस वर्षेंपर्यंत त्याच्या हातीं अधिकारसूत्रें होतीं. येवढ्या दीर्घकालांत देशाच्या परराष्ट्रीय व्यवहारांत त्यानें शांततेचें धोरण स्वीकारिलें व अन्तर्गत व्यवहारांत जेणेंकरून देशाची सांपत्तिक भरभराट होईल व कोणत्याही वर्गांत फारसा असंतोष पसरणार नाहीं अशा व्यवस्थेनें राज्यकारभार केला. तो आर्थिक व्यवस्थेंत हुशार असल्यामुळें या कामीं त्याला पूर्ण यश येऊन इंग्लंड देश सुसमृद्ध बनला व भावी युद्धांचा जबर खर्च चालविण्याची ऐपत त्याला आली. वॉल्पोलनें राज्यकारभारांत लांचलुचपतीचा उपयोग यथेच्छ केला. 'प्रत्येक मनुष्यास कांहीं ना कांहीं किंमत आहे' या अर्थाचें वाक्य तो नेहमीं म्हणत असे. यांत तरी पैसे द्यावे व मनुष्याचें मत आपल्यासारखें करून घ्यावें हाच आशय आहे. तथापि लांचलुचपतीचें त्याचें धोरण गर्ह्य ठरत नाहीं; कारण त्या काळीं लांचलुचपत घेण्याचा प्रचार सार्वत्रिक असे. दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दीपासून इंग्लंडांत चैनबाजी शिरली असून धार्मिक औदासिन्याचा जोरानें प्रसार झाला होता. जनता स्वार्थपरायण झाली असून उच्च भावनांचा लोप झाला होता. या अवनत स्थितींतून समाजास नवीन वळण लावण्याचें श्रेय जॉन वेस्ली या धर्मशील पुरुषाकडे आहे. त्यानें ऑक्सफर्डमधील आपला

अभ्यासक्रम संपतांच ( १७३८ ) हजारों व्याख्यानें देऊन सामान्य जनांत धार्मिक व नैतिक जागृति उत्पन्न केली. या कामांत त्याचा भाऊ चार्लस वेस्ली व मित्र उत्कृष्ट वक्ता व्हिट्फील्ड यांचें त्याला साहाय्य मिळालें. पहिल्यानें वेस्ली प्रस्थापित धर्मपंथास चिकटून होता. पण पुढें त्यानें आपल्या अनुयायांचा स्वतंत्र पंथ उभारिला. त्यास वेस्लीच्या पद्धतशीर वर्तनावरून पद्धतशीर पंथ ( Methodist ) असें नांव पडलें. वेस्लीच्या प्रयत्नानें देशांत धार्मिक व नैतिक भावनेचें वारें अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत खेळूं लागलें.

**४ ऑस्ट्रियन वारशाच्या युद्धाचीं कारणें**—इंग्लंडचें स्पेनशीं युद्ध सुरू झाल्यावर लवकरच ऑस्ट्रियाचा बादशहा सहावा चार्लस मरण पावला ( १७४० ), आणि त्याच्या राज्याच्या वारशासंबंधीं निरनिराळ्या देशांत तंटे लागून या छोट्या युद्धाचें एका वड्या युद्धांत रूपांतर झालें. चार्लसला पुत्र नसल्यामुळें त्यानें आपली मुलगी मराया थेरिसा हिला आपल्या पश्चात् गादी मिळावी म्हणून वारस-पत्र करून ठेविलें होतें ( १७२४ ). युरोपखंडांत सॅलिक कायद्याप्रमाणें सामान्यत्वेंकरून स्त्रियांना वारसा नसतो; तथापि अशा प्रकारें मृत्युपत्र करून सर्वांच्या संमतीनें जादा परवानगी देऊन स्त्रियांचा वारसा कायदेशीर ठरवितां येतो. या वारस-पत्राला चार्लसनें मोठी खटपट करून सर्व राष्ट्रांची संमति मिळविली होती ( १७३१ ). तथापि चार्लस मरतो तोंच त्याच्या मुलीचा हक्क बाजूला सारून प्रशिया, बव्हेरिया, फ्रान्स, स्पेन, सार्डिनिया इत्यादि सर्व लहानमोठ्या देशांचे राज्यकर्ते 'मराया थेरिसा'च्या विरुद्ध उठले व त्यांनीं ऑस्ट्रियाच्या ताब्यांतील एकएक प्रांत बळकाविण्याचा घाट घातला. बव्हेरियाचा ड्यूक हा सहाव्या चार्लसच्या वडील भावाच्या मुलीचा नवरा होता, व मुलीचा वारसा चालत असल्यास मराया थेरिसापेक्षां ऑस्ट्रियाचे गादीवर आपला हक्क अधिक पोंचतो असें म्हणूं लागला. प्रशियाच्या गादीवर 'महात्मा फ्रेडरिक' हा महत्त्वाकांक्षी राजा होता, त्यानें ऑस्ट्रियाच्या राज्यांतील सायलीशियावर अचानक स्वारी

करून तो जिंकिला. फ्रान्सची ऑस्ट्रियन नेदर्लंडवर दृष्टि होती व स्पेन व सार्डिनिया यांस इटलींत मुलूख मिळविण्याची इच्छा होती. तेव्हां हीं राष्ट्रें ऑस्ट्रियाविरुद्ध उठलीं. लवकरच बव्हेरियाच्या ड्यूकची बादशाही पदावर निवडणूक होऊन मराया थेरिसाच्याविरुद्ध पक्षास अधिकच जोर आला. इंग्लंड व हॉलंड हीं दोन राष्ट्रें मात्र मराया थेरिसाच्या बाजूला झालीं.

**५ इंग्लंडविरुद्ध फ्रान्स**—यांत इंग्लंडनें मराया थेरिसाची बाजू घेतली यास एक बलवत्तर कारण होतें. इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही राष्ट्रांचे अमेरिका व आशिया या दोन्ही खंडांत मोठमोठे प्रांत होते व तिकडे आणखीहि मुलूख मिळण्याची त्यांस पुष्कळ आशा होती, व त्यामुळें तिकडे साम्राज्यविस्तार होण्याची संधि होती. स्पॅनिश वारशाच्या युद्धाचे वेळींही इंग्लंड–फ्रान्सांची ही साम्राज्याविस्ताराकरितां चढाओढ दिसून आली होती. परंतु त्यापेक्षां आतां साम्राज्याची कल्पना त्या दोन्ही राष्ट्रांस जास्त स्पष्टपणें झाली असून या युरोपियन युद्धाच्या पडद्याआडून त्या दोघांनीं आपल्या साम्राज्याकरितां भांडण करण्याचा उपक्रम केला! तेव्हां या दोन राष्ट्रांच्या नेतृत्वाखालीं दोन तट झाले. इंग्लंडकडे हॉलंड ऑस्ट्रिया, सार्डिनिया व सॅक्सनी हीं राष्ट्रें असून फ्रान्सकडे प्रशिया, बव्हेरिया, स्पेन व रशिया हीं होतीं. मराया थेरिसानें इटलींतील मिलन प्रांतांतील कांहीं भाग देऊन सार्डिनियास आपल्या पक्षाकडे वळविलें होतें व इंग्लंडच्या भिडेनें प्रशियाचें 'सायलीशिया' वरील स्वामित्व कबूल करून त्यास विरुद्ध पक्षांतून अंग काढून घेण्यास तिनें दोनदां लाविलें होतें. आपली समुद्रावरील सत्ता अखंड राखून आपला व्यापार व वसाहती यांचें रक्षण करावें हा इंग्रजांचा हेतु होता. ऑस्ट्रियाचें सामर्थ्य कमी करून प्रशिया व बव्हेरिया या दोघांस सबळ करावें, इंग्लिश राजाचा हॅनोव्हर प्रांत हिसकावून घ्यावा व नेदर्लंड्स जिंकावें हा फ्रान्सचा उद्देश होता.

**६ युद्धाची हकीकत व तह**—बव्हेरियामध्यें डेटिंगेन येथें इंग्रज व ऑस्ट्रियन फौजांनीं फ्रेंचांवर मोठा जय मिळविला (१७४३). या लढाईंत दुसरा जॉर्ज स्वतः हजर होता. ही लढाई चालू असतां जॉर्ज

घोड्यावरून उतरला व आपली तरवार उपसून मोठ्यानें म्हणाला, " आतां आपण मर्दासारखे लढू म्हणजे फ्रेंच पळून जातील !" यानंतर सैन्यानें मोठा हल्ला चढविला व शत्रूस पळावयास लाविलें. इंग्लंडचा राजा स्वतः लढाईवर गेल्याचा हाच शेवटचा प्रसंग होय. यापुढें कोणी ही इंग्लिश राजा रणभूमीवर गेला नाहीं ! जॉर्जचा दुसरा मुलगा ड्यूक ऑफ कंबरलंड ऑस्ट्रियन नेदर्लँड्सचें रक्षण करीत असतां त्याचा फ्रेंचांनीं १७४५ त फॉन्टेनॉय येथें पराभव केला, व नंतर बहुतेक नेदर्लँड्स त्यांनीं जिंकून घेतलीं. अमेरिकेंत व हिंदुस्थानांतही लढाई सुरू झाली होतीच. न्यू इंग्लंड मधील इंग्लिश वसाहतवाल्यांनीं केप ब्रेटनवरचा लुइस्बर्ग हा किल्ला ( अमेरिकेंतील जिब्रॉल्टर ) फ्रेंचांपासून घेतला ( १७४५ ). समुद्रावर दोनदां फ्रेंचांचा पराभव करून इंग्रज आरमारानें आपलें वर्चस्व राखिलें (१७४७). हिंदुस्थानांत मात्र फ्रेंचांचा जय झाला. मॉरिशसचा लाबर्डोनें यानें इंग्रजांच्या ताब्यांतील मद्रासवर चाल करून तें शहर सर केलें ( १६४६ ). पण इतक्यांत स्पेन व रशिया हीं फ्रान्सला सोडून जाऊं लागलीं व पैशाचीही टंचाई भासूं लागली. मराया थेरिसाचा नवरा टस्कनांचा ड्यूक याची जर्मन बादशहाच्या पदावर नेमणूक झाल्यामुळें सर्व भांडणाच मूळच खुटल्यासारखें झालें ( १७४५ ). शेवटीं १७४८ त एलाशापेल येथें तह ठरला. त्यानें या युद्धांत इंग्लंड व फ्रान्स यांनीं एकमेकाचे जिंकलेले प्रांत परत करण्याचें मान्य केलें. फ्रान्सनें जेम्सच्या वारसास आश्रय न देण्याची अट कबूल केली. प्रशियानें ऑस्ट्रियाचा सायलीशिया प्रांत बळकाविला होता तो मात्र त्यानें परत दिला नाहीं.

---

## ४७ दुसरें जॅकोबाइट बंड. १७४५–४६.



**१ चार्लस एडवर्ड स्कॉटलंडांत गेला**—फ्रान्स व इंग्लंड यांजमध्यें मागील प्रकरणांत सांगितलेलें ऑस्ट्रियन वारशाबद्दलचें युद्ध

चालू असतां जेम्सचा मुलगा ( दुसऱ्या जेम्सचा नातू ) चार्लस एडवर्ड यानें इंग्लंडची गादी परत मिळविण्याचा प्रयत्न केला. तो दोन जहाजें व सत्तावीस लोक बरोबर घेऊन फ्रान्सांतून निघाला. वाटेंत त्याची व एका ब्रिटिश लढाऊ जहाजाची गांठ पडून त्याच्या बरोबरच्या दोन जहाजांपैकीं एका जहाजास फ्रान्सला परत जावें लागलें. मग चार्लसनें एका जहाजानिशीं हेब्रिडीज बेटाकडे कसा तरी मार्ग सुधारला. चार्लस स्कॉटलंडांत पोहोंचल्यावर त्याला मदत करण्यासाठीं फ्रान्सच्या किनाऱ्यावरून पंधरा हजार सैन्य निघणार होतें. पण वादळ सुटून त्यांचीं जहाजें किनाऱ्याला लागून फुटलीं. लवकर नवीं तयार होणें अशक्य असल्यामुळें त्यांचा बेत रहित झाला. फ्रेंच सेनापति विनोदानें म्हणाला " अजून वारे कोठें जॅकोबाइट झाले आहेत ? " इन्व्हर्नेसच्या किनाऱ्यावर उतरून ग्लेन फिनन येथें चार्लसनें आपलें निशाण उभारलें. लागलीच हायलंड्सचे बरेच सरदार त्याला येऊन मिळाले. चार्लसचें वय त्यावेळीं पंचवीस वर्षांचें असून आपण जय मिळवूंच मिळवूं असा उत्साह व विश्वास त्यास वाटत होता. राजघराण्यास शोभेलशी त्याची चालचलणूक असून धैर्य व वक्तृत्व हीं त्याच्या ठिकाणीं उत्कटत्वानें वास करीत होतीं. शरीरानेंही तो उंच, सुबद्ध व चपल होता. यामुळें हायलंडर लोकांची त्याच्या ठिकाणीं तेव्हांच भक्ति बसली.

**२ सरकारी सैन्याचा पराभव**—ग्लेन फिननहून १६०० लोकांनिशीं जेव्हां चार्लस दक्षिणेकडे चालून येऊं लागला तेव्हां स्कॉटिश सरकारची त्याच्याशीं लढाई देण्यास मुळींच तयारी नव्हती. सारे तीन हजार शिपायी होते. त्यांना बरोबर घेऊन सेनापति कोप बंडाचा मूळ जागींच मोड करावा या हेतूनें स्टर्लिंगहून उत्तरेकडे कूच करून जाऊं लागला. यावेळी त्यानें एक चूक केली. ती ही कीं, दक्षिणेकडील कौन्टींच्या संरक्षणास त्यानें मुळींच फौज ठेविली नाहीं. या त्याच्या चुकीपासून आपला फायदा करून घेण्यासाठीं चार्लस हायलंड्समधून एकदम खालीं उतरून पर्थला आला. तेथें त्याला आणखी बरेच लोक

मिळाले. मग तसाच तो एडिन्बरोस आला व त्यानें आपल्या बापाच्या नांवानें द्वाही फिरवून हॉलिरूड राजवाड्यांत तळ दिला. त्यावर आपलें सर्व सैन्य ॲबर्डीन येथें बोटींत घालून कोप डन्बार येथें येऊन उतरला व एडिन्बरोवर चाल करून येऊं लागला. चार्लसही त्याजवर सुमारें तीन हजार सैन्यानिशीं चालून गेला. दोन्ही सैन्यांची गांठ प्रेस्टनपॅन्स येथें पडली. पहाटेच्या वेळीं हायलंडर लोकांनीं सरकारी सैन्यावर असा जोराचा हल्ला केला कीं, वाऱ्यानें भूस जसें पार नाहींसें व्हावें तशी सरकारी सैन्याची अवस्था झाली! दोनशें लोक वांचले, बाकी सर्व गारद झाले. सरकारी सैन्याचा दारुगोळा, दाणावैरण, निशाणें व खजिना हीं सर्व चार्लसच्या हातीं आलीं! आतांपर्यंत उदासीन राहिलेले स्कॉटलंडांतील सरदारही चार्लसला येऊन मिळाले व सर्व स्कॉटलंड त्याच्या कब्जांत आलें! (२१ सप्टेंबर, १७४५)!

**३ चार्लसच्या अडचणी**—प्रेस्टनपॅन्सची लढाई जिंकल्यावर चार्लस तसाच जर इंग्लंडास येता तर इंग्लंडही कदाचित् सर झालें असतें! पण एडिन्बरोचा बालेकिल्ला अजून भांडत होता तो सर करण्याकरितां व आणखी फौज जमविण्याकरितां तो एडिन्बरोस परत गेला. अशा रीतीनें सहा आठवडे घालविल्यावर पांच हजार लोक बरोबर घेऊन तो पश्चिमेकडील वाटेनें इंग्लंडवर चालून येऊं लागला. कार्लाइल, लँक्यास्टर, मँचेस्टर या गांवांवरून येत येत तो लंडनहून १२७ मैलांवर असलेल्या डार्बी शहरापर्यंत आला. इंग्लंडांत ठिकठिकाणीं जरी त्याचा आदरसत्कार झाला तरी मँचेस्टर शिवाय इतर कोणत्याही ठिकाणीं त्याच्या बाजूस लोक मिळाले नाहींत. तेथें मात्र कर्नल टाउन्लेच्या हाताखालीं दोनशें लोक त्याला मिळाले. इंग्लिशांची उदासीनता पाहून हायलंडर लोकांना परत स्कॉटलंडांत जावें असें वाटूं लागलें. इकडे यॉर्कशायरमधून जनरल वेडच्या हाताखालीं मोठें सैन्य चालून येत होतें. कंबरलंड तितकेंच लोक बरोबर घेऊन दक्षिणेकडून चालून येत होता. बरें, या दोन्ही सैन्यांस झुकांडी देऊन एकदम

लंडनवर चालून जावयाचें चार्लसनें ठरवावें तर तिकडेही वाटेंत फिंचल-कॉमनवर एक भलें मोठें सैन्य त्याचा समाचार घेण्यास बसलें होतें.

४ **कलोडनमूरची लढाई**—तेव्हां या पेंचांतून निसटण्यास स्कॉटलंडांत परत जाण्याशिवाय उपाय नाहीं असें पाहून चार्लसनें परत जाण्याचें ठरविलें. परत जातांनाही त्यानें आपलें सैन्य व्यवस्थेनें चालविलें होतें. त्यानें एस्क नदी २० डिसेंबरला ओलांडली व थोड्याच दिवसांत तो ग्लास्गोला पोंचला; मग हायलंडरनीं स्टर्लिंगला वेढा घातला व तें शहर सर केलें. परंतु हा जय मिळाला तरी हायलंडर लोकांचें धैर्य व उत्साह नाहींतशीं झालीं होतीं व त्यांच्यापैकीं बरेच लोक डोंगराळ मुलुखांतील आपल्या गांवांकडे निघून गेले. पुढें ड्यूक ऑफ कंबर्लंड आपल्या सैन्यासह पाठलाग करीत आला; तेव्हां स्टर्लिंग-मधीलही लोक वर हायलंड्समध्यें ( डोंगराळ मुलुख ) पळून गेले. तीन महिन्यांनीं कंबर्लंड व चार्लसचें सैन्य यांची इन्व्हर्नेसजवळ कलो-डनमूर येथें गांठ पडली. लढाई सुरू होऊन एका तासाच्या आंत चार्लसच्या सैन्याची धूळधाण उडून तें दशदिशा पळत सुटलें ( १७४६ एप्रिल ). कंबर्लंड क्रूर असल्यामुळें हायलंड्समधील खेडेगांवांतून जबर शिक्षा ठोठावून पुष्कळ निरपराधी लोकासही त्यानें देहान्त प्रायश्चित्त दिलें. त्यावरून तिकडे लोक त्याला खाटीक (Butcher) म्हणूं लागले.

५ **चार्लसची दुर्दशा**—दुर्दैवी चार्लस डोंगरांत पळून गेला. पांच महिनेपर्यंत लपत छपत हायलंड्समधील खानदानीच्या लोकांवर विश्वास ठेवून त्यानें तेथें काढिले. शेवटीं एका फ्रेंच जहाजांत बसून तो फ्रान्सला पळून गेला. दोन इंग्लिश जहाजें त्याचा पाठलाग करीत होतीं; पण सुदैवानें त्यांच्या हातीं न लागतां फ्लोरा मॅकडोनल्ड या हायलंडर वीरस्त्रीच्या धाडसी साहाय्यानें फ्रान्समधील ब्रिटनी प्रांतांत तो सुखरूप जाऊन उतरला. हायलंड्समध्यें असतां त्याचें शीर जो आणील त्यास सरकारनें ३० हजार पौंडांचें बक्षीस लाविलें होतें, पण कोणाही हायलं-डरनें विश्वासघात करून त्याला पकडून दिलें नाहीं ! पुढें एलाशापे-

लच्या तहानें चार्लस याची फ्रान्स मधून उचलबांगडी झाली (१७४८); तेव्हां तो रोमला जाऊन राहिला. १७६६ त त्याचा बाप जेम्स वारल्यावर तो आपणास इंग्लंडचा राजा म्हणवीत असे. १७८८ मध्यें रोम येथें हा शूर पण व्यसनी व दुर्दैवी राजपुत्र मरण पावला. त्याचा भाऊ हेन्री ' कार्डिनल यॉर्क ' हा तिसऱ्या जॉर्जचें पेन्शन खाऊन होता. तो आपणांस नववा हेन्री म्हणवीत असे. १८०७ सालीं त्याला मृत्यु येऊन स्टुअर्ट वंश नाहींसा झाला.

**६ हायलंड्‌मधील नवी व्यवस्था**—बंडांत सामील झालेल्या लोकांस जबर शिक्षा ठोठावण्यांत आल्या. तीन सरदार व ऱ्याहत्तर सरकारी बडे कामगार यांना देहान्त प्रायश्चित्त देण्यांत आलें. पण बंडास एक वर्ष झाल्यावर माफीचा कायदा पास होऊन इतर बंडवाल्यांस माफी देण्यांत आली. हायलंड्‌सचे कायदे व रिवाज यांचा फायदा जॅकोबाइट लोकांच्या कारस्थानांस यापुढें मिळूं नये यासाठीं सरकारनें नवी व्यवस्था केली. सरंजामी पद्धत ( Feudal system ) जरी इतर ठिकाणीं बंद झाली होती तरी हायलंड्‌समध्यें सरदार लोक अजूनही कुळांस लष्करी नोकरीचा मोबदला मिळण्याच्या करारानेंच जमिनी लावून देत. तेथील लोकांचा पोषाकही लष्करी धर्तीवर असून त्यांच्या निरनिराळ्या जातींतून लष्करी तेज चमकत होतें. या दोन्ही गोष्टी बंद करण्याचें सरकारनें ठरवून त्यांची सरंजामी पद्धति मोडून टाकिली, लष्करी पोषाक करावयाचा नाहीं असा निर्बंध घातला व त्यांच्या सरदारांचे बरेचसे हक्क काढून घेतले. पण हायलंड्‌समध्यें खरी शांतता नांदावी व सरकारचेंही बल वाढावें असा एक उपाय लवकरच निघाला. इंग्लंडच्या लष्करांत हायलंडरना घेण्याचें ठरविण्यांत येऊन त्यांच्या जादा पलटणीही बनविल्या गेल्या. यामुळें हायलंडर लोकांच्या बलाचा, शौर्याचा व कडवेगिरीचा साम्राज्यास अतोनात फायदा होऊन हायलंड्‌समध्येंही खरीखुरी शांतता व समाधान नांदूं लागलें!

---

## ४८ साम्राज्य कोणाचें, फ्रान्सचें कीं इंग्लंडचें ?



१ **चुरस** - इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही देशांच्या अमेरिकेंत वसाहती असून हिंदुस्थानांतही दोन्ही राष्ट्रांचीं ठाणीं होतीं. त्यामुळें व्यापाराचा फायदा दोन्ही राष्ट्रांस मोठाच होत असे; व त्या दोघांत सारखी चुरस असे. परंतु अमेरिकेंतील वसाहती व हिंदुस्थानांतील किरकोळ ठाणीं हातीं ठेवून त्या दोन्ही देशांतील व्यापार आपल्या हातीं ठेवावयाचा इतकें साधें स्वरूप या प्रश्नास अलीकडे राहिलें नव्हतें. पुढें मागें संबंध अमेरिकेचें राज्य व सर्व हिंदुस्थानची मालकी आपल्यापैकीं कोणाकडे तरी येणार हें या दोन्ही राष्ट्रांस कळून चुकलें होतें. तेव्हां साहाजिकपणेंच ही मालकी आपल्याकडे यावी यासाठीं आपल्या प्रतिस्पर्ध्याचें त्या देशांतून उच्चाटन करण्यासाठीं हीं दोन्ही राष्ट्रें अलीकडे जिवापाड मेहनत करूं लागलीं. १७५६ सालीं या दोन्ही राष्ट्रांत एक महायुद्ध सुरू झालें. युद्धाचीं रणक्षेत्रें हिंदुस्थान, अमेरिका व युरोप या तिन्ही ठिकाणीं होतीं. त्याचें कारण अर्थात् ही साम्राज्यतृष्णाच होय हें निराळें सांगणें नको. तथापि या युद्धाचीं तात्कालिक कारणें काय झालीं व या तिन्ही ठिकाणीं युद्ध कसकसें होत गेलें हें कळणें अवश्य आहे. तेव्हां त्याचेंच वर्णन आतां करूं.

२ **दक्षिण हिंदुस्थानांतील हालचाली**—हिंदुस्थानांत इंग्रजांचीं मुख्य ठाणीं मुंबई, मद्रास व कलकत्ता येथें होतीं, व तोडीस तोड म्हणून फ्रेंचांचीं माही, पाँडिचरी व चंद्रनगर हीं ठाणीं होतीं. इ. स. १७४८ पर्यंत आपला व्यापार वाढावा हाच या दोन्ही राष्ट्रांचा हिंदुस्थानासंबंधीं उद्देश असून आपल्या व्यापाराचें रक्षण व्हावें या हेतूनेंच हीं ठाणीं त्यांनीं स्थापिलीं होतीं. पण १७४८ सालीं हैद्राबादचा निजाम निजामुल्मुल्क वारला व त्याच्या राज्यांत बखेडे उत्पन्न झाले. निजामु-

त्मुल्कानें कर्नाटकांतील नबाबाच्या गादीवर अन्वरुद्दिन यास बसविलें होतें. परंतु चंदासाहेब नांवाचा एक इसम अर्काटच्या जुन्या नबाबाच्या घराण्याशीं माझा संबंध आहे असें म्हणून अर्काटच्या ( कर्नाटकची राजधानी ) गादीवर आपला हक्क सांगत असे. डुप्ले हा या वेळीं फ्रेंचांचा पाँडिचरी येथील गव्हर्नर होता. त्यानें चंदासाहेबास साहाय्य करण्याचें ठरविलें. हैद्राबादच्या गादीवर निजामुल्मुल्काच्या मागून नासीरजंग हा त्याचा मुलगा बसला; परंतु निजामुल्मुल्काच्या मुलीचा मुलगा मुझफरजंग हा ती गादी स्वतःस मिळविण्याच्या विचारांत होता. त्यालाही साहाय्य करण्याचें डुप्लेनें ठरविलें. पुढें फ्रेंचांची फौज बरोबर घेऊन चंदासाहेब अन्वरुद्दिनावर चालून गेला. अंबूर येथें लढाई होऊन अन्वरुद्दिन मारला गेला व त्याचा मुलगा महंमदअल्ली त्रिचनापल्लीस पळून गेला. मग चंदासाहेबास कर्नाटकाची नबाबगिरी मिळाली. इतक्यांत नासीरजंग हा कर्नाटकावर चालून येत होता. त्याचा खून होऊन मुझफरजंगास हैद्राबादची निजामी मिळाली. मग काय विचारितां ? डुप्लेच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. इकडील राजेलोकांत वारसाचे तंटे उपस्थित झाले असतां एकाचा पक्ष घेऊन त्यास राज्यावर स्थिर करावयाचें व केलेल्या साहाय्याबद्दल त्याच्या राज्यांतील मुलुखाची बिदागी उपटावयाची; अशा रीतीनें 'दोघांचें भांडण तिसऱ्याचा लाभ' या न्यायानें शेवटीं सर्व हिंदुस्थानचें राज्य आपल्या घशांत टाकावयाचें ही कल्पनाच या आनंदाच्या मुळाशीं होती. परंतु मद्रासचे इंग्रज स्वतःस मुलुखाचा वांटा मिळाल्याशिवाय स्वस्थ बसण्यास कसे राजी होणार ? अन्वरुद्दिनाचा मुलगा महंमदअल्ली त्रिचनापल्लीला जाऊन बसला होता, त्यामुळें चंदासाहेबानें त्रिचनापल्लीस वेढा घातला. इंग्रजांच्या मद्रास येथील वखारींत क्लाइव्ह नांवाचा एक हूड कारकून होता, त्यानें चंदासाहेबाच्या राजधानीचें शहर अर्काट हें आपण घ्यावें म्हणजे चंदासाहेब परत येईल व महंमदअल्ली मोकळा होईल असें ठरवून अर्काट काबीज केलें ( १७५१ ). चंदासाहेब परत आल्यावर त्याचा त्यानें पराभव केला व महंमदअल्लीस अर्काटचा नबाब करून इंग्रजांचें वर्चस्व कर्नाटकांत

बसविलें ( १७५२ ). अशा रीतीनें हे परकीय व्यापारी लोक हिंदुस्थानांत राज्याच्या घडामोडी करावयास लागले व कर्नाटकांत क्लाइव्हच्या धाडसामुळें इंग्रजांची सरशी झाली.

**३ बंगालच्या सुभेदाराशीं तंटा**—दिल्लीचे मोंगल बादशहा हे या वेळीं नामधारी असून हैद्राबादच्या निजामाप्रमाणें बंगालचा सुभेदारही स्वतंत्र असे. मुर्शिदाबाद हें बंगाल सुभ्याचें राजधानीचें स्थान असून सुराजुद्दौला हा या वेळीं बंगालचा नबाब होता. इंग्रजांची कलकत्त्याची वखार त्याच्याच राज्यांत असून त्याच्यापासून इंग्रजांनीं बऱ्याच व्यापाराच्या सवलती मिळविल्या होत्या. याच सुमारास नबाबास चीड येण्यासारख्या दोन गोष्टी इंग्रजांनीं केल्या. राजवल्लभ नांवाच्या एका श्रीमंत व्यापाऱ्यावर सुराजुद्दौल्याचा राग झाला होता; त्यानें आपला मुलगा किसनदास यास आपली बहुतेक सगळी दौलत बरोबर देऊन कलकत्यास पाठविलें व इंग्रजांनीं नबाबाच्या निषेधास न जुमानतां त्यास तेथें राहूं दिलें. दुसरें असें कीं, युरोपांत लढाई सुरू होणार तेव्हां ठाण्यांना तटबंदी करून तयारी ठेवावी असा इंग्लंडहून हुकूम आल्यावरून इंग्रजांनीं सुराजुद्दौल्यास परवानगी न विचारतांच कलकत्त्यास नदीच्या बाजूनें तटबंदी केली. इंग्रजांच्या उद्धट वर्तनानें नबाब अगोदरच चिडला होता. तशांत हे व्यापारी आपल्या राजकीय सत्तेसही जुमानीत नाहींत हें पाहून त्यानें इंग्रजांस चांगलीच तंबी पोंचाविण्याचा निश्चय केला.

**४ इंग्रजांचा पराभव**—त्यानें कासीमबझार येथील इंग्रजांच्या वखारीवर चाल केली. तेथें इंग्रजांनीं ' यापुढें आम्ही नीट वागूं ' असा करारनामा लिहून दिला. पण तो त्यांनीं पाळला नाहीं. मग नबाबानें कलकत्त्यावर स्वारी केली. तेव्हां तेथील इंग्रज अगदीं घाबरून गेले. त्यांच्या गव्हरनराची तर बोबडीच वळली. बायकामुलें व इतर भ्याड लोक बरोबर घेऊन तो गलबतांत बसला, व पळून जाऊन त्यानें फुल्टा येथें मुक्काम केला. मागें एकशें सेहेचाळीस इंग्रज कलकत्त्याच्या किल्ल्यांत राहिले होते. त्यांना पकडून ते दंगा करतील या भीतीनें एका भल्या

भक्कम खोलींत कोंडिलें. परंतु या बंदीवासाचा भयंकर परिणाम होऊन तेवीसच माणसें दुसरे दिवशीं सकाळीं जिवंत बाहेर निघालीं ! कलकत्त्याप्रमाणें डाका, बालासोर वगैरे ठिकाणीं इंग्रजांच्या वसाहती होत्या त्यासुद्धां नवाबाच्या स्वाधीन झाल्या. या सर्व गोष्टींत नवाबास फ्रेंचांची फूस होती असें इंग्रज म्हणतात. तें कांहीं असो. १७५६ च्या जून महिन्यांत इंग्रजांची बंगाल्यांत चांगलीच फजीती झाली.

**५ अमेरिकेंतील फ्रेंचांची महत्त्वाकांक्षा**—अमेरिकेंत अॅलेगेनी पर्वताच्या पूर्वेस, उत्तरेस मेनपासून ते दक्षिणेस जॉर्जियापर्यंत इंग्रजांच्या तेरा वसाहती झाल्या होत्या. त्या आपला राज्यकारभार स्वतंत्रपणें चालवीत असून प्रत्येक वसाहतीवर एका गव्हर्नराची मात्र नेमणूक इंग्लंडांतून होई. या वसाहतींपासून इंग्लंडास व्यापाराचा मोठाच फायदा असे. इंग्रजांच्या वसाहतींच्या उत्तरेला क्यानडा प्रांत आहे. तेथें फ्रेंचांच्या वसाहती होत्या. अॅलेगेनी पर्वताच्या पश्चिमेला बऱ्याच अंतरावर मिसिसिपी नदी आहे. तिच्या मुखाशीं दक्षिणेस फ्रेंचांची लुइझिआना ही वसाहत होती. तेव्हां लुइझिआनापासून उत्तरेकडे अॅलेगेनी पर्वताच्या पश्चिमेचा मिसिसिपीपर्यंतचा क्यानडाच्या दक्षिण हद्दीपावेतों सर्व मुलूख आमचा आहे असें फ्रेंच म्हणत. हा आपला हक्क शाबूत राखण्यासाठीं फ्रेंचांनीं अॅलेगेनी पर्वताच्या पश्चिमेस लुइझिआनापर्यंत एक लांब किल्ल्यांची रांग बांधून काढिली. व्हर्जिनिया, मॅसच्युसेट्स, जॉर्जिया, वगैरे सर्व इंग्लिश वसाहतींतून इंग्रजांस हुसकून लावून तेथें 'न्यू फ्रान्स' नांवाची वसाहत स्थापावयाची असाही फ्रेंचांचा गुप्त हेतु होता !

**६ फ्रेंचांविरुद्ध इंग्रज**—हीं फ्रेंचांचीं कृत्यें पाहून इंग्रज वसाहतवाल्यांस राग आला. अॅलेगेनीच्या पश्चिमेस ओहिओ नदीच्या खोऱ्यांत वसाहत करण्यासाठीं कांहीं मंडळी तयार झाली. त्यांचा प्रसिद्ध जॉर्ज वॉशिंग्टन हा म्होरक्या असून ड्यूकेन नांवाच्या ओहिओवर बांधलेल्या फ्रेंच किल्ल्यावर ते चालून गेले. तेथें चकमक उडून इंग्रज तसेच माघारे आले ( १७५४ ). पुढील सालीं वसाहतवाल्यांची अब्रू राखण्यासाठीं

इंग्लंडांतून ब्रॅडॉकच्या हाताखालीं फौज पाठविण्यांत आली. ब्रॅडॉकनेंही ड्यूकेन किल्ल्यावर हल्ला केला. पण त्याला अडचणीच्या जागेंत गांठून फ्रेंच व रेड इंडियन लोकांनीं असा मारा केला कीं, खुद्द ब्रॅडॉक पडला व त्याचे सातशें लोक जाया झाले. ब्रॅडॉकला अमेरिकेंतील जंगलांतून लढण्याची मुळींच सवय नव्हती व जर माहितगार वॉशिंग्टन हजर नसता तर मोहिमेवर गेलेलें सर्वच सैन्य कामास गेलें असतें ( १७५६ ). कॅनडा व ओहिओचें खोरें या दोन स्थळांतील संबंध तोडण्यासाठीं नायगारा किल्ल्यावर एक इंग्रज सैन्याची टोळी पाठविण्यांत आली होती. पण ओंटारिओ सरोवराजवळील ऑस्वेगो ठाण्यापर्यंत गेल्याबरोबर त्या लोकांचा धीर सुटून ते पुढेंच गेले नाहींत. तिसऱ्या एका सैन्याची पुढें क्विबेकवर चालून जाण्यासाठीं शॅम्प्लेन सरोवराच्या उत्तर टोकाजवळील क्राउन पॉइंट सर करण्याच्या कामावर योजना झाली होती. पण या मोहिमेचा परिणाम इंग्रजांनीं त्या सरोवराच्या दक्षिणेस वुइल्यम हेन्री किल्ला बांधला व तोडीस तोड म्हणून त्याच्या समोर फ्रेंचांनीं टिकोन्डेरोगा बांधला इतकाच झाला. अशा रीतीनें हिंदुस्थानाप्रमाणें अमेरिकेंतही १७५६ त इंग्रजांची बाजू पडतीच होती.

**७ युद्धाचीं युरोपांतील कारणें**—आतां युरोपांत युद्ध कसें सुरू झालें हें पहावयाचें. एलाशापेलच्या ( १७४८ ) तहांत सर्व राष्ट्रांनीं लढाईत जिंकलेले प्रांत परत दिले; पण प्रशियाचा फ्रेडरिक यानें बळकाविलेला सायलीशिया प्रांत ऑस्ट्रियास परत दिला नाहीं. फ्रेडरिकची आपलें राज्य वाढविण्याविषयीं जबर महत्त्वाकांक्षा होती. फ्रान्सला त्याचें वैषम्य वाटून ऑस्ट्रियाशीं एक व रशिया, स्वीडन, सॅक्सनी आणि पोलंड यांशीं एक, असे दोन गुप्त तह फ्रेंच सरकारनें प्रशियाचे विभाग करून सर्वांनीं वाटून घेण्यासाठीं केले. हें फ्रेडरिक दी ग्रेट यास कळलें तेव्हां त्यानें सॅक्सनीची राजधानी जें ड्रेस्डेन शहर त्यावर स्वारी केली व येथूनच या महायुद्धास सुरुवात झाली ( १७५६ आगष्ट ). इंग्लंडच्या राजाचा हॅनोव्हर प्रांत लाटण्याचा फ्रान्सचा बेत होता. शिवाय हिंदुस्थान व अमेरिका या दोन्ही देशांत इंग्लंड व फ्रान्स या दोन्हीं राष्ट्रांमध्यें युद्ध

सुरू झालें असल्यामुळें इंग्लंडनें प्रशियाची बाजू उचलली. युरोपांतील युद्धांत हॅनोव्हर संस्थान फ्रेंचांना घेऊं न देणें व आपली समुद्रावरील ठाणीं सुरक्षित ठेवणें येवढेंच इंग्रजांच्या सैन्यापुढें काम होतें. परंतु या दोन्ही कामीं पहिल्यानें त्यांना अपयशच आलें.

**८ युद्धास आरंभ**——या युद्धांत इंग्रज आपल्या विरुद्ध बाजूस मिळणार हें फ्रेंचांनीं पक्कें ओळखिलें होतें, व म्हणून अगदीं आरंभीं त्यांनीं इंग्रजांच्या मिनोर्का बेटावर फौज पाठविली व तें सर केलें. इंग्रजांनीं तें बेट परत मिळविण्यासाठीं अॅड्मिरल बिंग याच्या हाताखालीं आरमार पाठविलें ( १७५६ मे ). फ्रेंचाशीं एक चकमक झाली, तींत बिंगनें फ्रेंच आरमारास तसेंच जाऊं दिलें व पुढें जमीनीवरच्या फौजांनीं चांगला वेढा दिला असतांही समुद्रांतून किल्ल्यावर हल्ला करण्याऐवजीं बिंग तसाच जहाजें दुरुस्त करण्यासाठीं व लोकांस विश्रांति देऊन ताजेतवाने करण्यासाठीं जिब्रॉल्टरला परत आला ! या बिंगच्या घोडचुकीमुळें मिनोर्का आपल्या हातचें गेलें असें पाहून इंग्रजांस अत्यंत संताप आला. बिंगवर भ्याडपणाच्या आरोपावरून खटला करण्यांत येऊन पोर्टस्मथ बंदरांत 'मॉनर्क' जहाजावर त्यास फांशीं देण्यांत आलें; तेव्हां लोकांचा संताप कांहींसा शांत झाला ( १७५७ मार्च ). इकडे युरोपांत हॅनोव्हर संस्थानचें रक्षण करण्यासाठीं ड्यूक ऑफ कंबर्लंड यास ३०००० सैन्य बरोबर देऊन पाठविण्यांत आलें होतें. १७५७ त फ्रेडरिकचा प्रेग येथें जय होऊन बोहिमिया प्रांत प्रशियाच्या ताब्यांत आला. पण हें यश फार वेळ टिकलें नाहीं. त्याचा कोलिन येथें फारच मोठा पराजय झाला व त्याला फिरून सॅक्सनींत हटावें लागलें. इकडे कंबर्लंड हॅनोव्हरचें संरक्षण करण्यासाठीं वेसरच्या तीरीं तळ देऊन होता. त्यालाही जंगी फ्रेंच सैन्यापुढें हटत हटत एल्बच्या मुखापर्यंत मागें सरकावें लागलें. इतकेंच नव्हे तर सरते शेवटीं त्याला क्लॉस्टर-सेव्हनच्या करारनाम्यावर सही करून आपल्या सर्व सैन्यास रजा देण्याच्या अटीस कबुली द्यावी लागली ( १७५७ जुलै ). अमेरिका, हिंदुस्थान व युरोप या तिन्ही ठिकाणीं इंग्लंडची झालेली नाचक्की इतकी भयंकर होती कीं, मोठमोठे शांत व विचारी

मुत्सद्दीही निराश झाले व जगांत फ्रान्सचीच सरशी होऊन इंग्लंड पार मागें पडणार असे उद्गार मोठ्या उद्वेगानें काढूं लागले. लॉर्ड चेस्टरफील्ड निराशेनें म्हणाला "इंग्लंड हें मुळीं एक राष्ट्रच नाहीं."

---

## ४९ साम्राज्य इंग्लंडला मिळालें ! !



१ **वॉलपोलनंतर**—वॉल्पोलच्या मागून व्हिग प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें. मुख्य सूत्रें कार्टेरेटच्या हातीं होतीं. तो परराष्ट्रीय कारभारांत कर्तबगार असून युद्धांत जोरदार धोरण त्यानें स्वीकारिलें. परंतु १७४४ त हेन्री पेल्हॅम व त्याचा भाऊ ड्यूक ऑफ न्यूक्यासल यांची सरशी होऊन कार्टेरेट मागें पडला; तेव्हांपासून दहा वर्षेंपर्यंत हेन्री पेल्हॅम याच्या हातीं सूत्रें राहिलीं. हेन्री पेल्हॅम हा आर्थिक व्यवस्थेंत व कारभाऱ्यांत स्नेह राखण्यांत निपुण असून त्याचा भाऊ न्यूक्यासल याचा सभासदांना लांच चारून आपल्या लगामीं ठेविण्यांत हातखंडा होता. यावेळीं प्रधानमंडळांत सर्व पक्षांचे लोक असल्यानें त्यास सर्व पक्षीय कारभारी-मंडळ ( Broad Bottom Administration ) म्हणत. युद्धसमाप्ति झाल्यावर निरनिराळया वेळीं निरनिराळ्या व्याजाच्या सरकारी कर्जास एका शेंकडा ३ दराच्या ठेवीचें रूप देण्यांत आलें. हीच ठेव ( Consols ) या नांवानें प्रसिद्ध झाली. इतक्या हलक्या दरानें सरकारास कर्ज मिळाल्यानें लोकांचा सरकारच्या स्थैर्यावरील विश्वास अतिशय दृढ असल्याची साक्ष पटली ( १७५० ). पुढील सालीं पेल्हॅमनें पंचांगसंशुद्धीची[१] सुधारणा घडवून आणिली. पेल्हॅम १७५४ त वारला;

---

१ इंग्लंडांत कालगणनेची जूलियन ( जूलियस सीझरनें सुरू केलेली ) पद्धति सुरू होती. तीप्रमाणें ३६५ दिवस व ६ तास येवढ्या कालावधीस वर्ष म्हणत. परंतु वर्षाचा वास्तविक काल ३६५ दिवस ५ तास ४८

( ९२ पानांवर पहा. )

व राजसूत्रें न्यूक्यासलच्या हातीं आलीं. परंतु त्याच्या ठिकाणीं वजनदारपणानें राज्यकारभार चालविण्याची कुवत नसल्यामुळें कारभारांत बजबजपुरी माजली. शेवटीं १७५६ च्या नोव्हेंबरांत नुकत्याच सुरू झालेल्या महायुद्धांत सर्व बाजूस इंग्लंडला अपयश येत गेल्यामुळें न्यूक्यासलचें प्रधानमंडळ ढासळलें! नंतर ड्यूक ऑफ डेव्हनशायर मुख्य प्रधान झाला. त्यानें इल्यम पिट यास सेक्रेटरी ऑफ स्टेटचें पद दिलें. परंतु हें राजास न आवडून त्यानें पिटला लवकरच कामावरून काढून टाकिलें (१७५७ एप्रिल). नंतर न्यूक्यासलला फिरून अधिकारारूढ करणें राजास भाग पडलें व पिटला वगळून प्रधानमंडळ बनविणें अशक्य झाल्यामुळें त्यानें पिटला सेक्रेटरी ऑफ स्टेटची जागा दिली (१७५७ जुलै). या प्रधानमंडळाइतकें कार्यकारी प्रधानमंडळ क्वचितच झालें असेल! पिटच्या हातीं अधिकार आला व युद्धांतील यशाचें मान एकदम पालटलें! इंग्लंडला जिकडे तिकडे जें अपयश येत होतें ती स्थिति पालटून इंग्लंडची कीर्ति चोहोंकडे दुमदुमूं लागली. पिटनें आपल्याकडे युद्धाची व्यवस्था, परराष्ट्रांशीं बोलणीं व इंग्लंडचें लोकमत जागृत करण्याची कामगिरी घेतली. मतदारांवर अप्रत्यक्ष वजन पाडून आपल्या बाजूचे सभासद पार्लमेंटांत आणावयाचे व पुढेंही वेळोवेळीं पैशाची गुप्त खैरात करून पार्लमेंटांत कोणत्याही प्रश्नावर आपलेंच बहुमत कायम ठेवावयाचें या गोष्टी न्यूक्यासलनें आपल्या हातीं घेतल्या. दुसरें कोणतेंही काम

---

मिनिटें व ५० सेकंद असतो. तेव्हां दर साल ११ मिनिटें व १० सेकंद येवढ्यानें मोठें धरलें जाऊन इंग्लिश पंचांग ११ दिवसांनीं मागें पडलें होतें. पंचांगसंशुद्धींत असें ठरविण्यांत आलें कीं १७५२ सालचा आरंभ मार्च २५ ला न मानतां १ जानेवारीपासून मानावा, व सप्टेंबर २ तारखेनंतर मधील अकरा तारखा गाळून एकदम १४ सप्टेंबरही तारीख धरावी. ही नवी पद्धति पोप तेरावा ग्रेगरी यानें १५८२ सालीं काढिली होती व सर्व क्याथॉलिक देशांनीं तेव्हांपासून ती अंमलांत आली. इंग्लंड प्रॉटेस्टंट असल्यामुळें तेव्हांच तेथें तिचा अंमल झाला नाहीं. हल्लीं रशियाशिवाय इतर सर्व देशांत नवी पद्धति अंमलांत आहे.

करण्याची त्याच्या अंगांत धमक नसली तरी लांच भरून पार्लमेंट आपल्या बाजूचें करून घेण्यांत तो पटाईत होता. पिटनें युद्धाची व्यवस्था लावण्याचें काम हातीं घेतलें तेव्हां सर्व इंग्लिश लोक निराशेनें व्याप्त झाले होते. अशा स्थितींत अधिकारारूढ होतांच त्यानें पुढील उद्गार काढले, "आपल्या देशाचा प्रस्तुत संकटांतून मीच बचाव करूं शकेन अशी मला खात्री आहे; हें काम दुसऱ्या कोणासही करतां येणार नाहीं." केवढा हा आत्मप्रत्यय !!

**२ वुइल्यम पिट**—वुइल्यम पिट १७०८ सालीं जन्मला असून ऑक्सफर्ड येथें शिक्षणक्रम पुरा झाल्यावर त्यानें सैन्यांत कॉर्नेटच्या जागेवर नोकरी धरली. घोडेस्वाराच्या पथकांत निशाण धरणाराचें काम करणारास कॉर्नेट म्हणतात. १७३५ सालीं ओल्ड सॅरम या बरोतर्फे तो कॉमन्स सभेंत निवडून आला. वॉल्पोलवर कडक टीका केल्यामुळें त्याची सैन्यांतील नोकरी गेली. पुढें पेल्हॅम अधिकारारूढ असतां त्यास पेमास्टर जनरलची जागा मिळाली. या जागेवर असतां पिटचा निःस्वार्थी स्वभाव दिसून आला. पेमास्टरजवळ एक लाख पौंड शिल्लक ठेविली जात असे. ती स्वतःच्या नांवानें व्याजीं लावून उत्पन्न खाजगी मिळकत म्हणून पेमास्टर घेत असत. लोकांचा पैसा असून त्यावर लोकांनीं आपल्या नोकरास व्याज द्यावयाचें ही पद्धति अन्यायाची आहे असें पिटला वाटून त्यानें खाजगी उत्पन्नाकरितां रक्कम कधींच व्याजीं लाविली नाहीं ! पार्लमेंटनें एकाद्या परकीय सरकाराला देण्याकरितां रक्कम मंजूर केली म्हणजे ती त्या सरकारास पोंचवितांना कारकुनीदाखल पेमास्टर शेंकडा ८ आणेप्रमाणें पैसे कापून घेऊन ती रक्कम पाठवीत. अशा रीतीनें पिटनें कारकुनीही कधीं घेतली नाहीं. पिट हा मोठा वक्ता होता. भाषण करीत असतांना श्रोत्यांच्या मनांत निरनिराळे मनोविकार उत्पन्न करण्यासाठीं योग्य हातवारे करून चेहऱ्यावर पालट प्रदर्शित करण्याचीही कला त्याला साधून गेली होती. भाषण करीत असतां स्वतःस विसरून जाऊन वक्तृत्वाच्या ओघाशीं तादात्म्य

पावणें हें जें वक्तृत्वाचें मुख्य बीज तें पिटच्या अंगीं पूर्णपणें वास करीत होतें. नाटकीपणा तर त्याला खिळून गेला होता. त्याच्या पत्रव्यवहारांत सुद्धां नाटकी भाषेची रेलचेल दिसून येते. त्याची कल्पनाशक्ति जोरदार असून त्याच्या विचारांत विलक्षण ओज होतें.

**६ पिटचें पार्लमेंटवर वजन**—त्याच्या पूर्वीचे मुत्सद्दी लांचलुचपत देऊन पार्लमेंटवर आपलें वजन राखीत. पण पिटच्या वजनाचें मूळ निराळेंच होतें. इंग्लंडचे उद्योगधंदे व व्यापार आतां वाढला असून देशांत वजनदार मध्यमवर्ग निर्माण झाला होता. त्याच्यावर पिटच्या निःस्वार्थीपणामुळें व वक्तृत्वामुळें त्याचें चांगलेंच वजन बसून गेलें होतें. पिटला या आपल्या वजनाची जाणिव असून प्रधानमंडळांतील इतर लोक जर विरोध करूं लागले तर तो 'येथें मला इंग्लंडच्या नागरिकांनीं पाठविलें आहे हें आपण लक्षांत ठेवा' असें त्यांना बजावीत असे. ही त्याची लोकप्रियता त्याला 'ग्रेट कॉमनर' या देण्यांत आलेल्या नामाभिधानावरून चांगली कळून येते. उमदी आकृति, पाणीदार डोळे, मर्दानी स्वर, आणि बिनतोड वक्तृत्व हे गुण त्याच्या ठिकाणीं एकत्र झाल्यामुळें कॉमन्स सभेवर तर त्याची अशी कांहीं छाप पडून गेली होती कीं, त्याच्या विरुद्ध भाषण करणाऱ्या सभासदाकडे त्यानें नुसती तिरस्कारपूर्ण फेकलेली नजरही त्याला गप्प करण्यास पुरेशी होई व एक शब्द बोलूनही तो सर्व सभागृह शून्य करून टाकी! त्याचा देशाभिमान उत्कट असून "या संकटकाळीं एकी करा, दुसऱ्या सर्व गोष्टी बाजूला टेवून आपल्या राष्ट्राचा बचाव करण्याचा एक विचारच मनापुढें या वेळीं आणा म्हणजे तंट्याची मुळींच भीति राहणार नाहीं. या बाबतींत हा पहा मीच तुम्हास धडा घालून देतों!" असें तो मंत्रिमंडळांत येतांच बोलला.

**४ पिटचें धोरण**—अधिकारारूढ होतांच, इंग्लंडवर फ्रान्सनें स्वारी केल्यास देशाचें रक्षण करण्यासाठीं हॅनोव्हरमधून सैन्य आणलें होतें त्यास पिटनें परत पाठविलें, व इंग्लंडांतील लोकांस उत्तेजन

देऊन त्यांच्यांतूनच हें बचावाचें काम करण्यासाठीं सैन्य उभारिलें. हें सैन्य उभारतांना स्कॉटलंडच्या उत्तरेकडील हायलंडर लोकांच्या पलटणी बनवून देशास त्यांच्या शौर्याचा व क्षात्रवृत्तीचा फायदा होईल अशी त्यानें व्यवस्था केली. सैन्यांतील कमकुवत ऑफिसर काढून टाकून त्यांच्या जागीं गुणी माणसांची योजना केली. या युद्धाचा वसाहती व हिंदुस्थान इकडे होणारा भाग इंग्लंडच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे हें त्यानें तेव्हांच ओळखिलें व युरोपमध्यें फ्रेंचांमागें एकसारखा ससेमिरा लावून ठेवण्याची व्यवस्था केली. फ्रेडरिकला दरसाल ६ लक्ष ७० हजार पौंडांची मदत देऊन फ्रेंच व इतर शत्रु यांशीं लढण्यास उत्तेजन दिलें. हॅनोव्हरमधील सैन्याचें आधिपत्य अपेशी कंबरलंडकडून काढून घेऊन त्याच्या जागीं ब्रन्स्विकचा फर्डिनंड या कर्तबगार पुरुषाची योजना केली. फ्रेंचांच्या आरमाराचा नाश करून मुळावर घाव घाला-वयाचा व वसाहतींस मदत पाठविणेंच त्यांस अशक्य करून टाकावयाचें यासाठीं ब्रिटिश आरमार सज्ज ठेविलें व फ्रान्सच्या किनाऱ्यावर भुरटे हल्ले करून फ्रेंच सरकारास चिंतेनें व खर्चानें जर्जर करून सोडिलें ! वसाहती व हिंदुस्थान येथील लढाई चालविण्याचें व युरोपमधील आरमारी युद्धांतही फ्रेंचाचा पाडाव करण्याचें काम पिटनें आपल्या शिरावर घेतलें.

**५ युरोपांत इंग्रजांची सरशी**—पिटनें आंखिलेल्या जोरदार धोरणाचा परिणाम लवकरच दिसूं लागला. आफ्रिकेंत सेनिगाल आणि गोरी हीं ठाणीं फ्रेंचांपासून हिसकून घेण्यांत आलीं. फ्रान्सच्या किनाऱ्या-वरील सेंट मेलो हें ठिकाण व तेथील जहाजें पाडाव करण्यांत येऊन चेर-बूर्ग येथेंही इंग्रजांसच जय आला. १७५९ सालीं टूलन व ब्रेस्ट या दोहों बंदरांतील आरमार एक करून फ्रेंच फौज इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरविण्याचा फ्रेंचांनीं व्यूह रचिला. मग टूलन बंदरांतील फ्रेंच आरमार ब्रेस्टकडे जावयास निघालें. परंतु जिब्राल्टर जवळून जात असतां तें इंग्रजांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां ॲडमिरल बॉस्क्याव्हेन यानें त्याचा पाठ-लाग करून लागोस खाडीजवळ त्यास गाठलें व त्याचा पुरता नाश

केला. ब्रेस्ट बंदरावर अॅड्मिरल हॉकनें पहारा ठेविला होता. एकदां बादळामुळें हॉकचीं जहाजें दूर गेलीं आहेत असें पाहून तेथील फ्रेंच आरमार दक्षिणेकडे निसटलें. परंतु हॉकनें पाठलाग करून लवकरच फ्रेंच आरमारास क्विबेरॉन खाडींत गांठिलें; खडक व उथळ पाण्याचीं ठिकाणें यामुळें तें स्थल धोक्याचें असतांही फ्रेंच आरमारावर हल्ला चढविला व त्याची रेवडी उडवून दिली. या पाडावामुळें फ्रेंचांचें आरमार जवळ जवळ नाहींसें होऊन पुढील युद्धप्रसंगांत त्याला कांहींच कामगिरी करितां आली नाहीं आणि अमेरिका व हिंदुस्थान येथील फ्रेंचांस युरोपांतून कोणतीही मदत मिळणें अशक्य झालें. इकडे जर्मनीमध्ये फर्डिनंड यानें लवकरच फ्रेंचांपासून हॅनोव्हर सोडविलें; पुढें मिंडेन येथें फ्रेंच व फर्डिनंड यांची गांठ पडून फ्रेंचांचा पूर्ण पराजय झाला; व त्यामुळें हॅनोव्हर संस्थानावरील स्वारीचें संकट कायमचें दूर झालें. येणेंप्रमाणें युरोपांत १७५९ सालीं चोहोंकडे फ्रेंचांचा पाडाव होऊन इंग्रजांना यश आलें. १७५९ सालीं फ्रेडरिक बऱ्याच अडचणींत होता. तथापि फर्डिनंडनें फ्रेंचांस ऱ्हाइन खोऱ्यांत अडवून धरल्यामुळें फ्रेडरिकला ऑस्ट्रिया, रशिया व स्वीडन या राष्ट्रांस तोंड देण्याचें तेवढें काम उरलें व तें त्यानें मोठ्या नेटानें चालू ठेविलें.

**६ क्विबेक सर झालें!**—अमेरिकेंतही इंग्रजांस यश येत गेलें. पिटनें ८००० लोक व ४२ जहाजांचें एक आरमार अमेरिकेंत पाठविण्याचें ठरविलें. पिटनें वूल्फ याची योजना त्या सैन्यावर केली. वूल्फ हा तरुण व अननुभवी असला तरी कर्तबगारी करून दाखवील अशी पिटची खात्री होती. प्रथम वूल्फ व ॲम्हर्स्ट यांनीं लुइझबर्ग किल्ला ( अमेरिकेंतील जिब्रॉल्टर ) घेतला ( १७५८ ). ड्यूकेन, नायगारा, टिकोन्डेरोगा हे किल्लेही एका वर्षाच्या आंत पडले. ड्यूकेन किल्ला इंग्रजांनीं घेतल्यावर त्यास पिटच्या सन्मानार्थ पिट्सबर्ग असें नांव देण्यांत आलें. फ्रेंचांचा अमेरिकेंतील सेनापती मॉटकाम हा होता; व लॉरेन्स नदीच्या कांठच्या क्यानडाच्या आग्नेय टोंकावरच्या क्विबेक शहरीं फ्रेंचांची मुख्य छावणी होती. वूल्फनें आपल्या बरोबरचे ८००० लोक घेऊन क्विबेकवर हल्ला करण्याचा

बेत ठरविला ( १७५९ ). क्विबेक शहर लॉरेन्स नदीच्या खडकाळ व उंच अशा कांठावर वसलेलें आहे. लॉरेन्स नदीला: बऱ्याच इतर नद्याही क्विबेकच्या खालीं मिळतात. त्यांतील एका नदीच्या कांठीं वूल्फनें आपले लोक उतरविले. मग नदी ओलांडून पलीकडच्या तीरावरून फ्रेंचांवर चालून जाण्याचें ठरवून त्यानें तसा प्रयत्न केला; पण फ्रेंचांनीं त्याचा प्रयत्न हाणून पाडला. इंग्रजांनीं नदी उतरूं नये म्हणून फ्रेंचांनीं नदी-तीरावर सारखा पहारा ठेविला होता; त्यामुळें हल्ला करणें जवळजवळ अशक्यच वाटूं लागलें. पण वूल्फला इतक्यांत एक निराळी युक्ति सुचली. क्विबेकच्या वर नदीतीर बराच सुळकेदार होत गेला आहे व त्यामुळें तेथून शत्रु येणें अशक्य, अशा समजुतीनें फ्रेंचांनीं तेथें बंदोबस्तही नीट ठेविला नाहीं असें त्याच्या लक्षांत आलें. शिवाय तेथेंच लॉरेन्स नदीला उत्तरेकडे एक खिंडार असून त्यांत बरेच दूरवर पाणी शिरलेलें आहे हेंही त्यानें पाहिलें. तेव्हां तिकडूनच हल्ला करण्याचें त्यानें ठरविलें. सप्टेंबर ( १७५९ ) मध्यें एके दिवशीं रात्रीं कांहीं एक आवाज होऊं नये व फ्रेंच सावध होऊं नयेत ह्मणून त्यानें वल्ह्यांना फडकीं गुंडाळून फौज त्या ठिकाणाकडे नेली, व त्या अवघड कड्यावर त्याचे सैनिक कसे तरी चढले. मग ॲब्रॅहमच्या उंचवट्यावर जाऊन फ्रेंचावर हल्ला करण्यासाठीं इंग्रज सज्ज होऊन बसले. हा प्रकार चालू असतां वूल्फ ग्रे कवीचें शोकगीत (Elegy in the country churchyard) गात होता. फ्रेंचावर जय मिळविण्याच्या यशापेक्षां ही कविता करणारा कवि होणें मला जास्त आवडतें असें तो एकदां म्हणाला. त्या फौजेनें एक तोफही आपल्याबरोबर तेथें चढविली. पण फ्रेंचास चाहूल लागली नाहीं. शेवटीं उजाडलें तेव्हां इंग्रज शिपायी ॲब्रॅहम टेकडीवर सज्ज असल्याचें फ्रेंच सेनापति मॉंटकाम यास कळलें. तेव्हां तो लागलीच फौजेची कशी-बशी व्यवस्था लावून लढाई देण्यास आला. इंग्रजांचें सैन्य कवाईत शिकलेलें असल्यामुळें युद्धांत इंग्रजांस जय मिळाला. वूल्फ सैन्यास उत्तेजन देत होता व इंग्रजांस जयही येऊं लागला होता; इतक्यांत दुर्दैवानें वूल्फला दोन ठिकाणीं जबर जखमा झाल्या. तेव्हां त्यास मागें

नेऊं लागले. इतक्यांत 'ते पहा, पळत आहेत; ते पहा, पळत आहेत,' अशा आरोळ्या त्यानें ऐकिल्या. हें ऐकतांच वूल्फनें आपल्या कोंपरावर भार देऊन अंग उचललें व उतावीळ होऊन विचारिलें 'कोण पळत आहेत ?' त्यावर 'फ्रेंच लोक पळत आहेत' असें उत्तर मिळतांच त्याच्या तोंडून "मग मी सुखानें मरतों" असे शब्द निघाले व लागलीच त्याचें प्राणोत्क्रमण झालें. या युद्धांत फ्रेंच सेनापति मॉन्ट्कामही पडला. यानंतर एक वर्षानें मॉन्ट्रील शहरही पडलें व सर्व क्यानडा इंग्रजांचे ताब्यांत आला. याशिवाय क्विबेरॉनच्या खाडीजवळ फ्रेंच आरमाराची इतिश्री झाल्यामुळें (१७५९) इंग्रज आरमारास युरोपांत पायबंद न राहून उत्तर व दक्षिण अमेरिका यांच्या मध्यांवर जीं वेस्ट इंडीज बेटें आहेत त्यांतील फ्रेंचांच्या ताब्यांत असलेलीं बेटें घेण्यास आपल्या आरमाराचा इंग्रजांस उपयोग करून घेतां आला.

**७ हिंदुस्थानांत फ्रेंचांचा पराभव**—हिंदुस्थानांत सुराजुद्दौल्यानें कलकत्ता घेतला व तेथील इंग्रज गव्हरनर फुल्टास पळून गेला. तेथून त्यानें मद्रासकडे ही सर्व हकीकत कळविली. आतां क्लाइव्ह हा मद्रासचा गव्हरनर झाला होता. त्याला ही बातमी कळतांच २४०० लोकांचें सैन्य बरोबर घेऊन तो कलकत्त्यावर चाल करून गेला. या चोविसशें लोकांपैकीं ९०० गोरे होते. सुराजुद्दौल्यापासून क्लाइव्हनें कलकत्ता सोडविलें व इंग्रजांस पूर्वीप्रमाणें सर्व सवलती मिळविल्या. पुढें सुराजुद्दौल्यास गादीवरून काढून टाकून आपल्या तंत्रानें वागण्यास तयार असलेल्या मिरझाफरास बंगालचा नबाब करण्याचा गुप्त-व्यूह क्लाइव्हनें रचिला. मग क्लाइव्ह ३००० फौजेनिशीं व तोफांनिशीं नबाबाचे राज्यावर चालून जाऊं लागला. नबाबही ५०००० फौज बरोबर घेऊन सामना देण्यास आला. दोन्ही सैन्यांची गांठ प्लासीवर पडली (१७५७). क्लाइव्हनें नबाबाच्या पक्षांत अगोदरच भेद केला असल्यामुळें व इंग्रजांच्या कवायतीचें शिक्षण व तोफांचें साहाय्य नबाबाच्या फौजेस मुळींच नसल्यामुळें नबाबाचा सपशेल पराभव झाला. क्लाइव्हनें मिरझाफरला

नबाब बनविला व फ्लासीच्या लढाईनें हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याची मुहूर्त-मेढ पुरली गेली ! क्लाइव्हनें बंगाल्यांत आल्याबरोबर फ्रेंचांचें चंद्रनगर हें ठाणें बळकाविलें होतेंच. कर्नाटकांत फ्रेंच सत्तेचा बोज राखण्यासाठीं लाली या सेनापतीस फ्रान्सांतून हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें. तिकडे त्याच्या इंग्रजांशीं कांहीं लढाया होऊन शेवटीं वांदीवाशच्या लढाईंत फ्रेंचांचा पूर्ण मोड झाला ( जानेवारी १७६० ). पुढील सालीं पॉंडिचरी हें फेंचांचें मद्रासकडील ठाणें इंग्रजांनीं घेतलें, त्याचे तट पाडून टाकिले व फ्रेंचांच्या सत्तेचें हिंदुस्थानांतून पार उच्चाटण केलें.

८ **कौटुंबिक संघाचा समाचार**—अशी चोहोंकडे इंग्रजांची सरशी झाली व फ्रेंचांचा नक्षा उतरला. १७६० सालीं दुसरा जॉर्ज वारला व त्याचा नातू 'तिसरा जॉर्ज' ही पदवी धारण करून इंग्लंडच्या गादीवर आला. १७६१ सालीं इंग्लिश आरमारानें वेस्ट इंडीज बेटांतील डोमिनिका हें ठाणें घेतलें व ब्रिटनीच्या किनाऱ्यावर बेल आइल हें ठिकाण काबीज केलें. इतक्यांत फ्रान्स व स्पेन येथील बुर्बोन घराण्यापैकीं असलेल्या राजांनीं एक 'कौटुंबिक संघ' गुप्तपणें केला आहे ( १७६१ ऑगष्ट ) व स्पेन फ्रान्सच्या मदतीस युद्धांत पडणार आहे अशी बातमी पिटला लागली. त्यानें लागलीच फ्रान्सशीं चाललेल्या तहाच्या वाटाघाटी बाजूस ठेवून 'या गुप्त तहामुळें युद्ध सुरू करणें आम्हांस भाग आहे' असें सांगून युद्धाची तयारी जोरानें चालविली. पण त्याचें म्हणणें तिसरा जॉर्ज व त्याचा क्षुद्र सल्लागार लॉर्ड ब्यूट या शांतताप्रिय मंडळीस पसंत न पडून पिटला राजीनामा देणें भाग पडलें ( १७६१ ऑक्टोबर ). लवकरच प्रशियाच्या फ्रेडरिकला द्यावयाची वार्षिक देणगी ब्यूट देईना, म्हणून न्यूक्यासलनें राजीनामा दिला. न्यूक्यासलच्या राजीनाम्याचें खरें कारण ब्यूट त्याचें कांहींच ऐकत नसे हें होतें. नव्या प्रधानमंडळांत ब्यूट हा राजाचा आवडता मंत्रीच मुख्य होता. अमेरिकेंतील खजिना आणणारें जहाज स्पेनला पोंचतांच स्पेननें फ्रान्सच्या बाजूनें युद्ध पुकारलें व ब्यूटच्या प्रधानमंडळास स्पेनशीं युद्ध

करणें भाग पडलें ( १७६२ ). पिटनें मोहिमांची तयारी अगोदरच करून ठेविली असल्यामुळें इंग्रजांची जिकडे तिकडे फत्ते झाली. वेस्ट इंडीजमधील फ्रेंचांच्या ताब्यांतील ठिकाणें इंग्रजांनीं अगोदरच घेतलीं होतीं. आतां स्पेनच्या ताब्यांतील क्यूबा बेटाची राजधानी हॅवानाही सर झाली. त्याचप्रमाणें पूर्वेकडील फिलिपाइन बेटाची राजधानी मॅनिलाहीवर मद्रासहून आरमार पाठविण्यांत येऊन ती काबीज करण्यांत आली.

**८ पॅरिसचा तह ( १७६३ )**—शेवटीं स्पेन व फ्रान्स हीं दोन्हीं राष्ट्रें युद्धास कंटाळून गेलीं. ( १७६३ ) सालीं पॅरिस येथें तह झाला त्यांत फ्रान्सनें क्यानडा व न्यू ऑर्लिन्सच्या उत्तरेकडील व मिसिसिपीच्या पूर्वेकडील सर्व प्रदेश इंग्लंडला दिला. सेंट लॉरेन्स नदीचें नाक केप ब्रेटन हेंही इंग्लंडला मिळालें. न्यू फौंडलँडच्या लगत मच्छमारी करण्याची सवलत फ्रान्सला मिळाली व त्या धंद्यासाठीं केप ब्रेटनच्या पूर्वेस दोन लहान बेटें फ्रान्सकडे राहिलीं. स्पेननें क्यूबा व फिलिपाइन हीं बेटें परत घेऊन त्याचा मोबदला म्हणून फ्लॉरिडा इंग्लंडला दिलें. फ्रान्सच्या उत्तर किनाऱ्यावरील बेल आइल हें ठाणें इंग्रजांनीं नुकतेंच जिंकलें होतें, तें फ्रान्सला परत देऊन इंग्रजांनीं मिनोर्का बेट परत घेतलें. वेस्ट इंडीजमध्यें डोमिनिका, टोबॅगो व ग्रेनेडा हीं महत्त्वाचीं बेटें इंग्रजांस मिळालीं. आपल्याला सोडून इंग्रजांनीं शत्रूशीं तह केला म्हणून प्रशियाचा फ्रेडरिक रागावला; परंतु फ्रेडरिकच्या राज्यांतील फ्रेंचांनीं जिंकलेला मुलूख सोडण्यास ते तयार झाले. त्याचप्रमाणें प्रशिया व ऑस्ट्रिया या दोन्ही देशांत तह होऊन सायलीशिया हा प्रांत प्रशियाकडेच राहूं देण्यास ऑस्ट्रिया तयार झाला. फ्रान्सची पूर्ण निराशा होऊं नये म्हणून वेस्ट इंडीजमधील कांहीं बेटें व हिंदुस्थानांतील पाँडिचरी आदिकरून त्यांचीं व्यापाराचीं ठाणीं त्यास परत देण्याचें ठरलें. सप्तवार्षिक युद्धांत इंग्रजांस जय मिळून फ्रेंचांचा पुरता नक्षा उतरला. अठराव्या शतकाच्या आरंभापासून इंग्रज व फ्रेंच यांच्यामध्यें एक झगडा सुरू झाला होता. त्यांत दर्यावरील सत्ता, जगाचा व्यापार व साम्राज्याची मालकी कोणाकडे असा-

वयाची हें ठरावयाचें होतें. सप्तवार्षिक युद्धांत फ्रेंचांचा सपशेल पराभव झाला व वरील तिन्ही गोष्टी त्यांना दुर्लभ झाल्या. इंग्रजांची दर्यावरील सत्ता दृढ झाली व हिंदुस्थान आणि अमेरिका येथें त्यांचा पाय रुजून ब्रिटिश साम्राज्याची स्थापना झाली.

---

# ५० नृपानुयायांचा नाच.



**१ तिसऱ्या जॉर्जचा निश्चय**—दुसऱ्या जॉर्जच्या मागून गादीवर आलेला तरुण तिसरा जॉर्ज हा शीलवान् असून आपण इंग्रज आहों असें मोठ्या अभिमानानें म्हणत असे. पहिला व दुसरा जॉर्ज यांना इंग्लंड परकेंच वाटत होतें, तशी तिसऱ्या जॉर्जची मुळींच स्थिति नव्हती. जन्मतः व शिक्षणानें इंग्लंडबद्दलची स्वत्वबुद्धि त्याच्या ठिकाणीं मुरली होती. आतां देशांतील जॅकोबिटिझमचें वारें नाहींसें झालें असून 'टोरी' पक्षांतही नव्या हॅनोव्हरच्या घराण्याबद्दल निष्ठा उत्पन्न झाली होती. तेव्हां इंग्लंडचे अनियंत्रित राजे आपण बनावें अशी महत्त्वाकांक्षा जॉर्जच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. बोलिंगब्रोकच्या देशभक्त राजा (Patriot king) या ग्रंथाचा त्यानें चांगला अभ्यास केला होता, व त्यामुळें सर्व मंत्री आपण नेमावे व त्यांच्यांत ऐक्यही आपण राखावें ही आकांक्षा त्याच्या ठिकाणीं जागृत झाली. अशा रीतीनें व्हिग पुढाऱ्यांच्या हातीं मागील दोन राजांप्रमाणें बाहुलें होऊन न राहतां स्वतःच्या तंत्रानें राज्यकारभार करण्याचें त्यानें ठरविलें. त्याच्या आईनें लहानपणापासून "जॉर्ज, तूं खरोखरीचा राजा हो बरें कां" असा उपदेश त्याच्या डोक्यांत खिळवून टाकिला होता, त्या प्रेरणेनें जॉर्जनें वरील निश्चय केला.

**२ पार्लमेंटांत नृपानुयायी**—पहिला जॉर्ज व दुसरा जॉर्ज यांच्या कारकीर्दींत सर्व सत्ता पार्लमेंटच्या हातांत असे. पण पार्लमेंट तरी कोणाच्या तंत्रानें चाले व पार्लमेंटचे सभासद तरी कोणाच्या तंत्रानें निव-

डून जात? खरोखर म्हटलें तर पार्लमेंटचे सभासद हे लोकमताचे निदर्शक असले पाहिजेत. त्या वेळेस अशी स्थिति नव्हती. कॉमन्स सभेचे सभासद दोन तऱ्हांनीं निवडून यावयाचे. एक कौंटींमधून व दुसरे बरोंमधून ( शहरें ). त्यांपैकीं पुष्कळशीं बरो ज्या श्रीमंत व्हिग घराण्यांनीं १६८८ तील राज्यक्रांती घडवून आणिली त्यांचीं सर्वस्वी मिंधीं असत. कौन्टींत तरी हेच बडे श्रीमंत जमीनदार वजनदार रहिवाशी असल्यामुळें तेथून निवडून येणारे सभासदही त्यांच्या कच्छपीं असत. यामुळें कॉमन्स सभा म्हणजे लॉर्ड्स सभेचा अनुवादच होऊन बसली होती. वॉल्पोल, न्यूक्यासल यांच्यासारख्या मुत्सद्यांनीं लांच भरून सभासद आपल्या बाजूचे निवडून आणण्याची व्यवस्था करून त्यावर आपल्या सत्तेचा पाया उभारला होता. तिसऱ्या जॉर्जनें आपल्या उत्पन्नापैकीं बराच भाग सभासदांस लांच देण्याकडे खर्च करण्याचें ठरविलें; शिवाय राजाच्या वतीनें जो सभासद मत देईल त्याचा मोबदला म्हणून त्यास सरकारी नोकरी द्यावयाची अगर सैन्यांतील एकादी जागा बहाल करावयाची या मार्गाचा उपयोगही जारीनें करण्यांत येऊ लागला. अशा रीतीनें खुद्द राजाकडून पैशाची खैरात होऊं लागल्यामुळें पार्लमेंटांत नृपानुयायी(King's friends) लोकांचा पक्ष निर्माण होऊन त्याची छाप दोन्ही सभांत दिसूं लागली. येणेंप्रमाणें ज्या पद्धतीचा अवलंब करून व्हिग श्रीमंतांनीं आपल्या हातीं सत्ता ठेविली होती त्याच पद्धतीनें जॉर्जनें पार्लमेंटमध्यें नृपानुयायांचा भरणा करून ती सभा आपली मिंधी करून सोडिली व व्हिग श्रीमंत घराण्यांच्या वर्चस्वाचा अंत झाला.

**३ व्हिग उपपक्ष**—अशा रीतीनें 'नृपानुयायी' प्रबळ झाले, त्या वेळीं व्हिग पक्षांत भेद होऊन तो अगदीं दुर्बळ होऊन गेला. एका व्हिग उपपक्षाचा मार्किस ऑफ रॉकिंगहॅम हा पुढारी असून शुद्ध, सरळ व देशास हितकारक मार्गांनीं राज्यकारभार चालविण्यांत यावा असें या उपपक्षाचें म्हणणें होतें. ड्यूक ऑफ बेडफर्ड याचा अनुयायी दुसरा एक उपपक्ष असून त्याचें पूर्वापार चालत आलेलें लांचलुचपतीचें धोरणच पुढें चालावें असें म्हणणें होतें. जॉर्ज ग्रेन्व्हिल हा तिसऱ्या उप-

पक्षाचा पुढारी असून राजा व लोक या दोघांवरही पार्लमेंटची हुकमत चालावी व राज्यकारभारांत काटकसर करण्यांत यावी असें या उपपक्षाचें मत होतें. चौथा एक उपपक्ष तेजस्वी पण म्हातारपणामुळें शीघ्रकोपी बनलेल्या पिटच्या नेतृत्वाखालीं असून पार्लमेंटची रचना सुधारली पाहिजे असें या उपपक्षाचें म्हणणें होतें. तथापि त्याची एकी पिटवरील भक्तीवरच मुख्यतः अवलंबून होती.

**४ ब्यूट गेला व ग्रेन्व्हिल आला**—लॉर्ड ब्यूट हा मंत्री होऊन त्यानें पॅरिसचा तह करून इंग्लंड व फ्रान्स या दोन राष्ट्रांमधील महायुद्धाची समाप्ति केली ( १७६३ ), हें मागील प्रकरणांत आलेंच आहे. या तहानें इग्लंडला जितका फायदा मिळावयास पाहिजे होता तितका मिळाला नाहीं असें पिटचें म्हणणें होतें व सामान्य जनसमुदायाचेंही तसेंच मत होतें. ब्यूट लोकांस इतका अप्रिय झाला कीं, त्याचे पुतळे करून ठिकठिकाणीं जाळण्यांत आले. शेवटीं लोकक्षोभास भिऊन त्यानें प्रधानगिरीचा राजीनामा दिला. त्याच्यामागून मनासारखा मनुष्य न मिळाल्याकारणानें जॉर्जनें जॉर्ज ग्रेन्व्हिल या नेमस्त व्हिग पुढाऱ्याची प्रधानगिरीवर नेमणूक केली ( १७६३ ).

**५ विल्क्सची टीका**—मग पार्लमेंटास उद्देशून जें राजाचें भाषण झालें त्यांत पॅरिसचा तह आपल्या देशास हितकर झाला असें विधान करण्यांत आलें होतें. ' नॉर्थ ब्रिटन ' पत्राचा संपादक व पार्लमेंटचा सभासद जॉन विल्क्स यानें आपल्या वर्तमानपत्राच्या पंचेचाळिसाव्या अंकांत राजाच्या भाषणावर कडक टीका केली व राजानें खोटें विधान केलें असा राजावर आरोप केला ( एप्रील १७६४ ). ग्रेन्व्हिलनें राजाच्या हुकुमावरून एक निनांवी वॉरंट ( कोणाविरुद्ध वॉरंट काढलें त्याचें नांव त्यांत नव्हतें ) काढून विल्क्सला पकडिलें व तुरुंगांत टाकिलें; पण मुख्य न्यायाधिशानें विल्क्स पार्लमेंटचा सभासद असल्यामुळें त्यास पकडतां येत नाहीं या कारणास्तव त्याची सुटका केली ! कॉमन्स सभेंत नृपानुयायांचेंच प्राबल्य असल्यामुळें त्या सभेंत असा ठराव पास

झाला कीं, ' नॉर्थ ब्रिटन पत्राचा पंचेचाळिसावा अंक खोड्या, निंदाप्रचुर व राजद्रोही लेखांनीं भरलेला आहे. मध्यंतरीं विल्क्सनें सेक्रेटरी ऑफ स्टेटवर बेकायदेशीर रीतीनें आपल्याला पकडल्याबद्दल फिर्याद लाविली, तेव्हां नुकसानीबद्दल १००० पौंडांची रक्कम त्याला मिळून निनांवी वॉरंटाचाही कोर्टाकडून निषेध करण्यांत आला. इतक्यांत दुसरा राजद्रोही लेख लिहिल्याचा खटला विल्क्सवर सुरू होऊन त्यांत त्याला दोषी ठरविण्यांत आलें. विल्क्स फ्रान्सांत पळून गेला. तेव्हां त्याला न्यायबाह्य (Outlaw) ठरविण्यांत आलें.

६ **विल्क्सचा** छळ—१७६४ सालीं कॉमन्स सभेनें आपल्या सभेंतून विल्क्सची हकालपट्टी केली. कॉमन्स व लॉर्ड्स या दोघांनींही न्यायाचें काम स्वच्छंदानें आपल्या हातीं घेतलेलें पाहून व ग्रेन्व्हिल यानें दोनदां वर्तमानपत्रांविरुद्ध काढिलेल्या हुकुमावरून लोकांत असंतोष माजला. १७६८ त विल्क्स फ्रान्सांतून परत आला व त्या सालच्या निवडणुकींत त्याला मिडल्सेक्स परगण्यातर्फे कॉमन्स सभेचा सभासद निवडण्यांत आलें. कॉमन्स सभा पडली राजाची मिंधी ! तिनें विल्क्सला सभासद म्हणून मान्य करण्याचें अजिबात नाकारिलें.परंतु लंडन व देशांतील बहुजनसमाज यांनीं विल्क्सचा पक्ष धरिला. नंतर मिडल्सेक्स परगण्यातर्फे आणखी तीन वेळां विल्क्सचीच निवडणूक झाली. तरी शेवटीं कॉमन्सनीं विल्क्सपेक्षां कमी मतें मिळालेला उमेदवार लट्रेल हाच कायदेशीर रीत्या निवडून आलेला सभासद समजावयाचा असें ठरवून विल्क्सला मान्य करण्याचें फिरून नाकारिलें (१७६९ एप्रिल १६). तेव्हां देशांत फारच असंतोष झाला ! विल्क्स हा लोकस्वातंत्र्याचा वाली असें मानण्यांत येऊन त्याचे फोटो चोहोंकडे विकण्यांत येऊं लागले. लंडनच्या रस्त्यावर सामान्य लोक जमत तेव्हां " विल्क्स आणि स्वातंत्र्य " अशा आरोळ्या जिकडे तिकडे ऐकूं येत ! एका लेखकानें ज्यूनियस या सहीनें पार्लमेंट व प्रधानमंडळ यांच्यावरच नव्हे, तर खुद्द राजावरही लोकांच्या निवडणुकींच्या हक्कावर गदा आणिल्याबद्दल जलाल टीकेचा भडिमार चालविला ! शेवटीं १७७४ तील निवडणुकींत विल्क्सची पार्लमेंटमध्यें

निवडणूक झाली. तेव्हां कॉमन्सनीं त्याला आपल्या जागीं थेऊं दिलें. अशा रीतीनें इतका जेव्हां लोकांनीं गवगवा केला तेव्हां लोकांचा निवडणुकीचा हक्क कॉमन्सनां मान्य करावा लागला. यावरून मतदार संघानें ज्या गृहस्थास निवडून दिलें असेल त्यास पार्लमेंटांत बसण्यास कोणासही हरकत करतां येणार नाहीं हें तत्त्व कॉमन्सकडून मान्य करण्यांत आलें.

**७ दोन फायदे**— या विल्क्स प्रकरणांत दोन महत्त्वाच्या गोष्टींचा निकाल लागला. एक बहुजनसमाजास पार्लमेंटनें केलेली व्यवस्था मान्य होत नसली किंवा पार्लमेंटच्या रचनेंत व कृतींत कांहीं फरक सुचवावयाचे असले तर त्यास कांहीं ठराविक साधन नव्हतें. किंबहुना पार्लमेंटसभेसही आपण लोकांचे प्रतिनिधी असून आपण त्यांना संमत अशा दिशेनेंच राज्यकारभार चालविला पाहिजे हें तत्त्व बहुतेक अज्ञातच होतें. परंतु या वेळीं जनसमूहाच्या टोलेजंग सभा भरवून लोकमत काय आहे हें पार्लमेंटास व सरकारास कळविण्याची सुरवात झाली. दुसरें असें कीं, 'ज्यूनियस' सारख्या लेखकांनीं सरकारवर टीका केल्यामुळें, आपल्यावर कोणता अन्याय होत आहे व आपल्याला काय सुधारणा करावयास पाहिजेत हें लोकांस कळविण्याच्या कामीं छापखान्यांचा व वर्तमानपत्रांचा उपयोग कसा होतो ही गोष्ट लोकांच्या निदर्शनास आली. वर्तमानपत्रांच्या लेखांचा सरकारवर दाब पडून एक नवेंच साधन लोकांस मिळाल्यासारखें झालें. १७७१ त कॉमन्स सभेंतील वादविवादाचे रिपोर्ट कित्येक वर्तमानपत्रांनीं छापिले. तेव्हां आपल्यावरील टीका चुकविण्याकरितां कॉमन्सनीं सहा छापखानेवाल्यांस आपल्यासमोर हजर राहण्यास सांगितलें. एक जण हुकुमाप्रमाणें हजर झाला नाहीं; तेव्हां कॉमन्सनीं आपला हस्तक पाठवून त्यास कैद केलें ! हें पार्लमेंटचें कृत्य मॅजिस्ट्रेटांस न आवडून त्यांनीं पार्लमेंटच्या हस्तकास एका निरपराधी मनुष्यास बेकायदेशीरपणें पकडल्याच्या आरोपावरून तुरुंगांत पाठविलें. यावर कॉमन्सनीं रागावून लॉर्ड मेयरला तुरुंगांत धाडिलें. तेव्हां त्याच्यामागें लोकांची इतकी गर्दी जमली व त्याच्या

बद्दल इतक्या मोठ्या प्रमाणावर सहानुभूति प्रदर्शित करण्यांत आली कीं, मेयर सुटल्यावर आपले वादविवाद प्रसिद्ध केल्याबद्दल पार्लमेंटनें यापुढें कधींच कोणावर फिर्याद केली नाहीं. पार्लमेंटचें कामकाज प्रसिद्ध झाल्यामुळें आपण निवडून दिलेला प्रतिनिधि पार्लमेंटांत काय करतो हें त्याला निवडून देणाऱ्या मतदारसंघास कळण्याचें साधन झालें, इतकेंच नव्हे तर आपल्या प्रतिनिधींचीं कृत्यें सर्व राष्ट्रास कळणें सुलभ झाल्यावर सरकारास योग्य मार्गावर राखण्यास राष्ट्र जागरूक राहूं लागलें! तेव्हांपासून वर्तमानपत्रांचा बोज वाढला; मॉर्निंग क्रॉनिकल, मॉर्निंग पोस्ट, टाइम्स इत्यादि वजनदार पत्रें याच सुमारास सुरू झालीं!

**८ क्याथॉलिकांविरुद्ध क्षोभ**—रोमन क्याथॉलिकांविरुद्ध असलेले अत्यंत कडक कायदे रद्द करण्यांत यावेत असें एका प्रमुख व्हिग सभासदानें सुचविलें. तिसऱ्या वुइल्यमच्या वेळीं 'दुसऱ्या जेम्सचें अत्यंत भय वाटत असल्यामुळें त्याचे पक्षपाती क्याथॉलिक यांजविरुद्ध अत्यंत कडक कायदे करण्यांत आले होते. आतां त्यांची अवश्यकता नाहीं असें पाहून हे अमानुष[1] कायदे रद्द करण्याची सूचना पुढें आली व पार्लमेंटची या बिलास संमति मिळाली (१७७८). पण लवकरच लॉर्ड जॉर्ज गॉर्डन[2] नांवाच्या माथेफिरू सभासदानें सरकारवर हे कायदे रद्द केल्याबद्दल आग पाखडण्यास सुरुवात केली. सहा दिवसपर्यंत लंडनमध्यें ५०,००० लोकांच्या निरनिराळ्या टोळक्यांनीं क्याथॉलिकांचीं देवळें जाळलीं व त्यांचीं घरें लुटलीं. न्यूगेट तुरुंग फोडून आंतील कैद्यांस मुक्त

---

१ क्याथॉलिकानें प्रभुभोजनाचा समारंभ करणें म्हणजे राजद्रोह होय हा निर्बंध रद्द झाला. त्याचप्रमाणें मालमत्तेच्या वारशासंबधीं प्रॉटेस्टंटास क्याथॉलिकापेक्षां श्रेष्ठत्व देणारा कायदाही रद्द झाला.

२ हा गॉर्डन मनाचा दुर्बळ होता व दोन्ही पक्षावर तो इतक्या कडक रीतीनें टीका करी कीं, लोक थट्टेनें असें म्हणूं लागले कीं, देशांत एकंदर तीन पक्ष आहेत; प्रधानमंडळ व विरोधी पक्ष हे नेहमींचे दोन व लॉर्ड जॉर्ज गॉर्डन हा एकटा तिसरा.

करून तुरुंगाची इमारत जाळून टाकण्यांत आली. आपल्या प्रॉटेस्टंट धर्माची खूण म्हणून जो आपल्या टोपीवर निळी पट्टी ( Cockade ) वापरणार नाहीं त्याचें जीवित धोक्यांत आलें. घर सुरक्षित ठेवावयाचें म्हटलें म्हणजे त्याच्या पुढील दारावर 'No Popery' अशीं अक्षरें लिहिल्याशिवाय सोय नव्हती! एका बहाद्दरानें तर आपलें घर दुप्पट सुरक्षित करण्यासाठीं 'या घरांत कोणताच धर्म नाहीं' ( No religion whatever )अशीं अक्षरें लिहिलीं. देशांत दंगे होऊं लागले, त्यामुळें मालमत्तेचें नुकसान झालें, प्राणहानि झाली व सुधारणेचें काम पार मागें पडलें. १७७० सालीं लॉर्ड नॉर्थ हा नृपानुयायांचा पुढारीच मुख्य प्रधान बनला होता, व तेव्हांपासून जॉर्जचें स्वतःच्या तंत्रानें राज्यकारभार चालविण्याचें धोरण पूर्णपणें अंमलांत आलें होतें. पार्लमेंट नृपानुयायांचा मेळा बनून लोकमताचा तींत मुळींच प्रकाश पडेना. १७७० त सुरू झालेल्या दशकांत अमेरिकन युद्ध हीच महत्त्वाची बाब होती व तींत तर सरकारची पुरी फजितीच उडाली. तेव्हां पार्लमेंटांतही सरकारविरुद्ध गवगवा होऊं लागला. व १७८० सालीं पार्लमेंटांत सुधारणा पाहिजे असें म्हणणाऱ्या पक्षाचा इतका जोर झाला कीं, 'राजाचें वजन वाढलें आहे, वाढत आहे व तें कमी केलें पाहिजे' असा डनिंगचा ठराव कॉमन्ससभेंत पास झाला.

---

## ५१ अमेरिका कशी स्वतंत्र झाली?



**१ वसाहतींपासून इंग्लंडचा फायदा**—१७६३ च्या पॅरिसच्या तहानें अमेरिकेंतील सर्व क्यानडा प्रांत इंग्रजास मिळाला व ॲलेगेनी पर्वताच्या पूर्वेस वसलेल्या तेरा इंग्लिश वसाहती निर्धास्त झाल्या. या वसाहतींपासून इंग्लंडला फायदा कोणता? इंग्लंडांत जी फाजील लोकसंख्या होईल तिला वस्ती करण्यास त्यांचा उपयोग होई. शिवाय व्यापार व उद्योगधंदे या बाबतींत वसाहतींपासून इंग्लंडचा फायदा असे. नाना-

तऱ्हेचे व्यापारनिर्बंधक कायदे करण्यांत आले असून वसाहतींच्या आंत येणारा किंवा वसाहतींतून बाहेर जाणारा कोणताही माल इंग्लिश जहाजें किंवा वसाहतींचीं जहाजें यांतूनच गेला पाहिजे व इतर देशांतून वसाहतींत जाणारा माल पहिल्यानें इंग्लंडांत जावयाचा तेथें त्यावर कांहीं कर वसूल करावयाचे आणि मग तो माल वसाहतींत जाऊं द्यावयाचा असा क्रम होता. इंग्लंडांत तयार होणारा पक्का माल वसाहतींत तयार करण्यास इंग्लंडांतील कारखानदारांच्या हितासाठीं कायद्यांनें खूप जाचक निर्बंध घालून ठेविण्यांत आले होते. अशा रीतीनें जाचक व्यापारी निर्बंध घातले होते खरे; परंतु त्यांचा अंमल सक्त रीतीनें होत नव्हता व अमेरिकन लोक जकाती चुकवून खुशाल मालाची आयात–निर्गत करीत. शिवाय महत्त्वाकांक्षी फ्रेंच वसाहतवाले 'इंग्रज वसाहतवाल्यांचा' मोड करण्यास एकसारखे टपलेले असल्यामुळें इंग्लंडच्या संरक्षणाची वसाहतींस अत्यंत जरूर होती. त्यामुळें व्यापार व उद्योगधंदे यांजवरील निर्बंधांविरुद्ध असंतोष दबून होता. परंतु १७६३ नंतर फ्रेंचांची भीति उरली नाहीं. त्याचप्रमाणें नुकत्याच संपलेल्या सप्तवार्षिक युद्धाच्या वेळीं अमेरिकेंत इंग्रज सरकारनें केलेल्या खर्चाच्या भरपाईसाठीं व आतां वसाहतींच्या संरक्षणार्थ ठेविण्यांत येणाऱ्या सैन्याचें वेतन पुरविण्याकरितां वसाहतींवरील व्यापारी निर्बंध सक्त रीतीनें अंमलांत आणण्यास मुख्य प्रधान ग्रेन्व्हिल यानें सुरवात केली. तेव्हां मात्र वसाहतींत असंतोषाचा भडका उडाला. तशांत वसाहतींवर इंग्लिश पार्लमेंटकडून अन्तर्गत कर बसविण्याचें धोरण इंग्रज प्रधानमंडळानें अंगिकारिलें. ग्रेन्व्हिल यानें इंग्लिश पार्लमेंटांत वसाहतींतील मृत्युपत्रें, खरेदी विक्रीचे गहाणाचे वगैरे कागद, पावत्या इत्यादि व्यवहार–पत्रांवर सरकारी तिकीट लावण्यास भाग पाडणारा 'स्टॅम्प ॲक्ट' पास करून घेतला ( १७६५ एप्रिल ). या करापासून सालिना १०००० पौंड उत्पन्न येईल असा ग्रेन्व्हिलचा अंदाज होता. हा कर बसविला तेव्हां आगींत तेल ओतल्याप्रमाणेंच झालें.

**२ अमेरिकेंतील असंतोष**—या कराविरुद्ध अमेरिकेंत फार गवगवा झाला. ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचा ठराव ठिकठिकाणीं

झाला व त्याचा अंमल जारीनें होऊं लागल्यामुळें इंग्रज व्यापाऱ्यांचें व कारखानदारांचें नुकसान होऊं लागलें. स्टॅम्प जेव्हां विकावयाला आले तेव्हां ते कोणीच घेईना. अमेरिकनांचा पुढीलप्रमाणें कोटिक्रम होता. ( १ ) वसाहतींवर राज्य करण्याची जबाबदारी इंग्रज सरकारनें घेतली आहे ती व्यापारी फायद्याकरितांच होय. ( २ ) नुकत्या झालेल्या युद्धांत इंग्रजांचा झालेला खर्च आपल्या व्यापाराचें रक्षण व्हावें म्हणूनच इंग्रजांनीं केला. ( ३ ) ज्या पार्लमेंटांत आमचे प्रतिनिधी नाहींत त्या पार्लमेंटानें आमचेवर कर बसवूं पाहणें हें अन्यायाचें आहे, व असे प्रतिनिधी अमेरिकेंतून इंग्लडांस पाठविणें अशक्य आहे. ( ४ ) तेव्हां जी पैशाची मदत लागेल ती इंग्रज सरकारनें वसाहत सरकारपाशीं मागावी म्हणजे वसाहतीच्या पार्लमेंटांतून ती मंजूर करण्यांत येईल. यावर इंग्रज सरकारचें म्हणणें असें होतें कीं, "वसाहतींच्या हातून एकीनें बिनबोभाट हें काम होणें अशक्य आहे; तेव्हां आम्हींच कर बसवून आमचा खर्च काढून घेणें बरें. " पण वसाहतींनीं या कराचा निषेध चालू ठेविला. त्यामुळें ग्रेन्व्हिलच्या मागून रॉकिंगहॅमचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें होतें ( १७६५ ), त्यानें इंग्लिश पार्लमेंटास वसाहतीवर कर बसविण्याचा हक्क आहे अशा अर्थाचा एक कायदा पास करून मग स्टॅम्प ॲक्ट रद्द केला ( १७६६ ). व त्यामुळें वसाहतींत तात्पुरती स्वस्थता झाली.

**३ चहा–प्रकरण**—पुढें चॅथॅम ( पिट हा आतां अर्ल ऑफ चॅथॅम झाला होता ) व ग्रॅफ्टन यांचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें ( १७६६ जुलै ); त्यांतील फडनवीस टाउन्शेंड यानें वसाहतींत आयात होणाऱ्या कांच, कागद, रंग व चहा या पदार्थांवर जकात बसविली ( १७६७ ). वसाहतवाल्यांनीं याही करांचा जोरानें निषेध केला. १७७० त लार्ड नॉर्थ हा मुख्य प्रधान झाला. त्यानें राजाच्या आग्रहावरून चहावरील जकात तेवढी कायम ठेवून बाकीच्या जकाती काढून टाकिल्या. हा चहावरील करही १ पौंडास ( अच्छेर ) तीन पेन्स इतका होता. तो देणें वसाहतवाल्यांस मुळींच जड नव्हतें. तथापि इंग्लंडास वसाहतींवर कर बसविण्याचा हक्क नाहीं हें सिद्ध करण्यासाठीं

चहा सोडूं पण कर देणार नाहीं असा वसाहतवाल्यांनीं निश्चय केला. १७७३ त बॉस्टन बंदरांत चहानें लादलेलीं तीन गलबतें होतीं त्यांवर इंडियनांचा वेष घेऊन वीस धाडसी गृहस्थ चढले व त्यांनीं ३४३ पेट्यांतील १८००० पौंड किंमतीचा चहा ' समुद्रास्तृप्यंतु ' केला ! ही बातमी जेव्हां इंग्रज सरकारास समजली तेव्हां त्यानें चिडून जाऊन बॉस्टन बंदरचा व्यापार बंद करण्याचें बिल पास केलें. ही जी इंग्लंडविरुद्ध वसाहतींची चळवळ चालली होती तींत मॅसॅच्युसेट्सचें संस्थान प्रमुख असून बॉस्टन बंदरही त्याच संस्थानांत होतें. इंग्रजसरकारनें मॅसॅच्युसेट्सची ' सनद ' रद्द करून सरकारनें नेमिलेले सभासद तेथील पार्लमेंटांत असावे असा ठराव पास केला ( १७७४ ) ! तसेंच सरकारी अधिकाऱ्यांविरुद्ध फिर्यादी इंग्लंड अगर नोव्हा स्कोशिया यांमध्येच चालावयाच्या असा तिसरा ठराव केला. नंतर या कायद्यांची अंमलबजावणी करण्यासाठीं बॉस्टन बंदरांत सैन्य येऊन उतरूं लागलें.

**४ समेटाचे प्रयत्न**—इकडे मॅसॅच्युसेट्सच्या लोकसभेचा प्रतिनिधि बेंजमिन फ्रांकलिन हा इंग्लंडांत समेट करण्याची खटपट करीत होता. इंग्लिश पार्लमेंटांत बहुमत जरी दडपशाही करणाऱ्या सरकारास अनुकूळ होतें तरी कित्येक स्वातंत्र्याचे कैवारी अमेरिकेची बाजू लोकांपुढें जोरानें मांडीत होते. एडमंड बर्क याचें मत पुढील प्रमाणें होतें. "अमेरिकेवर जकाती बसविण्याचा अधिकार इंग्रजसरकारास आहे कीं नाहीं याचा तत्त्वतः निर्णय करण्याची ही वेळ नाहीं. तर हा हक्क प्रस्थापित करणें कितपत व्यवहार्य आहे याचा विचार केला पाहिजे; व या दृष्टीनें पाहतां अमेरिकन लोक बंड करून उठले तर त्यांस सावरणें अशक्य होईल; यास्तव त्यांच्या मागण्या कबूल करून समेट करण्यांतच इंग्लंडचा फायदा आहे." वसाहतींवर व्यापारविषयक निर्बंध घालणें योग्य असून खर्चाकरितां त्यांजवर कर बसविणें मात्र अन्यायाचें आहे असें चॅथमचें मत होतें. एकदां तर चॅथम म्हणाला "तुम्हांला अमेरिका जिंकता येणार नाहीं; मी जर अमेरिकन असतों तर मीं आपलें शस्त्र कधींही खालीं ठेविलें नसतें." मॅसॅच्युसेट्सच्या स्वातंत्र्यावर गदा आलेली

पाहून जॉर्जियाखेरीज बाकीच्या बारा वसाहतींच्या प्रतिनिधींची एक कॉंग्रेस भरली ( १७७४ सतेंबर ); तिनें नुकत्याच पास झालेल्या दडपशाहीच्या कायद्यांचा जोरानें निषेध केला, व्यापारावर निर्बंध घालण्याचा इंग्रजांचा हक्क मान्य करून कर बसविण्याच्या अधिकाराचा जोरानें निषेध केला, व नवे कायदे रद्द करण्याविषयीं राजापाशीं मागणी केली. परंतु कॉंग्रेसच्या ठरावाकडे जॉर्जनें पुरें दुर्लक्ष केलें. चॅथॅम व बर्क यांच्याही सूचनांकडे कोणी लक्ष दिलें नाहीं व बेंजामिन फ्रांक्लिनचा उघड अपमान झाल्यामुळें निराश होऊन त्यानें इंग्लंडला रामराम ठोकला ( १७७५ मार्च ). येणें-प्रमाणें समेटाचे प्रयत्न फुकट गेले.

**५ आरंभीच्या चकमकी**—मध्यंतरीं दोन्ही पक्षांची युद्धाची तयारी जोरानें चालली होती. मुख्य प्रधान लॉर्ड नॉर्थ याचेंही मत कायदे रद्द करावे असेंच होतें. परंतु तिसरा जॉर्ज हट्टी होता व पार्लमेंट आणि प्रधानमंडळांतील बहुतेक मंत्री त्याची री ओढणारे असल्यामुळें लढाई करून कां होईना पण अमेरिकेस वठणीवर आणावयाचें याच मताची सरशी झाली. इग्लंडांत आपलें स्वातंत्र्य कायम रहात नाहीं म्हणून अमेरिकेंत गेलेल्या धैर्यशील व स्वातंत्र्यप्रिय लोकांचे वसाहतवाले वंशज होते. तेव्हां त्यांच्या ठायीं स्वातंत्र्यप्रेम दिसून आलें यांत काय नवल ? विशेषतः न्यू इंग्लंड संस्थानांतील लोक आपले हक्क शाबूत राखण्याच्या कामीं अत्यंत जागरूक होते. बॉस्टन येथें इंग्रज सैन्य येऊं लागलें; तेव्हां वसाहतवाल्यांनीं कॉंकॉर्ड[२] येथें दारुगोळा जमविण्यास सुरुवात केली; व बारा हजार स्वयं-

---

१ एकंदर वसाहती तेरा होत्या. त्यांचे तीन गट होते, १ न्यू इंग्लंड, २ मध्य वसाहती, ३ दक्षिण वसाहती. न्यू इंग्लंडांत मॅसच्युसेट्स, ऱ्होड आयलंड, कॉनेक्टिकट व न्यू हॅम्पशायर या चार असून त्यांत तेजस्वी प्युरिटनांची वसति होती. न्यूयॉर्क, पेनसिलव्हॅनिया, न्यू जर्सी आणि डिलावेअर या मध्यावरील होत. बाकी राहिलेल्या मेरिलँड, व्हर्जिनिया दोन क्यारोलिना व जॉर्जिया मिळून दक्षिण वसाहती बनल्या होत्या.

२ बॉस्टनपासून अठरा मैलांवर आहे.

सैनिक तयार केले. बोलावितांच एका मिनिटाच्या आंत युद्धास तयार असण्याचें वचन दिल्यावरून त्यांस मिनीट–मेन ( Minute-men ) म्हणत. बॉस्टनमधील इंग्रज सेनापती गेज यानें कॉंकर्ड येथील दारु-गोळ्याचा नाश केला. नंतर इंग्रज सैन्य परत बॉस्टनला जात असतां लेक्सिंगटन येथें अमेरिकनांनीं त्याच्याशीं लढाई दिली. पण बॉस्टनहून मदत आल्यामुळें इंग्रज सैन्य नीट बचावून परत गेलें ( १७७५ एप्रिल ). या लेक्सिंगटनच्या लढाईनंतर एक महिन्यानें सर्व वसाहतींची फिलॅडेल्फिया येथें एक कॉंग्रस भरली व तिनें जॉर्ज वॉशिंग्टन यास या युद्धांत वसाहतवाल्यांच्या सैन्याचा सेनापति नेमलें. बॉस्टन बंदरांतील इंग्रज सैन्यास आसपास जमलेल्या २०००० अमेरिकन स्वयंसैनिकांनीं वेढून टाकिलें. बंकरहिल नांवाची एक टेकडी बॉस्टन बंदराजवळ असून तिचा मारा बॉस्टनवर चालतो. ती अमेरिकनांनीं सर करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें युद्ध होऊन त्यांत अमेरिकनांचा पराभव झाला खरा ( १७८५ जून ); परंतु युद्धांत एक हजार इंग्रज शिपायी पडले. त्यावरून अमेरिकनांच्या शौर्याचा इंग्रजांवर बराच वचक बसला. बंकरहिलच्या लढाईनंतर गेज यास सेनापतिपदावरून दूर करण्यांत येऊन वुइल्यम हौ याची त्या जागीं नेमणूक झाली.

**६ सॅरॅटोगाची लढाई ( १७७७ )**—१७७६ च्या आरंभीं हौनें बॉस्टन सोडिलें व तो नोव्हा स्कोशियामधील हॅलिफॅक्स येथें जाऊन बसला. जुलैच्या चौथ्या तारखेस तेरा वसाहतींच्या प्रतिनिधींची कॉंग्रेस फिलॅडे-ल्फिया येथें भरून प्रसिद्ध '**स्वातंत्र्याचा जाहीरनामा**' काढण्यांत आला (१७७६). पुढें हौनें मध्य वसाहती जिंकण्याचें ठरविलें व न्यू यॉर्क येथें तळ दिला. न्यू यॉर्कजवळ वॉशिंग्टन व हौ यांच्या सारख्या झटापटी चालल्या होत्या. शेवटीं १७७७ च्या सप्टेंबरांत हौनें फिलॅडेल्फिया हें कॉंग्रेसच्या बैठकीचें शहर काबीज केलें. याच वेळीं न्यू इंग्लंड वसाहतींस वेगळ्या काढून चीत करण्याची इंग्रजांनीं मसलत केली होती. पण प्रसंग असा घडून आला कीं जेणेंकरून इंग्रजांस चांगलीच तंबी पोंचून अमेरिकनांचा पक्ष अतिशय प्रबळ झाला. क्यानडा देशांतून जनरल बॅर्गाइन १०,०००

सैन्यासह न्यू यॉर्कमधून क्लिन्टनच्या हाताखालीं पाठविल्या जाणाऱ्या इंग्रज सैन्यास मिळण्याकरितां येत होता. पण हौनें फिलॅडेल्फियाची मोहीम काढल्यामुळें क्लिंटन न्यू यॉर्कमध्यें अडकून राहिला, व अपेक्षित सैन्य बर्गोइनच्या मदतीस वेळेवर गेलें नाहीं आणि अमेरिकनांनीं गनिमी काव्याच्या पद्धतीचा आश्रय करून त्यास इतकें त्रासून सोडिलें कीं, तो त्रासून परत जाऊं लागला. तो सॅरॅटोगा या गांवीं पोंचला तोंच चोहोंकडून अमेरिकनांनीं त्याला कोंडून त्याची दाणावैरण बंद केली. पांच दिवसपर्यंत बर्गोइननें शत्रूस व उपासमारीस दाद न देतां युद्ध चालविलें. मदत येईल या आशेनें तो झगडत होता. पण शेवटीं मदत येत नाहीं असें पाहून बंदुका, तोफा, दारुगोळा इत्यादि सामुग्रीसह तो अमेरिकन सैन्याचे स्वाधीन झाला. त्याच्या सैन्यापैकीं सहा हजार लोकांस फिरून अमेरिकनांविरुद्ध शस्त्र उचलणार नाहीं या अटीवर इंग्लंडांत जाऊं देण्यांत आलें ( १७७७ आक्टोबर ) !

७ **फ्रान्स व स्पेन सामील झाले**—सॅरॅटोगाच्या लढाईनें या युद्धांत एक महत्त्वाचा फरक झाला. फ्रान्समधून आरंभापासूनच पैशाची, हत्यारांची व माणसांची मदत होत होतीच. जे स्वयंसेवक फ्रान्समधून अमेरिकनांस साहाय्य करण्यास गेले त्यांत मार्किस डी लाफायत हा प्रमुख होय. अमेरिकेंतील वसाहतवाले पराक्रमी आहेत व आपण साहाय्य केल्यास तो देश स्वतंत्र होईल व आपणही इंग्लंडचा सूड घेतल्यासारखें होईल, असे विचार फ्रेंच सरकारच्या मनांत येऊन त्याला अमेरिकेच्या कर्तृत्वाचा विश्वास पटला. मग फ्रान्सची युद्धांत पडण्याबद्दल बोलणीं होऊं लागलीं. तेव्हां इंग्रज सरकारास मोठीच धास्ती पडली, व त्यांनीं स्वातंत्र्य वगळून बाकी कोणत्याही सवलती देऊन अमेरिकनांशीं समेट करण्याचा प्रयत्न चालविला. या सवलती जर युद्धापूर्वीं दिल्या असत्या तर युद्ध खास टळलें असतें; पण आतां स्वातंत्र्याची शक्यता दिसूं लागल्यावर अमेरिकन त्या मान्य करण्यास तयार होणें शक्य नव्हतें. रॉकिंगहॅमचा अनुयायी व्हिग पक्ष तर म्हणूं लागला कीं आतां अमेरिकेस वाटेल तर स्वातंत्र्य द्या, पण कसेंही करून हें युद्ध थांबवा. या वेळीं

चॅथम अगदीं म्हातारा झाला असून त्याचें शरीर अगदीं क्षीण झालें होतें व संधिवातानें अगदीं जर्जर झालें होतें. तथापि इंग्लंडचा शत्रु फ्रान्स हा अमेरिकेची बाजू घेणार असें कळतांच त्याच्या देशाभिमानानें उसळी मारिली. अमेरिकेशीं इंग्लंडनें उदारपणानें समेट करावा हें मत त्यानें पहिल्यापासून प्रतिपादिलें होतें. आतां लॉर्ड्स सभेपुढें अमेरिकेचें स्वातंत्र्य मान्य करावें अशी सूचना आली होती. तिला विरोध करण्यासाठीं चॅथम लॉर्ड्स सभेंत हजर राहिला व 'वसाहतवाल्यांशीं उदारपणानें समेट करा; पण फ्रान्सच्या बागुलबोवास भिऊन त्यांचें स्वातंत्र्य मान्य करणें इंग्लंडला लज्जास्पद आहे' असें तो म्हणाला. भाषण करीत असतां त्याला मूर्च्छा आली व बेशुद्ध स्थितींतच त्यास घरीं नेण्यांत आलें ( १७७८ एप्रिल ). पुढें लवकरच या महान् इंग्रज मुत्सद्याचा अंत झाला ( ११ मे १७७८ ). इकडे अमेरिकेशीं कोणत्या प्रकारचें वर्तन करावें यासंबंधीं इंग्लंडांत वाद माजला असतां, इंग्लंडपासून स्वतंत्र झाल्याशिवाय अमेरिका युद्ध थांबवणार नाहीं या अटीवर फ्रान्सनें अमेरिकेशीं तह केला ( १७७८ मार्च ). पुढें जिब्रॉल्टर परत मिळविण्याच्या हेतूनें स्पेनही अमेरिकेतर्फे युद्धांत सामील झाला ( १७७९ ). शिवाय आपल्या शत्रूंशीं कोणाही तटस्थ राष्ट्रानें व्यापार करूं नये यासाठीं त्यांच्या जहाजांची झडती घेण्याचा हक्क आम्हांस आहे असें इंग्रज म्हणूं लागले होते; त्यास त्रासून रशिया, प्रशिया स्वीडन व डेन्मार्क या राष्ट्रांनीं एक 'सशस्त्र तटस्थांचा संघ' निर्माण करून अप्रत्यक्षपणें वाटेल तेव्हां इंग्लंडविरुद्ध आम्ही युद्ध करूं अशी धमकी दिली. डेन्मार्कनें तर १७८० त फ्रान्स व स्पेन यांच्या आरमारास साहाय्य करण्यास आपलें आरमार दिलें व युद्धांत तो देश सामील झाला.

**८ कॉर्नवॉलीस शरण आला**—अशा रीतीनें इंग्रजी आरमारावर इतके शत्रु उठल्यामुळें अमेरिकेंतील इंग्रज सेनापतीस पैशाची म्हणा किंवा माणसांची म्हणा, मदत पाठविणें अशक्य झालें. त्यामुळें तेथील इंग्लिश सैन्य हतबल होऊन किनाऱ्याकडे मागें मागें हटूं लागलें. कॉर्नवॉलीस दक्षिण वसाहतींत यॉर्कटाउन येथें होता. त्याचें न्यू यॉर्कमधील क्लिंटनशीं समुद्रावरून दळणवळण होतें. पण फेंच आरमारानें तें लवकरच

तोडलें. शेवटीं ॲड्मिरल डी ग्रासे यानें समुद्रावरून व वॉशिंग्टन यानें जमिनीवरून कॉर्नवॉलीसच्या सैन्याचा असा कोंडमारा केला कीं, तो अगदीं टेकीस आला. इतक्यांत इंग्लिशांचें १९ जहाजांचें आरमार कॉर्नवॉलिसच्या बचावास आलें; त्याच्यावर आपल्या २८ जहाजांनिशीं चालून जाऊन ग्रासेनें त्याचा फन्ना उडविला. तेव्हां निरुपाय होऊन कॉर्नवॉलीस आपल्या सर्व सैन्यासह यॉर्कटाउन येथें अमेरिकनांस शरण गेला ( १७८१ आक्टोबर १८ ). कॉर्नवॉलीसवर इंग्लंडची सर्व भिस्त होती. तेव्हां तो शरण गेल्यावर या युद्धांत अमेरिकेचा जय होऊन अमेरिकेंतील युद्ध संपलें.

९ **आरमारी युद्ध**—पण इंग्लंडला इतर ठिकाणीं शत्रु उठले होते; त्यांच्याशीं युद्ध आतां जोरांत सुरू झालें. मिनोर्का बेट स्पॅनिश आरमारानें सर केलें व वेस्ट इंडीज मधील पुष्कळ बेटें फ्रेंचांनीं काबीज केलीं. स्पॅनिश आरमारानें जिब्रॉल्टरला वेढा घातला होता. १७८२ त वेढा घालून ४ वर्षे झालीं होतीं. स्पॅनिश लोकांनीं आतां अगदीं निर्वाणीचा प्रयत्न करून पाहण्याचें ठरविलें. जनरल एलियट हा मोठ्या शौर्यानें त्या ठाण्याचें रक्षण करीत होता. चार दिवसपर्यंत अहोरात्र फ्रेंच व स्पॅनिश यांच्या ४०० तोफा जिब्रॉल्टर किल्ल्यावर गोळ्यांचा वर्षाव करीत होत्या; व आंतून इंग्रजही तितक्याच तोफांनीं गोळ्या सोडीत होते. शेवटीं इंग्रजांनीं जळजळीत गोळे सोडण्याची युक्ति अंमलांत आणिली; त्यामुळें शत्रूचीं जहाजें जळूं लागलीं. तेव्हां स्पॅनिश व फ्रेंच आरमारांस परत फिरणें भाग पडलें ! आणि जिब्रॉल्टर इंग्रजांकडे कायम राहिलें ! इकडे ॲड्मिरल रॉड्नी यानें वेस्ट इंडीजमध्यें पराक्रम गाजवून सेंट लुशिया जवळच्या लढाईंत फ्रेंच डी ग्रासेवर मोठा जय संपादन केला (१७८२) ! या लढाईंत रॉड्नीनें नवीच पद्धति अंगिकारिली होती. शत्रूच्या जहाजांची व्यवस्था मोडावयाची व सर्व जहाजांत गोंधळ उडवून देऊन त्यांना एक जलसमाधि तरी द्यावयाची किंवा पकडून तरी ठेवायाचें अशी योजना त्यानें केली. त्यामुळें फ्रेंच आरमाराचा अगदीं धुव्वा उडाला.

**१० इंग्रजांवरील इतर संकटें**—इंग्लिश सरकारनें अमेरिकन युद्धाकरितां आयर्लंडांतील बहुतेक सर्व सैन्य काढून नेलें. तेव्हां आयरिश लोकांनीं अपेक्षित फ्रेंच स्वारीपासून आपल्या देशाचें रक्षण करण्यासाठीं हजारों स्वयंसैनिकांचीं पथकें उभारिलीं. यावेळीं हेन्री ग्रॅटन ( १७४६–१८२० ) हा प्रसिद्ध देशभक्त आयर्लंडला लाभला होता. त्यानें आयरिश पार्लमेंटला कायदे करण्याच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य मिळावें अशी जोराची मागणी केली. तेव्हां १७८२ त फॉक्सच्या सूचनेवरून पॉयानिंग्जचे कायदे रद्द करण्यांत येऊन आयरिश पार्लमेंटला बरेंच स्वातंत्र्य देण्यांत आलें. याच वेळीं हिंदुस्थानांतही मराठे व हैदर यांनीं एक होऊन इंग्रजांवर चालून येण्याचा उद्योग केला, व फ्रेंच आरमार कांहीं शिपायी घेऊन हिंदुस्थानकडे येण्यास निघालें. पण हिंदुस्थानचा गव्हरनर–जनरल हेस्टिंग्ज यानें पहिल्या दोघांची व्यवस्था लाविली; व ॲड्मिरल ह्यूझ ( Hughes ) यानें फ्रेंच आरमाराशीं पांच लढाया देऊन त्यास परतावयास लाविलें.

**११ व्हर्सेल्सचा तह ( १७८३ )**—असा चोहों बाजूंस इंग्रजांस ताण बसला व लॉर्ड नॉर्थ याचें प्रधानमंडळ ( १७७०-१७८२ ) जयाविषयीं निराश झालें. शेवटीं १७८२ च्या मार्चांत राजानें नॉर्थचा राजीनामा स्वीकारिला व मग रॉकिंगहॅम हा मुख्य प्रधान झाला. या नवीन प्रधानमंडळानें तहाची वाटाघाट सुरू केली व लवकरच व्हर्सेल्स ( पॅरिसजवळ ) येथें तह ठरला ( १७८३ ). त्या अन्वयें अमेरिकेचें ( संयुक्त संस्थानें ) स्वातंत्र्य इंग्रजांनीं कबूल केलें व क्यानडाच्या दक्षिणेस ॲटलँटिक महासागराच्या पश्चिमेचा मिसिसिपी नदीपर्यंतचा मुलूख इंग्रजांच्या हातून गेला. रॉड्नीच्या जयामुळें व अद्वितीय शौर्यानें केलेल्या जिब्रॉल्टरच्या बचावामुळें फ्रान्स व स्पेन यांशीं जो तह झाला त्यांत इंग्रजांस फारशा प्रतिकूळ अटी नव्हत्या. मिनोर्का बेट व फ्लॉरिडा हीं स्पेनला देण्यांत आलीं. फ्रान्सला वेस्ट इंडीजपैकीं सेंट लुशिया व टोबॅगो हीं परत देण्यांत येऊन चंद्रनगर व पाँडिचरी हीं हिंदुस्थानांतील ठिकाणेंही

परत करण्यांत आलीं व डन्कर्कच्या पडक्या किल्ल्यास तटबंदी करण्यासही मंजुरी मिळाली. या युद्धामुळें इंग्लंडच्या हातून अमेरिका गेली व आपल्यापासून बळजबरीनें इंग्लंडनें साम्राज्य हिसकावून घेऊन गिळंकृत केलें त्याबद्दल शासन म्हणून त्याला त्यापैकीं एक महत्त्वाचा भाग ओकावयास लावून आपला झालेला अपमान अंशतः तरी आपण धुवून टाकिला असें वाटून फ्रान्सला समाधान झालें !

---

# ५२ तरुण पिट प्रधानगिरीवर आला.



**१ फॉक्सचें इंडिया बिल**—व्हर्सेल्सचा तह झाला तेव्हां व्हिगपक्ष अधिकारारूढ असून रॉकिंगहॅम मध्यंतरीं वारल्यामुळें शेलबर्न हा मुख्य प्रधान होता. परंतु व्हिगपक्षांत एकी नांदत नसल्यामुळें लवकरच व्हिग प्रधानमंडळांत फूट पडली. व्हिग पक्षाचा वजनदार पुढारी चार्लस फॉक्स प्रधानमंडळांतून फुटला, व लॉर्ड नॉर्थ या टोरी पक्षाच्या पुढाऱ्याशीं संगनमत करून व्हिग व टोरी या दोन्ही पक्षांचें संयुक्त प्रधानमंडळ त्यानें बनविलें ( १७८३ फेब्रुवारी ) ! हिंदुस्थानची सत्ता सर्वस्वी ईस्ट इंडिया कंपनीच्या हातींच होती. वॉरन हेस्टिंग्ज हा गव्हरनर जनरल असून त्यानें लोकांवर जुलूम चालविला आहे व हेस्टिंग्जकडून खूप पैसा मिळत असतांही कंपनीचें दिवाळें निघण्याची वेळ आली आहे अशी बातमी पार्लमेंटास समजली. तेव्हां कंपनींतील लोक व्यापारी असल्यानें त्यांचे हातून हिंदुस्थानचा राज्यकारभार समाधानकारक रीतीनें होणें अशक्य आहे असें प्रधानमंडळास वाटलें; व हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची स्थिति सुधारण्यासाठीं फॉक्सनें आपलें 'इंडिया बिल' पार्लमेंटपुढें मांडिलें. त्यांत पार्लमेंटानें एक सात कमिशनरांचें बोर्ड नेमावें, एकदां नेमलेल्या सभासदांचा अधिकार पांच वर्षें चालावा, त्याची हुकमत हिंदुस्थानांतील सर्व कारभारावर चालावी

व केवळ व्यापार विषयक बाबतींत कंपनीची सत्ता चालावी अशा सूचना होत्या. हें बिल बर्कनें तयार केलें असून तें एकंदरीनें हिंदी जनतेच्या हितसंबंधास अनुकूळ होतें. तथापि तें इंग्लंडांत कोणासच आवडलें नाहीं. ईस्ट इंडिया कंपनी ही एक गबर व्यापारी मंडळी असल्यामुळें तिच्या हातांतील अधिकार जातो हें पाहून व्यापारी-वर्ग त्या बिलाविरुद्ध ओरड करूं लागला. कॉमन्स सभेकडे हिंदुस्थानचा अधिकार जाणार हें पाहून जॉर्ज असंतुष्ट झाला. पांच वर्षांचे सभासद एकदां नेमिल्यावर हिंदुस्थानच्या बाबतींत पार्लमेंटास कांहींच अधिकार या योजनेनें रहात नव्हता; यास्तव बऱ्याच लोकांस तें आवडलें नाहीं. सामान्य जनसमूहास फॉक्स व नॉर्थ यांनीं एकी करून स्थापिलेलें प्रधानमंडळच गर्ह्य वाटत असल्यामुळें त्यांचाही विरोध होताच. तेव्हां राजास आयतेंच फावलें. लॉर्ड्स सभेंत आपल्या वजनाचा उपयोग करून तें बिल त्यानें फेटाळून लाविलें. लॉर्ड्स सभेंत बिलाचें दुसरें वाचन चाललें असतां त्यानें धाकट्या पिटचा मामेभाऊ टेंपल याजबरोबर लॉर्ड्स सभेस असा निरोप कळविला कीं, 'जो कोणी या बिलास अनुकूळ मत देईल तो राजाचा मित्र नाहीं, इतकेंच नव्हे तर तो राजाचा प्रत्यक्ष शत्रुच समजण्यांत येईल !' ही तंबी पोंचतांच तिचा इष्ट परिणाम होऊन बिल लॉर्ड्स सभेंत नामंजूर झालें. लागलीच त्याच रात्रीं राजानें प्रधानमंडळापासून शिक्का मोर्तब परत मागविलीं व फॉक्स व नॉर्थ यांचें संयुक्त प्रधानमंडळ एकदम अधिकारच्युत झालें !

**२ धाकटा पिट**—त्यानंतर जॉर्जनें चॅथमचा मुलगा वुइल्यम पिट यास मुख्य प्रधान नेमिलें ( १७८३ डिसेंबर ). पिटचा जन्म सप्तवार्षिक युद्धांतील १७५९ या विजयसंवत्सरांत झाला असून या वेळीं तो अवघा चोवीस वर्षांचा होता. प्रथम कॉमन्स सभेंत पिटचीं बिलें सारखीं नापास होऊं लागलीं. त्याचे प्रतिस्पर्धी म्हणूं लागले "काय हीं पोरें आतां प्रधानगिरीचा खेळ खेळूं लागली काय ? यांचे कान उपटून यांस परत शाळेंत शिकावयास पाठविलें पाहिजे !" पांच महिनेपर्यंत कॉमन्स पिटला विरोध करीत होते. पण राष्ट्राचें मत आपणास अनुकूळ आहे असा पिटला

पक्का विश्वास असल्यामुळें तो पार्लमेंट लवकर बरखास्त करण्याच्या भानगडींत न पडतां तसाच धिम्मेपणानें आपल्या प्रतिस्पर्ध्यांस तोंड देत राहिला. राष्ट्रास विचार करण्यास वेळ मिळावा म्हणूनच त्यानें हा मार्ग स्वीकारला. शेवटीं निवडणूक होऊन जेव्हां नवे सभासद आले तेव्हां पिटच्या बाजूचेंच बहुमत झालें ( १७८४ मे ). या पार्लमेंटांत व्हिग पक्षाचे थोडे लोक निवडून आले व टोरी पक्षाची सरशी होऊन पिट त्यांचा पुढारी बनला; व त्यानें त्या पक्षाच्या बळावर इंग्लंडची राज्यनौका सुमारें वीस वर्षेपर्यंत हाकारली. कर्तृत्वशक्ति, औदार्य व पार्लमेंटपेक्षां राष्ट्रावर वजन पाडून लोकप्रियता मिळविण्याची हौस, हे गुण त्याच्या ठिकाणीं बापाप्रमाणें उत्कटत्वानें वास करीत होते. चॅथमप्रमाणें उत्कट कल्पनाशक्ति त्याच्या ठिकाणीं नव्हती व त्याचीं सरळ आणि मुद्देसूद भाषणें चॅथमच्या रसभरित वक्तृत्वापुढें फिकीं पडत या गोष्टी खऱ्या. तथापि चॅथमची दिमाख करण्याची हौस व उधळपट्टीही त्याच्या ठिकाणीं मुळींच नसून साधेपणा, सदभिरुचि व आत्मसंयमन हे त्याचे गुण वाखाणण्यासारखे होते. शिवाय शांतताप्रेम, दीर्घोद्योग, कामाचा आटोप, वादकुशलता, व आंकडे–शास्त्रांतील प्रावीण्य हे गुण त्याच्या ठायीं असून यांत वॉल्पोलशीं त्याचें साम्य आढळून येतें. वॉल्पोलचे दोष मात्र त्याच्या ठिकाणीं बिलकुल दिसून येत नाहींत. तो स्वार्थनिरपेक्ष असून लांचेचा उपयोग राज्यकारभारांत त्यानें कदापि केला नाहीं. आपले अनुयायी आपल्याला वरचढ होतील ही भीति वॉल्पोलप्रमाणें त्याला कधींही वाटली नाहीं. वॉल्पोलला विरोध करणाऱ्या 'बॉय पेट्रियट्स'मधून पिट ( चॅथम ) सारखे हिरे निघाले तर वुइल्यम पिटनें हातीं धरलेल्या लोकांतून कॅनिंग व वेल्स्ली यांजसारखे प्रसिद्ध पुरुष निघाले. देशांत स्वस्थता राखून बाकी कांहीं करावयाचें नाहीं हें वॉल्पोलचें थंडें धोरण न स्वीकारतां सांपत्तिक, राजकीय, धार्मिक वगैरे बाबतींत सुधारणा करण्याचें जोरदार धोरण त्यानें राज्यकारभारांत शिरल्याबरोबर स्वीकारिलें, हाही या दोन मुत्सद्यांमधील महत्त्वाचा फरक आहे. पिट टोरी पक्षाचा पुढारी झाला हें खरें; परंतु नॉर्थप्रमाणें राजाच्या हातचें बाहुलें तो केव्हांही बनला नाहीं. त्यानें

राजाशीं स्वाभिमानपूर्वक वागून आपल्या मताप्रमाणें राष्ट्रकल्याण करण्याचें उज्ज्वल धोरण स्वीकारिलें.

३ **पार्लमेंटच्या सुधारणेचें बिल**—कॉमन्ससभा लोकमताची खरीखुरी निदर्शक करण्यासाठीं सुधारणा करणें जरूर आहे याची इंग्लिश मुत्सद्यांस अलीकडे जाणीव उत्पन्न झाली होती. पुष्कळ बरो केवळ नांवाचींच राहिलीं असून, त्यांतून जे सभासद निवडून येत ते कोणातरी श्रीमंताचे हस्तक असत. कौंटींतून जे सभासद निवडून येत ते मात्र लोकमत-निदर्शक असत. तेव्हां 'नामधारी बरोंचा पार्लमेंटला सभासद पाठविण्याचा हक्क काढून घेऊन तो कौंटींना द्यावा हा एक सुधारणा करण्याचा मार्ग होता. पिटनें १७८५ त पार्लमेंटपुढें एक सुधारणा-बिल आणिलें. त्यांत नामधारी बरोंपैकीं छत्तिसांच्या हक्काची एकदम वाट लावून बाकीच्यांचाही हळूहळू नाहींसा करण्याची व्यवस्था करून त्यामुळें रिकाम्या झालेल्या जागा कौंटींस व नवीन मोठ्या शहरांस देण्याचें ठरविलें होतें. नामधारी बरोंच्या मालकांस हक्क गमाविल्याबद्दल बाजारभावाप्रमाणें योग्य मोबदला देण्याचीही व्यवस्था बिलांत होती. परंतु सुधारणेची अवश्यकता यावेळीं जोरानें भासत नव्हती. एकतर बर्कनें तयार केलेले सांपत्तिक सुधारणेचें बिल १७८२ त पास झाल्यामुळें पार्लमेंटांतील सभासदांस अप्रत्यक्ष लांच देण्यासाठीं खर्च होत असलेला पैसा आतां तसा खर्च होत नव्हता. आणखी पार्लमेंटचें मत एक व राष्ट्रमत दुसरेंच ही स्थिति आतां राहिली नव्हती. त्याशिवाय ज्यांच्या मालकीचीं बरो असत ते या सुधारणेच्या अगदीं विरुद्ध होते. तेव्हां श्रीमंत व वजनदार व्हिग पुढाऱ्यांनीं बिलास विरोध केला व पिटचा अनुयायी जो टोरी पक्ष त्यांतीलही बरेच सभासद विरुद्ध बाजूस मिळाले व बिल पार्लमेंटांत नामंजूर झालें !

४ **सांपत्तिक सुधारणा**—'पार्लमेंटची सुधारणा' करण्याच्या कामांत पिटला अशा तऱ्हेनें जरी अपयश आलें असलें तरी सांपत्तिक सुधारणेच्या प्रश्नांत जें यश त्याला आलें त्यापुढें हें अपयश

कोठल्या कोठें लोपून जातें ! अमेरिकन युद्धामुळें राष्ट्रीय कर्ज २० कोटी पौंडांपर्यंत वाढलें होतें; व सरकारी वसूल मुख्यतः आयात मालावरील जबर जकातीपासून होत होता; व त्या जकाती वसूल करीत असतांना तर लांड्यालबाडया फारच चालत. त्यामुळें सरकारी उत्पन्नांत फारच मोठी तूट पडे. पिटनें चहा व दारू यांजसारख्या बहुजनसमूहास लागणाऱ्या पदार्थांवरील आयात जकाती पुष्कळ कमी केल्या. त्यामुळें या पदार्थांच्या किंमती उतरल्या, व जकात चुकविण्याचे प्रकार बंद झाले. मागणी इतकी वाढली कीं जकाती कमी केल्या तरी सरकारचें उत्पन्न कमी न होतां उलट वाढलें. बंदरावर घेण्याच्या जकाती ( Customs ) बऱ्याच कमी करून कित्येक पदार्थांवर अन्तर्गत कर ( Excise ) म्हणून जकात वसूल करण्याची पद्धति त्यानें अमलांत आणिली ! शिवाय कमिशनमागून कमिशन नेमून सरकारी खर्चांत जितकी म्हणून काटकसर करतां येईल तितकी त्यानें केली. त्यामुळें सरकारी उत्पन्नांत जी दरसाल तूट येत होती ती स्थिति पालटून सरकारजवळ दोन वर्षांत दहा लाख पौंड शिल्लक राहिली. पिटनें राष्ट्रीय कर्जाच्या फेडीसाठीं एक गंगाजळी( Sinking Fund) करण्याचें ठरवून त्याकरितां दहा लक्ष पौंड दरसाल शिल्लक टाकून चक्रवाढीनें व्याजीं लावावयाचे व त्या निधींतून शेवटीं राष्ट्रीय कर्जाची फेड करावयाची अशी व्यवस्था केली. सरकारनें व्याजीं लाविलेल्या रकमेस राष्ट्रीय कर्जापेक्षां अधिक व्याज मिळत असल्यामुळें या व्यवस्थेंत देशाचा फायदा होता. परंतु पुढें लवकरच युद्ध सुरू झालें, तेव्हां स्थिति उलट होऊन गंगाजळीपासून नफ्याऐवजीं तोटा होऊं लागला. शेवटीं १८०७ सालीं ही गंगाजळीची पद्धति बंद करण्यांत आली. तथापि पिटनें ती चालू केली त्यावेळीं तिच्यामुळें सरकारवर लोकांचा विश्वास वाढून व्यापारास स्थैर्य आलें यांत शंका नाहीं.

**५ औद्योगिक क्रांन्ति**—इतक्या ज्या हितकर गोष्टी पिटला करतां आल्या, त्यांत त्याला एक मोठी अनुकूलता होती. अठराव्या शतकाचा उत्तरार्ध म्हणजे इंग्लंडमधील उद्योगधंद्याच्या बीजारोपणाचा काळ होय. तोंपर्यंत देशांत शेतकी हाच मुख्य धंदा होता. पण या

शतकार्धांत झालेल्या शोधांमुळें उद्योगधंद्यांची जोरदार लाट देशांत उसळली व देशस्थितींत अत्यंत पालट झाला; पुष्कळ खेडेगांवांचीं शहरें बनलीं, नवीन जंगी शहरें अस्तित्वांत आलीं, व इंग्लंड हा मुख्यतः शेतीवर अवलंबून असणारा देश औद्योगिक कारखान्यांनीं भरून गेला. इंग्लंडांत आतांपर्यंत लोकरीचें कापड तयार करण्याचा धंदा होता. परंतु सर्व काम हातांनीं चालत असे. लवकरच कापसाचें कापड तयार करण्याच्या धंद्यांत नवीन शोध झाले व त्यामुळें कापसाच्या कापडाचा धंदा फारच मोठ्या प्रमाणावर सुरू झाला. १७६१ सालीं धांवते धोटे (Fly shuttles) निघाले. नंतर लँक्याशायरमधील जेम्स हार्ग्रीव्ह्ज या कोष्टयानें एक सूत कांतण्याचें यंत्र तयार केलें ( १७६७ ). त्यायोगें पूर्वींच्या आठपट कापड एक माणूस काढी. १७६९ त आर्कराइट यानें एक निराळें सूत कांतण्याचें यंत्र काढिलें. पुढें लँक्याशायरमधील एक सूत काढणारा क्रॉम्पटन यानें या दोन्ही यंत्रांचा मिलाफ करुन नवीन यंत्र ( Mule ) बनविलें. पुढें कार्टराइट यानें बाष्पशक्तीनें चालणारा माग काढला व झटपट निघणारें सूत विणून त्याचें भराभर कापड बनविण्याची सोय करून दिली ( १७८५ ). मध्यंतरीं जेम्स वॅट यानें बाष्प–यंत्रांत सुधारणा करून तें उपयुक्त केलें होतें ( १७६९ ), व खाणींतून काढिलेल्या लोखंडाचा रस बनविण्यास साध्या कोळशाऐवजीं दगडी कोळसा उपयोगीं पडतो, हाही शोध लागला होता. त्यामुळें लोखंडाचीं यंत्रें बनविण्याच्या उद्योगाची झपाट्यानें वृद्धि झाली. थोड्याच काळांत लँक्याशायरमध्यें कापडाचे कारखाने, यॉर्कशायरमध्यें लोकरीच्या कापडाचे कारखाने व मध्य-इंग्लंडांत लोखंडी कामाचे कारखाने वाढूं लागले. या सर्व कारखान्यांना लागणारा दगडी कोळसा इंग्लंडांत मुबलक असल्यामुळें तो खाणींतून काढण्याचाही धंदा मोठ्या प्रमाणावर सुरू झाला. कारखान्यांना लागणारा दगडी कोळसा व मोठीं यंत्रें व त्यांच्यांतून तयार झालेले पक्के जिन्नस वाहून नेण्यास साधे रस्ते उपयोगीं पडतनासे होते; तेव्हां सर्व उद्योगधंद्यांच्या भागांत लवकरच कालव्यांचें जाळें पसरण्यांत येऊन या जलमार्गानें ने–आण मोठ्या प्रमाणावर होऊं लागली. आरंभींचे कालवे

१७५८–६० यांच्या दरम्यान झाले. या औद्योगिक क्रान्तीमुळें इंग्लंडची सांपत्तिक भरभराट झाली व पुढें जें नेपोलियनशीं युद्ध झालें त्यांत तीमुळेंच इंग्लंड तगलें. १७६० पर्यंत शेतकीही लहान प्रमाणावरच करण्यांत येई. तथापि लोकसंख्या थोडी असल्यामुळें देशास धान्य पुरून परदेशांतही तें निर्गत होई. औद्योगिक क्रान्तीबरोबर शेतकीच्या धंद्यांतही सुधारणा झाली. आतां शेती मोठ्या प्रमाणावर करण्यांत येऊं लागली. मोठमोठ्या जमीनदारांनीं बारक्या जमिनी व गांवरानें विकत घेऊन आपलीं मोठीं शेतें बनविलीं. त्यामुळें धान्य पुष्कळच जास्त होऊं लागलें. परंतु वाढत्या लोकसंख्येच्या मानानें ही वाढ पुरी पडली नाहीं. लहान लहान स्वतंत्र शेतकरीही आतां नाहींतसे झाले. यापूर्वीं त्यांनीं आपल्या शेतावर काम करावें व घरीं बायकोनें सूत काढावें व दोघांच्या श्रमांनीं कुटुंब पोसावें अशी स्थिति असे. परंतु औद्योगिक शोधांमुळें कारखान्यांतून सूत इतकें निघूं लागलें व तें इतकें स्वस्त झालें कीं, स्वतंत्र शेतकऱ्याच्या घरचा धंदा बसला, व त्यामुळें शेतावर त्याला निर्वाह करितां न आल्यामुळें तें विकणें त्याला भाग पडलें व तो मजूर बनला.

६ **व्यापारविषयक धोरण**—आतां देशाच्या सांपत्तिक सुस्थितीमुळेंच पिटला आयर्लंड व फ्रान्स या देशांशीं उदारपणाचे सांपत्तिक तह करण्याची बुद्धि झाली. आयर्लंडांत दारिद्र्य आ पसरून बसलें होतें; व तेथील असंतोषाच्या मुळाशीं दारिद्र्य हेंच मुख्य कारण आहे असें पिटनें तेव्हांच ताडिलें. आयर्लंडांत चरण्यास कुरणें मुबलक असल्यामुळें हजारों जनावरें त्या देशांत होतीं; व इंग्लंडांत आयर्लंडांतून जनावरें आणण्याची परवानगी ठेविली असती तर आयर्लंडला त्या व्यापारापासून बराच फायदा झाला असता. पण इंग्रज गोपालांचे हिताकरितां आयर्लंडांतून जनावरें आयात करण्याची बंदी करण्यांत आली होती. इंग्लंडांतील उद्योगधंदे वाढावेत म्हणून आयरिश उद्योगधंद्यांवर जबर जकातीचे निर्बंध घालण्यांत आले होते. प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ ॲडम स्मिथ याचा राष्ट्रांची संपत्ति (Wealth of Nation) हा ग्रंथ १७७६ सालीं प्रसिद्ध झाला होता. इंग्लंडचे उद्योगधंदे वाढण्यास आयरिश धंदे मारलेच पाहिजेत

असें नाहीं, अशी त्या ग्रंथाचा खोल अभ्यास करून पिटची खात्री झाली व त्यानें इंग्लंड व आयर्लंड यांजमधील व्यापारावरील निर्बंध रद्द करण्याचें बिल पार्लमेंटपुढें आणिलें. पण इंग्रज व्यापारी व मँचेस्टरचे कारखानदार यांनीं उपसूचना करून इतक्या कांहीं पुरवण्या त्यांत घुसडल्या कीं, आयरिश पार्लमेंटनें आम्हांस हें बिल नको असें म्हणून तें फेटाळून लाविलें (१७८७)! आयर्लंडवरील निर्बंध तसेच राहून आयरिश जनता तशीच दुःखी व असंतुष्ट राहिली. फ्रान्ससंबंधानें मात्र पिटचें धोरण यशस्वी झालें. १७८७ सालीं त्यानें फ्रान्सशीं तह केला. त्यानें लायसेन्स किंवा पासपोर्ट घेतल्याशिवाय दोन्ही देशांतील रहिवाशांस परस्परांच्या देशांत रहाण्याची व प्रवास करण्याची मोकळीक झाली. दोन्ही देशांमधील व्यापार–विषयक निर्बंध काढून टाकण्यांत येऊन आयात जकातीही कमी करण्यांत आल्या.

७ **हिंदुस्थानचा कारभार**—ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांच्या हातांत सत्ता ठेवून त्यांजवर देखरेख करण्यासाठीं प्रिव्ही कौन्सिलच्या सभासदांपैकीं कांहीं सभासदांचें एक बोर्ड नेमण्यांत यावें अशा स्वरूपाचें एक ‘ इंडिया बिल ’ पिटनें अधिकारावर येतांच १७८४ मध्यें पार्लमेंटपुढें आणिलें व तें पास झालें. पुढें १८५८ पर्यंत या व्यवस्थेप्रमाणेंच हिंदुस्थानचा राज्यकारभार चालला. डिरेक्टरांचीं कामें त्यांच्यांतील तीन सभासदांची एक खास कमिटीच करीत असून बोर्डचा अधिकार बोर्डचा प्रेसिडेंटच बहुतेक गाजवीत असे व तो प्रधानमंडळांतील एक मंत्री असल्यामुळें हिंदुस्थानचा कारभार पर्यायानें इंग्रजी प्रधानमंडळाकडेच गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतक्यांत क्लाइव्हनें मिळविलेल्या इंग्लिश राज्याचें संरक्षण व वाढ करून हेस्टिंग्ज हिंदुस्थानांतून परत आला. हेस्टिंग्जनें हिंदुस्थानांतील इंग्लिश राज्याचें संरक्षण करण्यासाठीं व डिरेक्टरनीं केलेली पैशाची मागणी पुरविण्यासाठीं नानातऱ्हेचे अन्याय करून पैसा उकळला असा इंग्लिश व्हिग मुत्सद्दी फॉक्स व बर्क यांचा दृढ ग्रह झाला होता. त्यानें निरपराधी रोहिल्यांशीं व्यर्थ युद्ध करून त्यांना छळलें, अयोध्येच्या बेगमांचा अमानुष छळ करून त्यांजपासून पैसे काढिले, इत्यादि घोर अपराध केल्याच्या आरोपावरून

त्याची चौकशी करण्याचें फॉक्स व बर्क यांनीं ठरविलें. या चौकशींत कॉमन्स हे फिर्यादी असून लॉर्ड्स हे न्यायाधीश होते. बर्क, शेरिडॅन व फॉक्स या प्रसिद्ध व्हिग पुढारी वक्त्यांनीं हेस्टिंग्जवरचे आरोप सांगितले. त्यांनीं वर्णिलेलीं हेस्टिंग्जचीं जुलुमीं कृत्यें ऐकून श्रोत्यांच्या अंगावर शहारे आले! हा खटला (Impeachment) खितपत खितपत सात वर्षेंपर्यंत ( १७८७–९५ ) चालला. शेवटीं १७९५ च्या एप्रिलांत हेस्टिंग्जला निर्दोषी म्हणून सोडून देण्यांत आलें. या खटल्यामुळें एवढें मात्र निदर्शनास आलें कीं कित्येक अधिकाऱ्यांचा हिंदुस्थानांत जाऊन लोकांस पिळून पैसे काढावयाचे व गब्बर होऊन इंग्लंडांत परत आल्यावर 'नबाब' बनून यथेच्छ चैनींत लोळावयाचें हा आयुष्यक्रमच होऊन बसला होता! व्यापारांतही पुष्कळ लांड्यालबाड्या बाहेर आल्या. यापुढें असल्या चैनी अधिकाऱ्यांवर वचक बसून हिंदुस्थानांतील जुलूम कमी झाला व हिंदुस्थानचीं बंदरें सर्व जगाच्या व्यापारास खुलीं करण्यांत आलीं.

---

# ५३ फ्रान्सशीं युद्ध.



**१ फ्रान्समधील राज्यक्रान्ती**—पिटनें इंग्लंडांत सांपत्तिक व राजकीय सुधारणा चालविल्या होत्या, व देश समृद्ध व सुखी करावा यासाठीं त्याच्या एकसारख्या खटपटी चालल्या होत्या. इतक्यांत १७८९ सालीं फ्रान्स देशांत क्रान्तिकारक चळवळ जोरानें सुरू झाली व चोहोंकडे दंगल माजून राहिली. अर्वाचीन युगाला आरंभ होऊन व छापखाने, धर्मस्वातंत्र्य, शास्त्रीय शोध व राष्ट्रीयत्वाची बुद्धि इत्यादिकांची विशेष शक्ति युरोपांत अवतीर्ण होऊन जरी कांहीं शतकें लोटलीं होतीं, तथापि फ्रान्सची व इतर युरोपियन देशांची समाजरचना मध्ययुगाच्या धर्तीवरच वसविलेली होती. धर्मगुरू व सरदार यांचें सर्व समाजावर पूर्ण वर्चस्व

चालणें हा या रचनेचा विशेष असून त्याचा फ्रान्समध्यें जारीनें अंमल होता. या रचनेचा अर्वाचीन काळीं उपयोग नसल्यानें फ्रान्समध्यें जोराची चळवळ करून लोकांनीं तिचा नायनाट केला, व एकोणिसाव्या शतकांत इतर युरोपियन राष्ट्रांनींही त्याचें अनुकरण केलें. यामुळें फ्रान्समधील राज्यक्रान्तीला फ्रान्सच्याच इतिहासांत नव्हे तर युरोपियन इतिहासांतही अत्यंत महत्त्व आहे. म्हणून ती घडून येण्यास कोणतीं कारणें झालीं, तीं आतां थोडक्यांत पाहूं. सरदार व बडे धर्मगुरू यांना पुष्कळ विशेष हक्क व सवलती असत. त्यांनीं ज्या कुळांकडे जमिनी लाविल्या असत त्यांच्याकडून आपल्या घरचीं सर्व कामें फुकट करून घेण्याचा या बड्या लोकांना अधिकार असे. इंग्लंडांत सुद्धां मध्ययुगांत ही स्थिति होती; पण नक्त पैसे देण्याचा ठराव करून कुळांनीं या चाकरीच्या निर्बंधापासून आपली सुटका करून घेतली होती. धर्मगुरू व सरदार यांजवरील कर अगदीं हलके असून सामान्य जनतेवर करांचें ओझें इतकें भयंकर झालें होतें कीं, उत्पन्नापैकीं एक पंचमांश हिस्साच सामान्य माणसास स्वतःकरितां राही ! बडे लोक आपली शिकारीची हौस पुरविण्यासाठीं जंगल राखीत. मग त्यामुळें गरिबांच्या पिकाचें नुकसान झालें तरी हरकत नाहीं ! शिवाय कित्येक बडे लोक खबुतरांचे समूह बाळगीत; त्यामुळें तर तीनदां पेरावें तेव्हां एकदां पीक हातीं पडावें अशी स्थिति प्राप्त होई. बरें, शहरांतून पाहिलें तर प्रत्येक धंद्याचा संघ असे व त्या संघाच्या सभासदांशिवाय इतरांचा त्या धंद्यांत प्रवेश होणें अशक्य होतें. सैन्यांतील वरिष्ठ दर्जाच्या जागा 'बडया बापके बेटयां' करितां राखिलेल्या असत. त्याचप्रमाणें धर्मखात्याची स्थिति होती. याचा परिणाम असा झाला कीं, सामान्य जनांपैकीं कोणाही व्यक्तीस आपली कर्तबगारी दाखविण्याची सवड राहिली नाहीं. अशा वेळीं व्हॉल्टेअर ( १६९४–१७७८ ) या तेजस्वी ग्रंथकारानें जोरदार लेख लिहून धर्मखात्यांतील दोष उघडकीस आणिले व लोकांची स्वतंत्र विचारशक्ति प्रदीप्त केली. त्याचप्रमाणें रूसो ( १७१२–१७७८ ) या प्रसिद्ध ग्रंथकारानें निसर्गशक्तींच्या रम्य स्वरूपाचें वर्णन करून समाजांतील कृत्रिम भेदांवर खरमरीत टीका केली. त्यामुळें

समाजांतील विषमता सामान्य जनतेस असह्य होऊन लवकरच भडका उडणार हें उघड होतें ! शिवाय या काळांत अनियंत्रित राज्यपद्धतीचाच फ्रान्समध्यें अंमल असून लोकमताची किंमत कवडीमोल होती. फ्रान्समधील लोकप्रतिनिधि सभेची ( States General ) बैठक सन १६१४ पासून–म्हणजे गेल्या पावणे दोनशें वर्षांत–कधींच बोलाविण्यांत आली नव्हती. त्यामुळें लोकांमधील असंतोष व्यक्त होण्यास कांहींच साधन न राहून तो सारखा धुमसत राहिला. सन १७७८ त व्हॉल्टेअर व रूसो वारले; त्याचवेळीं फ्रेंच सरकारनें स्वातंत्र्याप्रीत्यर्थ झगडणाऱ्या अमेरिकेस मदत करण्यास फ्रेंच लोकांस आग्रहपूर्वक विनंती केली. तेव्हां मात्र जनतेच्या उत्साहास भरती येऊन तिनें अमेरिकेस मनापासून साहाय्य केलें व अमेरिका स्वतंत्र झाली ( १७८३ ). पुढें 'उत्पन्न थोडें व खर्च फार' अशी खुद्द फ्रेंच सरकारची स्थिति झाली. परदेशांशीं सर्व शतकभर फ्रान्सनें सारख्या लढाया केल्या त्यांत फार खर्च झाला होता; अमेरिकेंतील वसाहती व हिंदुस्थान हीं हातचीं गेल्यामुळें व्यापार नाहींसा झाला; व शेवटीं तर सरकारचें दिवाळें निघण्याची वेळ आली. तेव्हां लोक–प्रतिनिधींपुढें आपली दीन स्थिति मांडावी, याशिवाय गत्यंतर नाहीं असें पाहून सरकारनें लोकसभेची बैठक भरविली ( १७८९ जून ). पूर्वीं तिच्यांत सरदार, धर्मगुरू, व सामान्य जन असे तीन वर्ग असून त्यांच्या सभा निराळ्या असत. परंतु आतां सामान्य जनांनीं सरदार व धर्मगुरू यांना आपल्याबरोबर एकाच सभेंत बसण्यास भाग पाडिलें व हे सर्व वर्ग मिळून झालेल्या सभेस 'राष्ट्रीय सभा' असें नांव दिलें, व तिच्या हातीं अधिकारसूत्रें गेलीं. या राष्ट्रीय सभेनें अधिकारावर येतांच राज्यास आधारभूत घटना ( Constitution ) करण्याचें ठरविलें. थोड्याच दिवसांत पॅरिसजवळचा बडा तुरुंग फोडून कैद्यांस सोडून देण्यांत आलें. पॅरिसमधील रहिवाशी राष्ट्रीय स्वयंसेवक बनले. स्वतंत्रता, बंधुता व समता या त्रयीचें निदर्शक म्हणून एका तिरंगी राष्ट्रीय निशाणाचा स्वीकार करण्यांत आला. सरदार लोकांचे व धर्मगुरूंचे सर्व विशेष हक्क रद्द ठरविण्यांत आले. धर्मखात्याकडे चाललेली जमीन राष्ट्राची असें फर्मा·

विण्यांत आलें. सर्व धर्मबंधनें झुगारून देण्यांत येऊन विवेक—देवतेची नोत्र दाम मंदिरामध्यें स्थापना करण्यांत आली.

**२ इंग्लंड युद्धांत पडलें**—फ्रान्सांतील चळवळीसंबंधीं इंग्लंड-मध्यें पहिल्यानें अनुकूल उद्गार निघाले. फ्रेंच लोकांनीं बॅस्टिल तुरुंग फोडला तेव्हां व्हिग पुढारी फॉक्स आनंदानें म्हणाला, "इतिहासामध्यें ही सर्वांत मोठी व उत्तम गोष्ट घडली." मुख्य प्रधान पिट यानेंही 'त्रयस्था'प्रमाणें वागण्याचें ठरवून शांततेचें धोरण स्वीकारिलें. देशांत निरनिराळ्या मंडळ्या निघून फ्रेंच लोकांचें अभिनंदन करण्याचें काम त्या करूं लागल्या. पण ही स्थिति फार काळ टिकली नाहीं. प्रसिद्ध मुत्सद्दी एडमंड बर्क यानें 'फ्रेंच राज्यक्रान्तीवरील विचार' हें पुस्तक लिहिलें (१७९०); त्यांत फ्रेंचांच्या कृतीवर खरमरीत टीका असून फ्रान्सांत शेवटीं अराजकता माजणार हें भविष्य वर्तविलें होतें. क्रान्तीनंतर पुष्कळ फ्रेंच सरदार जर्मनींत गेले, व तेथील राजास नवीन फ्रेंच सरकारावर स्वारी करून फ्रेंच राजाच्या हक्कांचें रक्षण करण्यास उद्युक्त करण्याची त्यांनीं खटपट चालविली! तेव्हां फ्रेंच क्रान्तिकारकांनीं राजा सोळावा लुई व त्याची सुंदर राणी अॅन्टॉय्नेट यांना कैदेंत टाकिलें (ऑगस्ट १७९२); व नियंत्रित राजसत्तेच्या ऐवजीं निर्भेळ लोकसत्ताक स्थापिलें (सप्टेंबर); आणि पॅरिसमध्यें राजपक्षीयांच्या भयंकर कत्तली झाल्या. तेव्हां इंग्लंडचें मत फ्रेंच लोकांविरुद्ध बरेंच क्षुब्ध झालें, व इंग्लिश सरकारासही इंग्लंडांत शांतता राखण्यास कडक उपाय योजणें भाग आहे असें समजून आलें. लवकरच सरकारनें सभाबंदीचा कायदा पास करून 'हेबियस कॉर्पस अॅक्ट' सुद्धां कांहीं वेळापुरता रद्द केला. पुढें फ्रेंच लोकसत्ताकानें असें जाहीर केलें कीं, 'ज्या कोणास स्वातंत्र्य मिळवायाचें असेल त्यास मदत करण्यास आम्ही तयार आहों.' इतकें झाल्यावर आपल्या जाहीर-नाम्यास मूर्त स्वरूप देण्यासाठीं फ्रान्सनें ऑस्ट्रियन नेदर्लंड्स येथील राज्य उलथून तेथें प्रजासत्ताक स्थापिलें व पुढें हॉलंडचीही तशीच गत करण्याची धमकी घातली. तेव्हां मात्र इंग्रजसरकार चिडून गेलें व हें प्रजासत्ताक सर्व विद्यमान सरकारांचे वैरी आहे असें ठरवून इंग्रजप्रधान-

मंडळानें जाहीर केलें कीं, "हॉलंडवर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष फ्रान्सनें आपली सत्ता स्थापिल्यास तें आपणास खपणार नाहीं." परंतु फ्रेंच क्रांतिकारक इंग्लंडची कोठें वाट पहत होते ? त्यांनीं आपल्या राजास फांसावर चढवून १७९३ च्या फेब्रुवारींत इंग्लंड व हॉलंड या दोन्ही देशांविरुद्ध युद्ध पुकारलें. त्याबरोबर पिटनें स्पेन, हॉलंड, ऑस्ट्रिया, व प्रशिया या राष्ट्रांचा इंग्लंडशीं **पहिला मित्रसंघ** बनविला. या युद्धांत युरोपांतील निरनिराळ्या देशांस पैसे चारून फ्रान्सबरोबर जमिनीवरून लढाई देण्यास तयार करावयाचें व बलिष्ठ इंग्लश आरमाराचा फ्रेंच जहाजें, वसाहती, वगैरे काबीज करून फ्रान्सचा कोंडमारा करण्याचे कामीं उपयोग करावयाचा, असें पिटचें धोरण होतें. फ्रान्स व त्याच्या वसाहती यांजमधील व्यापार चालविण्यास अमेरिकेनें पुढें येऊं नये म्हणून पिटनें १७५६ सालचा कायदा पुनः लागू केला. त्या कायद्यांत शांततेच्या वेळीं जो व्यापार आपल्या हातीं नव्हता तो व्यापार युद्ध चालू झाल्यावर आपल्या हातीं घेण्यास तटस्थ राष्ट्रांस बंदी होती.

**३ सुरवातीच्या झटापटी**—फ्रान्समध्यें १७९५ च्या नोव्हेंबरांत पांच डिरेक्टरांची सत्ता चालू झाली. त्यांनीं स्पेन व हॉलंड यांना इंग्लंडनें केलेल्या पहिल्या मित्रसंघांतून फोडिलें व तिन्ही राष्ट्रांनीं मिळून इंग्लंडवर स्वारी करण्याचें ठरविलें ! फ्रान्स व स्पेन या दोघांच्या आरमारांनीं इंग्लंडवर चालून यावयाचें व हॉलंडच्या आरमारानें आयर्लंडवर उतरावयाचें असा बेत होता. १७९५ त इंग्रजांनीं हॉलंडची वसाहत केप ऑफ गुड होप ही घेतली; व १७९७ च्या आरंभीं ॲड्मिरल जर्व्हिस व नेलसन यांनीं फ्रेंच व स्पॅनिश संयुक्त आरमारांचा पोर्तुगालच्या पश्चिमेस केप सेंट व्हिन्सेंटजवळ पराभव केला; व आक्टोबरमध्यें ॲड्मिरल डंकन यानें डच आरमाराचा कॅम्पर्डाउनजवळ पराभव केला. या जयांनीं इंग्रजांचें समुद्रावरील वर्चस्व कायम झालें व फ्रान्सचा इंग्लंडवर स्वारी करण्याचा बेत फिसकटला. तथापि या वेळीं इंग्लंड मोठ्या संकटांत होतें. नोर व स्पिटहेड या दोन्ही ठिकाणीं आरमारावरील लोकांत बंडें झालीं, व देशांत पैशाची टंचाई होऊन बँक ऑफ इंग्लंडनें 'रोख पैसे' देण्याचें बंद केलें.

**४ नेपोलियन बोनापार्ट**—या वेळीं प्रसिद्ध नेपोलियन बोनापार्ट हा फ्रेंच सरकारचा प्रमुख सेनापति होता. हा कॉर्सिका बेटांत इ. स. १७६९ सालीं जन्मला; व त्याचें शिक्षण ब्रिअेन व पॅरिस येथील लष्करी शाळांमधून झालें. पुढें कॉर्सिका बेटांत फ्रान्सपासून फुटून वेगळें निघण्याची चळवळ सुरू झाली, तेव्हां नेपोलियननें त्याविरुद्ध पक्ष स्वीकारला; व १७९३ त जेव्हां तें बेट फुटून वेगळें निघालें त्यावेळीं त्यानें मार्सेल्स बंदराचा आश्रय केला. त्या वेळीं फ्रान्सांत पॅरिसमध्यें स्थापिलेल्या लोकसत्ताकाविरुद्ध बंडें होऊं लागलीं होतीं. या बंडवाल्यांमध्यें फ्रान्सच्या दक्षिणेकडील टूलन बंदरांतील लोक प्रमुख असून त्यांना इंग्रजांची मदत होती. फ्रेंच प्रजासत्ताकानें त्या शहरास वेढा घालण्याचें ठरविलें व त्या कामगिरीवर पाठविलेल्या सैन्याच्या तोफखान्यावर नेपोलियनची नेमणूक केली. तेथें त्यानें आपली कामगिरी इतकी उत्कृष्ट केली कीं मदतगार इंग्रज तेव्हांच निघून गेले व टूलन प्रजासत्ताकाच्या हातीं आलें. नंतर लोकसत्ताकाविरुद्ध असलेल्या पॅरिसमधील बंडखोरांचा त्यानें मोठ्या चातुर्यानें मोड केला ( ५ आक्टोबर १७९५ ). त्या वेळीं ऑस्ट्रियाच्या बादशहाचा व सार्डिनियाच्या राजाचा इटलीमध्यें मुलूख होता, व ते दोघे फ्रान्सचें शत्रुत्व करीत होते. तेव्हां इटलींतील त्यांचा मुलूख जिंकण्यास सैन्याची रवानगी झाली; व त्याच्यावर नेपोलियनची मुख्य सेनापति म्हणून नेमणूक झाली ( १७९६ ). लवकरच इटलींतील मुलूख जिंकून नेपोलियन ऑस्ट्रियाच्या खास मुलखांत शिरला व शेवटीं ऑस्ट्रियाची राजधानी व्हिएन्ना या शहरापासून ऐशीं मैलांवर चालून गेला. तेव्हां ऑस्ट्रियाचा बादशहा घाबरून गेला व त्यानें लॅांबर्डी व बेल्जियम फ्रान्सला देण्याचें कबूल करून तह केला ( १७९७ आक्टोबर ). या तहानें पहिला मित्रसंघ धुळीस मिळविला, नेपोलियनचें नांव सर्व युरोपभर दुमदुमूं लागलें व फ्रान्सचा वचक पुरा बसला. नेपोलियन आपला धुरीण असल्यावर आपण सहज सर्व युरोप पादाक्रान्त करूं अशीं सुखस्वप्नें फ्रेंच सैनिकांस पडूं लागलीं. याच वेळीं पिट हा फ्रान्सच्या राज्यकर्त्या डिरेक्टरशीं तहाचीं बोलणीं करीत होता; परंतु त्याला त्या कामीं यश येणें

अशक्य होतें. नेपोलियनचा मान आतां फ्रेंच दरबारीं अत्यंत वाढला होता. इंग्लिशांवर जय मिळविल्यास फ्रान्समधील मुख्य सत्ता सहज आपल्या हातीं येईल इतकेंच नव्हे, तर आपल्या राष्ट्राचाही मोठा फायदा होईल हें त्यानें तेव्हांच ताडिलें व इंग्रजांच्या ताब्यांतील इजिप्त देश आपण जिंकून घ्यावा असें ठरविलें. इजिप्त जिंकल्यानंतर इंग्रजांच्या हिंदुस्थानांतील साम्राज्याचा नाश करण्यासाठीं मग पुढें जावयाचें असा त्यानें बेत केला. मग टूलन बंदरांतून ३६००० सैन्य बरोबर घेऊन नेपोलियन इजिप्तला जाण्यासाठीं निघाला. वाटेनें जातांना माल्टा बेट 'नाईट्स ऑफ सेंट जॉन' यांच्या ताब्यांत होतें तें त्यानें घेतलें. यानंतर हिंदुस्थान जिंकण्यासाठीं जें युद्ध करावयाचें त्यांत रणभूमीचा पाया म्हणून

---

१ धर्मयुद्धें सुरू झाल्यानंतर लवकरच जरुसलेमला जाणारे यात्रेकरू व ख्रिस्ती योद्धे यांना हरएक प्रकारें मदत करण्यासाठीं संन्याशांचे दोन संघ निर्माण झाले. एक नाइट्स ऑफ सेंट जॉन व दुसरा नाइट्स टेंप्लर्स. पहिला संघ १०९९ त अस्तित्वांत आला व दुसरा १११९ त स्थापिला गेला. पहिल्यानें आजाऱ्यांची शुश्रूषा, प्रवाशांस मदत इत्यादि सौम्य कामेंच या पंथांतील लोक करीत. परंतु पुढें ते युद्धांतही सामील होऊं लागले. तेव्हां परोपकार व युद्धकर्म हीं दोन्ही त्यांचे ठायीं असल्यामुळें त्यांस धर्मवीर म्हणणें योग्य होईल. इतर मठवाशांप्रमाणें गरिबी, सदाचरण व आज्ञाधारकपणा यांजबद्दल तीन शपथा या संघांतील लोक घेत. त्यांचें कार्य युरोपांतील जनतेस पसंत पडून त्यांस 'देणगी' रूपानें खूप संपत्ति मिळूं लागली. पोप पांचवा क्लेमंट याची 'टेंप्लर्स'वर इतराजी झाली व त्यानें तो संघ नाहींसा केला ( १३१२ ). त्या संघाची इंग्लंडांतील मिळकत दुसऱ्या एडवर्डनें नाइट्स ऑफ सेंट जॉन यांना दिली ( १३०८ ). सोळाव्या शतकांत त्यांना माल्टा बेट मिळालें. तेव्हांपासून यांस नाइट्स ऑफ माल्टा असेंही म्हणत. त्यांस नाइट्स हॉस्पिटलर्स असेंही नांव आहे. अलीकडे या संघाचें पुनरुज्जीवन झालें असून त्यांतील संन्यासी धार्मिक उपकाराचीं कामें करीत असतात.

इजिप्त उपयोगीं पडेल अशा समजुतीनें त्यानें तो देश जिंकण्याचा उद्योग आरंभिला.

**५ नाईलची लढाई ( १७९८ )**—इतक्यांत नेपोलियनचें फ्रान्सशीं असलेलें दळणवळण तोडून टाकून त्याला हीनबल करण्यासाठीं नाईल नदीच्या मुखाशीं अबुकीर खाडींत नेपोलियननें ठेविलेल्या फ्रेंच आरमारी काफिल्यावर ॲड्मिरल नेल्सन यानें हल्ला केला व त्याचा फन्ना उडविला ( १७९८ आगष्ट ). सतरा जहाजांपैकीं फ्रेंचांचीं दोन जहाजेंच कायतीं सुटलीं. फ्रेंचांचे पांच हजार लोक पडले. इंग्रजांकडील कामास आलेल्या लोकांची संख्या एक हजाराच्या आंत होती. या युद्धांत नेल्सननें हल्ल्याचें स्वीकारलेलें धोरण फारच बहारीचें होतें. फ्रेंच जहाजें नांगरलेलीं होतीं तरी तीं डोलत होतीं. येवढयावरून त्या जहाजांपासून जमीनीच्या बाजूस बऱ्याच अंतरापर्यंत खोल पाणी असलें पाहिजे असा त्यानें तर्क केला. मग आपल्या आरमाराचे दोन भाग करून त्यानें एक भाग जमिनीच्या बाजूनें पाठविला व आपण स्वतः दुसरा भाग हातीं घेऊन समुद्राच्या बाजूनें वेढा दिला. मग काय विचारतां ! एकएका फ्रेंच जहाजावर दोन दोन इंग्रज जहाजांचा मारा सुरू झाला. फ्रेंच आरमाराच्या रांगेपैकीं एका टोंकाकडून जहाजांचा इंग्रज फन्ना उडवीत असतां दुसऱ्या टोंकाकडील जहाजांस वारा उलट असल्यामुळें परत येऊन आपल्या सहकाऱ्यांचा बचाव करणें अशक्य होतें. तेव्हां पहिल्या जहाजांचा धुव्वा उडविल्यावर हीं दुसऱ्या टोंकाकडील जहाजेंही इंग्रजांच्या तडाक्यांत सांपडलीं. या लढाईनें नेपोलियनचें फ्रान्सशीं दळणवळण तुटल्यामुळें धान्य, दारूगोळा व माणसें यांचा पुरवठा बंद पडून नवे प्रांत जिंकणें व जिंकलेले प्रांत स्वसत्तेखालीं राखणें जवळ जवळ अशक्य झालें ! तथापि नेपोलियननें न डगमगतां इजिप्त व नंतर सीरिया जिंकून हिंदुस्थानवर चालून जाण्याचें ठरविलें. त्यानें पॅलेस्टाइनमध्यें जाऊन जाफा सर केलें व एकर शहरास वेढा घातला. परंतु सिड्नी स्मिथ यानें केलेल्या जोरदार प्रतिकारामुळें तें शहर घेणें अशक्य होऊन नेपोलियन इजिप्तमध्यें हटला. तेथें अबुकीर खाडीजवळ तुर्की सैन्यावर त्यानें

मोठा जय मिळविला ( १७९९ ऑगस्ट ). इतक्यांत फ्रान्समधील बिकट परिस्थिती त्याला कळून त्यानें फ्रान्सला परत जाण्याचें ठरविलें.

**६ आयर्लंडांतील अस्वस्थता**—१७८२ त आयरिश पार्लमेंट इंग्लिश पार्लमेंटपासून स्वतंत्र झाली; परंतु तिच्या निवडणुकींत मत देण्याचाही हक्क क्याथॉलिकांस नव्हता. १७९३ सालीं हा हक्क त्यांना मिळाला; परंतु सभासद होण्याचा अधिकार मात्र त्यांस देण्यांत आला नाहीं. अल्स्टरमधील प्रेस्बिटीरियनांचेही अगदीं थोडे प्रतिनिधी तिच्यांत असून सर्व सत्ता प्रस्थापित पंथाच्या लोकांच्या हातीं होती; शिवाय इंग्लंडनें केलेल्या जाचक व्यापार-विषयक निर्बंधांनीं व प्रॉटेस्टंट जमीनदारांच्या वाढत्या भाड्यांनीं आयरिश जनता अगदीं पिळून निघाली होती; व प्रेस्बिटीरियन आणि क्याथॉलिक हे दोघेही अगदीं असंतुष्ट झाले होते. फ्रान्सशीं युद्ध सुरू झाल्यापासून त्यांचा क्षोभ वाढला; शेवटीं त्यांच्यांतील जलाल लोकांनीं 'युनायटेड आयरिशमेन' नांवाची एक मंडळी स्थापिली (१७९२). या मंडळीचा हेतु आयर्लंडला स्वातंत्र्य मिळवून द्यावयाचें हा होता. क्याथॉलिक प्रजाजनांनीं प्रॉटेस्टंट धर्माधिकाऱ्यांस कर देण्याचें नाकारिलें. १७९६ मध्यें आयरिश भूमीवर फ्रेंच सैन्य उतरविण्याचा प्रयत्न झाला, पण तो फसला. अल्स्टरमधील प्रॉटेस्टंटसुद्धां इंग्लंडची आयर्लंडवरील सत्ता बरीच संपुष्टांत आणिली पाहिजे असें म्हणूं लागले ! १७९८ त युनायटेड आयरिशमेननीं वूल्फटोन या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं इंग्लंडची आयर्लंडवरील सत्ता हाणून पाडण्यासाठीं बंड केलें. परंतु सरकारनें सावधगिरी ठेवून पुढाऱ्यांस बंडाचा स्फोट होण्याच्या अगोदरच पकडल्यामुळें बंडाचा तात्काळ मोड झाला.

**७ आयर्लंडची निराळी पार्लमेंट मोडिली**—इंग्लंड व आयर्लंड यांचा संबंध दृढ होईल व तेथील क्याथॉलिक आणि प्रॉटेस्टंट यांचा तंटा निर्मूल होईल या समजुतीनें पिटनें स्वतंत्र आयरिश पार्लमेंट मोडून टाकून आयर्लंडचे इंग्लिश पार्लमेंटांत सभासद घेऊन दोन्ही पार्लमेंट एक करण्याचा बेत केला. आयरिश पार्लमेंटांत बहुतेक इंग्लि-

शांस अनुकूळ प्रॉटेस्टंटांचीच भरती असल्यामुळें या कल्पनेस आयरिश पार्लमेंटनें फारसा अडथळा केला नाहीं. ' बरोच्या ' मालकांकडून विरोध झाला. तेव्हां १२ लाख पौंडांची लांच भरून त्यांस पिटनें गप्प बसविलें ! मग १८०० त एकीचा कायदा ( Act of Union ) पास होऊन दोन्ही पार्लमेंट एक झाल्या. आयरिश लॉर्डांस २८ सभासद लॉर्ड्ससभागृहांत पाठविण्याचा हक्क मिळाला; व कॉमन्ससभेंत आयर्लंडांतील ' बरो ' व ' कौंटी ' मधून १०० सभासद निवडून यावेत असा ठराव झाला. राष्ट्रीय निशाणावर सेंट अँड्रूज ( स्कॉटलंड ) व सेंट जॉर्ज ( इंग्लंड ) यांच्या क्रॉसबरोबर आयरिश साधु सेंट पॅट्रिक याचा ही क्रॉस सामील करण्यांत आला. देशाचें नांव बदलून 'युनायटेड किंग्डम ऑफ ग्रेट ब्रिटन अँड आयर्लंड' असें नवें नांव देण्यांत आलें. दोन्ही पार्लमेंट एक करतांना रोमन क्याथॉलिक लोकांविरुद्ध असलेले जाचक निर्बंध काढून टाकून त्यांस धार्मिक स्वातंत्र्य देण्याचें पिटनें कबूल केलें होतें; तेव्हां त्यानें पार्लमेंटांत क्याथॉलिकांना राजकीय सवलती देणारें बिल आणण्याचें ठरविलें. पण तिसऱ्या जॉर्जनें आपल्या राज्यारोहणाच्या शपथेला तें विरुद्ध असल्यामुळें आपण तें फेटाळून लावूं असें स्पष्ट सांगितल्यावरून पिटनें प्रधानगिरीचा राजीनामा दिला ( १८०१ ). त्याच्या जागीं ॲडिंग्टन हा मुख्य प्रधान झाला. इकडे रॉबर्ट एमेट यानें आयर्लंडांत बंड केलें ( १८०३ ). हत्यारें व दारुगोळा यांची जमवाजमव होण्यापूर्वीं व लोकांचीही नीट तयारी होण्यापूर्वींच डब्लिनमध्यें दंग्यास सुरुवात झाली ! अर्थात् बंड झालें त्याच दिवशीं रात्रीं तें मोडिलें. एमेट महिनाभर छपून होता. परंतु शेवटीं देशांतर करण्यापूर्वीं तो धरला गेला व त्याजवरील खटल्याचा तडकाफडकी निकाल करण्यांत येऊन त्यास फांशीं देण्यांत आलें.

८ **डेन्मार्कच्या आरमाराचा पराभव**—नेल्सनच्या नाईलच्या जयामुळें फ्रान्सचा वचक बराचसा कमी झाला, व १७९९ च्या आरंभीं पिटनें रशिया, ऑस्ट्रिया व इंग्लंड यांचा **दुसरा मित्रसंघ** बनविला. लवकरच इटलींत व फ्रान्सच्या पूर्व सरहद्दीवर दोस्तांनीं जोराचे हल्ले केले

व फ्रेंच सेनापतींचा पराभव केला. नेपोलियन इजिप्तमध्यें होता; त्यास या दोस्तांच्या जयाच्या बातम्या समजल्या, तेव्हां तो फ्रान्सांत परत आला ( १७९९ ऑक्टोबर ). पॅरिसमध्यें जाऊन राज्यव्यवस्थेंत बदल करून सर्व सत्ता त्यानें आपल्या हातीं घेतली; नंतर आल्प्स पर्वत उतरून मॅरेंगो येथें जय मिळवून त्यानें इटली जिंकली व मोरो या दुसऱ्या फ्रेंच सेनापतीनें बव्हेरियामधील होहेनलिंडेन येथें ऑस्ट्रियाचा पराभव केला; तेव्हां ऑस्ट्रियानें फ्रान्सशीं तह केला ( १८०१ ). इंग्रजांच्या जहाजांची झडती घेण्याच्या नियमास कंटाळून रशिया, प्रशिया, स्वीडन, डेन्मार्क यांनीं तटस्थ राष्ट्रांच्या जहाजांची झडती घेण्याच्या पद्धतीस विरोध करण्यासाठीं 'दुसरा सशस्त्र तटस्थ संघ' निर्माण केला ( १८०० ). अशा तऱ्हेनें दुसरा मित्रसंघ धुळीस मिळून इंग्लंडवर शत्रु उठले व नेपोलियनची चढती कमान झाली. पण सशस्त्र तटस्थ संघापैकीं डेन्मार्कच्या कोपेनहेगेन या राजधानीच्या शहराजवळ जमलेल्या आरमारावर हल्ला करून इंग्लिश आरमारानें त्या आरमाराचा धुव्वा उडविला ! या युद्धांत नेल्सन हा जरी आरमारावरील मुख्य अधिकारी नव्हता तरी त्याच्या पराक्रमामुळेंच इंग्रजांस जय आला. लढाई चालू असतां ॲड्मिरलनें शत्रूवर गोळ्यांचा भडिमार करण्याचें बंद करण्याची खूण केली आहे असें एक अधिकारी नेल्सनला सांगूं लागला. आणखी थोडा वेळ भडिमार चालू ठेविल्यास आपण लढाई खास जिंकूं अशी नेल्सनला खात्री होती. तेव्हां तो म्हणाला " मला एकच डोळा आहे. केव्हां केव्हां आंधळें होण्याचाही मला हक्क आहे." मग दुर्बीण आपल्या गेलेल्या डोळयास लावून तो बोलला "मला तर खूण कोठें दिसत नाहीं !!" असें बोलून त्यानें लढाई तशीच चालू ठेविली व शेवटीं जय संपादन केला. पुढें त्यानें लिहिलें कीं, ' मीं आजपर्यंत १०५ लढाया केल्या, पण आजच्या सारखें भयंकर युद्ध आजचेंच.' या युद्धानें डेन्मार्क संघांतून फुटलें ( एप्रिल १८०१ ).

९ **अमीनचा तह**—इतक्यांत झारचा खून होऊन रशियावर नवा झार राज्य करूं लागला. त्यानें निराळें धोरण स्वीकारिलें व सशस्त्र

तटस्थ संघाचा निकाल लागला. इकडे इजिप्तमधील फ्रेंच सैन्य पराभूत झाल्यामुळें व माल्टाही इंग्रजांनीं घेतल्यामुळें नेपोलियनही तहास उत्सुक झाला होता. उभयपक्षीं अमीन ( Amiens ) येथें तह ठरला ( १८०२ मार्च ). हॉलंडपासून घेतलेलें सीलोन व स्पेनपासून घेतलेलें ट्रिनिडाड यांशिवाय या युद्धांत जिंकलेले इतर सर्व प्रांत परत देण्याचें इंग्लंडनें कबूल केलें. आणखी माल्टा हें बेट सेंट जॉनच्या नाइट्सना व इजिप्त देश तुर्कांना परत देण्याचें इंग्रजांनीं मान्य केलें. फ्रान्सनें आणखी देश पादाक्रान्त न करण्याचें कबूल केलें, व इंग्रजांनीं आपल्या राजाच्या बिरुदावळींतून 'फ्रान्सचा राजा' ही चालत आलेली पदवी कमी करून टाकण्याचें कबूल केलें.

---

# ५४ नेपोलियनशीं युद्ध.



**१ पुनश्च युद्ध**—अमीनचा तह म्हणजे शांततामंदिराचें द्वार नसून पुढें होणाऱ्या घोर संग्रामाच्या तयारीकरितां इंग्लंड व फ्रान्स या राष्ट्रांनीं घेतलेली विश्रांतिच होय. १८०३ मध्यें फिरून युद्ध सुरू झालें. अमीनच्या तहांतील अटी दोन्ही राष्ट्रांनीं पाळल्या नाहींत. पीडमॉन्ट व एल्बा बेट हीं नेपोलियननें फ्रेंच राज्यांत सामील केलीं. स्वित्झर्लंडांतील राज्यांत ढवळाढवळ केली व सर्व देशांत इंग्लिश व्यापार बंद केला. इंग्लंडनेंही सेंट जॉनच्या सरदारांना माल्टा बेट परत देण्याची अळंटळं केली; कारण त्यांस पक्कें माहित होतें कीं, हें बेट सरदारांपासून नेपोलियन बळकाविल्याशिवाय रहावयाचा नाहीं. त्याचप्रमाणें इंग्लंडांत जाऊन राहिलेल्या फ्रेंच राजनिष्ठांस आश्रय न देतां देशांतून हांकून द्यावें व आपल्यावर टीका करणाऱ्या वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी करावी अशी नेपोलियननें मागणी केली; परंतु इंग्रज सरकारनें या मागणीकडे दुर्लक्ष केलें. नेपोलियननें इंग्लंडची लष्करी पहाणी करण्यासाठीं गुप्त हेर पाठ-

विले. नेपोलियनच्या एका हस्तकापाशीं इजिप्त फिरून जिंकण्यासंबंधाचे कागदपत्र जेव्हां उघडकीस आले तेव्हां इंग्लंडांतील लोकमत खूप खवळलें. युद्ध जाहीर होण्यापूर्वीच इंग्रजांनीं फ्रेंचांचीं दोन व्यापारीजहाजें पकडलीं व नेपोलियननें प्रतिकारार्थ फ्रान्सांत असणाऱ्या बारा हजार इंग्रजांस कैद केलें! शेवटीं युद्ध सुरू झालें ( १६ मे १८०३ ); नंतर एक वर्षानें नेपोलियन फ्रान्सचा बादशहा बनला व इतर देश जिंकण्याचें काम त्यानें जोरांत चालविलें. हें दुसरें युद्ध १८०३ पासून १८१४ पर्यंत चाललें.

**२ इंग्लंडवर स्वारी**—पहिल्यानें इंग्लंडवर फौज उतरवून तो देश जिंकण्याचा नेपोलियननें प्रयत्न करण्याचें ठरविलें. ही कामगिरी बजावण्यासाठीं त्यानें एक लक्ष तीस हजार लोकांचें सैन्य बुलोन बंदरांत तयार ठेविलें ( १८०४ ). या सैन्यास इंग्लंडच्या किनाऱ्यावर नेण्यासाठीं ब्रेस्ट, केडिझ, व टूलन या बंदरांत आरमार तयार करण्यांत येऊं लागलें. 'सहा तासपर्यंत ही इंग्लिश खाडी माझ्या ताब्यांत येऊं द्या कीं, मी जगाचा धनी झालों!' असें नेपोलियन म्हणे. त्याला जयाची इतकी खात्री होती कीं, त्यानें या जयाच्या संस्मरणार्थ एक सोन्याचें पदक तयार केलें. त्यावर 'इंग्लंडांत आगमन' व 'लंडन येथें पाडिलें १८०४' अशीं अक्षरें कोरलेलीं होतीं. या नेपोलियनच्या निश्चयानें इंग्लंडांतील लोक अगदीं घाबरून गेले. ॲडिंग्टन याची प्रधानगिरीवरून उचलबांगडी होऊन पिट फिरून मुख्य प्रधान झाला ( १८०४ मे ). किनाऱ्यावर पहारा होऊं लागला. संकट येतांच पेटविण्याकरितां भयसूचक दीप बांधण्यांत आले. पिटनें रशिया व ऑस्ट्रिया यांस जमिनीवरून नेपोलियनवर चालून जाण्यासाठीं खूप खंडणी देण्याचें कबूल करून **तिसरा मित्रसंघ** बनविला ( एप्रिल १८०५ ). फ्रेंच बंदरांवर पहारा ठेवून इंग्लंडचें या धाडीपासून रक्षण करण्यास इंग्लिश आरमार सज्ज होतेंच.

**३ ट्रॅफल्गार ( १८०५ )**—१८०५ त नेपोलियनचें आरमार तयार झालें. टूलन बंदरांतून ॲड्मिरल व्हीलन्व्ह यानें आपला काफिला काढिला व केडिझ येथील स्पॅनिश काफिल्यासह त्यानें वेस्ट इंडीजकडे

जाण्याचें सोंग करून इंग्लिश ॲड्मिरल नेल्सन यास बरेंच दूरवर नेलें. मग एकदम झुकांडी देऊन फ्रेंच परत फिरले. त्यांचा असा अंदाज होता कीं, आतां इंग्लिश किनाऱ्यावर उतरूं. परंतु वाटेंत एका लहान ब्रिटिश काफिल्याशीं गांठ पडून व्हील्नव्हच्या बोटी जराशा नादुरुस्त झाल्या. त्यांची दुरुस्ती करण्यासाठीं तो कांहीं दिवस व्हिगो येथें थांबला. मग तो केडिझ बंदरांत आला. तेथून २१ आक्टोबर १८०५ रोजीं तो आपल्या ३३ गलबतांनिशीं बाहेर पडला. इतक्यांत आपल्या २७ गलबतांनिशीं त्याशीं सामना देण्याकरितां नेल्सन आला. दोघांची गांठ ट्रॅफल्गारजवळ पडली. फ्रेंच–स्पॅनिशांचीं गलबतें एका रांगेंत होतीं. नेल्सननें आपला काफिला फोडून दोन ठिकाणीं एकदम लढाई सुरू केली. या लढाईतील जयापजयावर इंग्लंडचें एकंदर युद्धांतील यशापयश अवलंबून आहे हें नेल्सनला पक्कें कळून चुकलें होतें व तो मोठ्या आवेशानें लढत होता. 'प्रत्येक इंग्रज नागरिकानें आपलें कर्तव्य केलें पाहिजे अशी इंग्लंडची अपेक्षा आहे' हें वाक्य लिहिलेली पताका सर्वांस दिसेल अशा उंच ठिकाणीं आपल्या जहाजावर त्यानें लाविली होती. शत्रूंची एकंदर वीस जहाजें एक तर बुडविलीं गेलीं किंवा इंग्रजांच्या हातीं आलीं व फ्रेंच आरमाराचा पुरा मोड झाला. या युद्धांतील जय इंग्लंडला सहज मिळाला नाहीं. नेल्सनला जिवावरची जखम झाली. तरी पण आपल्या बाजूस जय आला अशी निश्चित बातमी कळेपर्यंत तो जिवंत होता. जयाची बातमी कळतांच तो म्हणाला "मीं आपलें कर्तव्य केलें याबद्दल मला समाधान वाटतें." नंतर त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

**४ पिटचा मृत्यु**——इंग्लंडवर सैन्य पाठवितां येत नाहीं हें पाहून नेपोलियननें बुलोन येथील सैन्य बरोबर घेतलें व ऑस्ट्रियन व रशियन संयुक्त सैन्यांचा ऑस्टर्लिट्झ येथें फारच मोठा पराभव केला ( १८०५ डिसेंबर ). रशियन तह न करतां तसेच परत गेले व ऑस्ट्रियनांनीं नेपोलियनच्या सर्व अटी कबूल करून तह केला व अशा रीतीनें तिसऱ्या मित्रसंघाचा चुराडा झाला. पिटचा मित्र मेल्व्हिल हा आरमारी खात्याचा प्रधान होता, त्या खात्यांत उधळपट्टी चालू असून मेल्व्हिलनें लांच खाल्ला

असा त्याजवर कॉमन्सनीं आरोप केला व त्याची चौकशी करण्याचें ठरविलें ( एप्रिल १८०५ ); त्यामुळें पिट अगोदर कष्टीच होता. तशांत या पराजयाची बातमी ऐकिली तेव्हां अगोदरच अजारी असलेल्या पिटला जबर धक्का बसला व तो मृत्यु पावला ( १८०७ जानेवारी २३ ). त्याचे शेवटचे शब्द पुढीलप्रमाणें होते. "आतां हा युरोपचा नकाशा गुंडाळा. दहा वर्षेपर्यंत त्याची मुळींच जरूर पडणार नाहीं." पिटच्या मृत्यूनंतर व्हिग व टोरी या दोन्ही पक्षांचें संयुक्त प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें. त्यांत व्हिग पुढारी फॉक्स हा असून ग्रेन्‌व्हिल हा टोरी पुढारी होता. या प्रधानमंडळानें नेपोलियनशीं तहाच्या वाटाघाटी चालविल्या; पण नेपोलियनला कोणत्याच अटी मान्य न होऊन तहाचें बोलणें फिसकटलें. पुढें फॉक्स वारल्यावर ( १८०६ सप्टेंबर ), सैन्य व आरमार यांमधील नोकऱ्यांवर क्याथॉलिकांचाही प्रवेश व्हावा अशाविषयींचें बिल प्रधानमंडळानें पुढें आणिल्यावरून जॉर्ज रागावला व प्रधानमंडळास राजीनामा देणें भाग पडलें ( १८०७ ). नंतर पोर्टलंड ( १८०७–१८०९ ) व पर्सीव्हल (१८०९–१८१२)यांच्या प्रधानमंडळांच्या मागून लॉर्ड लिव्हरपूल हा धिमा टोरी गृहस्थ अधिकारारूढ झाला. त्याचें प्रधानमंडळ १८१२ पासून १८२७ पर्यंत टिकलें. या म्होरक्यांच्या ठायीं पिटची बुद्धिमत्ता किंवा कर्तृत्व जरी नव्हतें तरी त्यानें आंखून दिलेल्या मार्गानें त्यांनीं जोरानें युद्ध चालविलें व धिमेपणानें व नेटानें वागून इंग्लंडचें रक्षण केलें, इतकेंच नव्हे तर नेपोलियनला दांतीं तृण धरून शेवटीं शरण यावयास लाविलें.

**५ परस्परावर बहिष्कार**——पुढें प्रशियावर मिळविलेल्या दोन जयांनीं ( १८०६ आक्टोबर ) नेपोलियनचा प्रवेश बर्लिनमध्यें झाला; व त्यानें इंग्लंडला जेरीस आणण्याचा एक नवीनच उपाय योजण्याचें ठरविलें. इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें वीस मैलांची खाडी असल्यामुळें इंग्लंडवर सैन्य उतरविणें आरमाराच्या अभावीं अशक्य झालें. युरोपांत युद्ध सुरू असल्यामुळें कारखाने बंद होते. तेव्हां इंग्लंडांतील कारखाने जास्तच जोरानें चालून त्यांतून पुष्कळच मालाची पैदास होऊं लागली व युरोपांतील

गिऱ्हाइक असल्यामुळें इंग्लंड सधन झालें. इंग्लंडचा समाचार घ्याव-याचा म्हणजे त्या देशाचा व्यापार तोडून उद्योगधंदे चीत केले पाहिजेत हें नेपोलियनच्या लक्षांत आलें. तेव्हां १८०६ त बर्लिनहून त्यानें एक हुकूम काढिला. "ब्रिटिश बेटें हीं व्यापारबाह्य असून माझ्या अंमला-खालील कोणत्याही देशानें—फ्रान्स, नेदर्लंड्स, पश्चिम जर्मनी, प्रशिया व इटली—इंग्लंडशीं व्यापार करतां कामा नये." पुढें रशियावर जय मिळवून टिल्सिट येथील तह (१८०७) घडवून आणिल्यावर रशियानेंही इंग्लंडशीं व्यापार न करण्याचा हुकूम मान्य केला. यावर इंग्लंडनेंही 'जशास तसें' या न्यायानें 'कौन्सिलमधील हुकूम' (Orders in Council,) काढिले. त्यांत फ्रान्स व त्याचे साहाय्यकारी यांच्या देशांचीं बंदरें व्यापारास बंद करण्यांत आलीं. युरोपांतील राष्ट्रांस नेपोलियनचे निर्बंध जाचक वाटावयास लावून त्यांस या उपायांनीं सघांतून फोडावें असा इंग्रजांचा उद्देश होता. मात्र तटस्थ राष्ट्रांच्या जहाजांनीं फ्रेंच बाजूचीं बंदरें व इंग्लडचीं बंदरें यांत व्यापार करण्यास कांहीं हरकत नाहीं असें ठरविलें होतें. हेतु हा कीं, व्यापार जो काय चालावयाचा तो इंग्लंडच्या बंदरांतूनच चालावा. यावर नेपोलियननें मिलनमधून असा हुकूम काढिला कीं, इंग्लिश बंदरास लागलेलें कोणतेंही जहाज पकडण्यांत येईल (१८०७ डिसेंबर). या जाचक निर्बंधांनीं वसाहतींतला माल व इंग्लंडांतला माल घेणाऱ्या युरोपांतील गिऱ्हाइकांची अत्यंत गैरसोय होऊं लागली. शिवाय 'कौन्सिल-मधील हुकुमांनीं' तटस्थ राष्ट्रांतील व्यापाऱ्यांचें मोठें नुकसान होऊं लागलें. अमेरिकेला दोहीकडून त्रास झाला. नेपोलियनच्या हुकुमामुळें इंग्लंडशीं व्यापार करण्याची बंदी व कौन्सिलमधील हुकुमांनीं युरोपशीं व्यापाराची बंदी, अशी स्थिति झाली.

६ **क्यानिंगची धूर्तता**—टिल्सिटच्या तहांत फ्रान्स व रशिया यांनीं कांहीं गुप्त कलमें घालून डेन्मार्क, स्वीडन, पोर्तुगाल व ऑस्ट्रिया या देशांवरही इंग्लंडविरुद्ध केलेले व्यापारी निर्बंध लादावयाचें ठरविलें होतें. लवकरच इंग्लंडास हीं कलमें कळलीं व डॅनिश आरमार पकडून नेपोलियन लवकर नव्या फ्रेंच आरमाराची प्रस्थापना करणार आहे असेंही

समजलें. यावेळीं क्यानिंग हा कर्तबगार मुत्सद्दी इंग्लंडचा परराष्ट्रीय प्रधान होता. त्याच्या सूचनेवरून इंग्लंडनें ताबडतोब डॅनिश आरमार पकडलें व युद्ध संपेपर्यंत तें आपल्या कब्जांत ठेवण्याचा निश्चय केला (१८०७). जर्मनींत आडमार्गानें इंग्रजी माल कोंबता येण्यास उपयोगी पडेल या बुद्धीनें एल्ब नदीच्या मुखाजवळील हेलिगोलँड इंग्लंडनें सर केलें. १८९० पर्यंत तें इंग्लंडच्याच ताब्यांत होतें; त्या वर्षी दक्षिण आफ्रिकेंत मिळालेल्या सवलतींचा मोबदला म्हणून तें जर्मनीस परत देण्यांत आलें.

**७ द्वीपकल्पांतील युद्ध**—नेपोलियननें स्पेन व पोर्तुगाल या दोन्ही देशांस आपले व्यापारी निर्बंध पाळण्यास भाग पाडिलें व १८०८ त स्पेनच्या गादीवर आपला भाऊ जोसेफ यास बसविलें ! त्यामुळे स्पॅनिश व पोर्तुगीज लोकांत असंतोष उत्पन्न झाला. याचा फायदा घेऊन इंग्लंडनें हिंदुस्थानांत असईच्या लढाईत विजयी झालेला सर आर्थर वेल्स्ली याच्या हाताखालीं पोर्तुगालमध्यें फौज पाठविली. त्यानें पोर्तुगालमध्यें उतरल्यावर थोडयाच काळांत व्हिमिरो येथें फ्रेंचांवर जय मिळविला (आगष्ट १८०८). परंतु इतक्यांत सर्व सैन्यावर मुख्य अधिकाऱ्याच्या जागीं डॅल्रिम्पल याची नेमणूक होऊन तो आला. इकडे फ्रेंच सेनापति ज्यूनो यानें तहाचें बोलणें सुरू केलें व समुद्रावरून आपणांस फ्रान्समध्यें सैन्यासह सुरक्षित पोंचविल्यास आपण जाण्यास तयार आहों, असें तो म्हणूं लागला. पोर्तुगाल फ्रेंच सैन्यापासून अगदीं मोकळा होणार हें आपल्या फायद्याचेंच, असें जाणून डॅल्रिम्पलनें सिंट्रा येथें तहनाम्यावर सही केली. परंतु त्यानें फ्रेंच सेनापति व सैनिक यांस कैद करण्याऐवजीं फ्रान्सांत नेऊन सोडिलें याबद्दल इंग्रजांस त्याचा अत्यंत राग आला व चौकशीसाठीं त्यास परत बोलाविण्यांत आलें. इकडे दक्षिण स्पेनमध्यें स्पॅनिश देशभक्तांनीं फ्रेंच सैन्याचा बेलेन येथें पराभव केला, त्यामुळें जोसेफ बोनापार्ट यास मॅड्रिड सोडून उत्तरेकडे पळून जावें लागलें (१८०८ जुलै). तेव्हां दोन लक्ष सैन्य बरोबर घेऊन खुद्द नेपोलियन स्पेनमध्यें उतरला व लवकरच तो देश पादाक्रान्त करून त्यानें जोसेफला पुनः मॅड्रिडमध्यें गादीवर

कायम केलें ( डिसेंबर १८०८ ). नंतर स्पेनमध्यें असलेल्या इंग्रज सैन्यास हुसकून इंग्लंडांत हाकून देण्याचा त्याचा विचार होता. परंतु इतक्यांत ऑस्ट्रियांत गडबड झाल्याची वार्ता कानीं आल्यामुळें तो फ्रान्सांत परत गेला व इंग्रजांस हाकून देण्याचें काम त्यानें सूल्ट या सेनापतीवर सोपविलें. इंग्रज सेनापति सर जॉन मूर हा मोठें फ्रेंच सैन्य आपल्यावर चालून येतें हें पाहून वायव्य किनाऱ्यावरील कोरुन्ना बंदरापर्यंत हटला. फ्रेंचांनीं अगदीं लगट केली तेव्हां मूर त्याजवर उलटला व विजयश्री इंग्रजांस माळ घालते न घालते अशा वेळीं गोळी लागून ठार झाला ( १८०९ जानेवारी ). तरीपण बहुतेक सर्व इंग्रज सैन्य जहाजांवर चढलें असल्यानें इंग्रजांचें नुकसान झालें नाहीं.

**८ वेल्स्लीची चिकाटी**—पुनः एप्रिलांत वेल्स्लीच्या हाताखालीं इंग्रज सैन्य पोर्तुगालमध्यें उतरलें. फ्रेंच सैन्य आतां ऑस्ट्रियांत गुंतल्यामुळें वेल्स्लीस चांगलें फावलें. त्यानें स्पेनमध्यें शिरून टॅलव्हेरा येथें जय संपादिला (१८०९ जुलै). या जयानिमित्त वेल्स्लीस 'व्हायकाउंट वेलिंग्टन' ही पदवी मिळाली. १८१० त नेपोलियनची सर्व बाजूस चलती झाल्यामुळें स्पेनकडे फार मोठें फ्रेंच सैन्य लोटलें. तेव्हां वेल्स्लीनें पोर्तुगालमध्यें लिस्बनजवळ पन्नास मैल लांबीची तटबंदी करून आपल्यास चांगली आसऱ्याची जागा निर्माण केली. हीच टॉरेस व्हेड्रासची तटबंदीची तिहेरी रांग होय. जेव्हां ८०००० सैन्यासह जनरल मॅसिना वेलिंग्टनवर चाल करून आला तेव्हां वेलिंग्टनला पोर्तुगालमध्यें हटणें भाग झालें; तथापि परत येतांना बुसाको येथें त्यानें लढाई दिली ( १८१० सप्टेंबर ) व फ्रेंचांचा जोर खूप कमी केला. नंतर आपल्या आसऱ्याच्या जागे-पुढील मुलूख बेचिराख करण्याचा त्यानें सपाटा चालविला आणि शत्रूस दाणावैरण न मिळे अशी व्यवस्था केली. मॅसिना पांच महिनेपर्यंत लिस्बनसमोर तळ देऊन बसला होता; परंतु आसरा धरून बसलेल्या वेलिंग्टनवर हल्ला करणें अशक्य आहे असें त्यास आढळून आलें. शिवाय स्पेन व पोर्तुगाल येथील देशभक्त टोळ्यांनीं गनिमी काव्याची लढाई सारखी सुरू ठेविल्यामुळें त्याला दाणावैरण मिळेना.

शेवटीं निरुपाय होऊन तो स्पेनमध्यें परत गेला ( १८११ मार्च ). तेथील लोकांनीं गनिमी काव्यानें लढून त्यास अत्यंत त्रास दिला. दक्षिणेकडे वेलिंग्टनच्या हाताखालचा जनरल बेरेस्फर्ड याची व जनरल सूल्ट यांची गांठ पडून अॅल्ब्यूरा येथें मोठी लढाई झाली. हींत फारच भयंकर रणकंदन होऊन रक्ताचे पाट वाहिले. स्पेनमधील सर्व लढायांत हीच अतिशय निकराची होऊन दोन्ही बाजूंचे पुष्कळच लोक पडले ( १८११ मे ). पुढें १८१२ सालीं नेपोलियननें रशियावरील स्वारीचा अंगीकार केल्यानें स्पेनकडे लोकांचा पुरवठा होईना. त्यामुळें वेलिंग्टनचें काम सुकर झालें. त्यानें आपल्या आश्रयस्थलापासून पुढें चालून जाऊन पोर्तुगाल व स्पेन यांजमधील हद्दीवरचे रॉड्रिगो व बॅडजोझ् हे किल्ले सर केले ( १८१२ मे ); व फ्रेंच सैन्यापासून पोर्तुगाल मोकळा केला. त्याचप्रमाणें सॅलॅमान्का ( १८१२ जुलै ) व व्हिटोरिआ ( १८१३ जून ) येथें मोठे जय संपादिले. शेवटीं त्यानें पिरिनीजच्या दक्षिणेकडील सॅन सेबॅशियन व पाम्पेलुना हीं फ्रेंचांचीं दोन लष्करी ठाणीं काबीज केलीं; तेव्हां फ्रेंचांची स्पेनमधील सत्ता पार नाहींशी झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. वेलिंग्टन तसाच पुढें पुढें कूच करीत राहिला व १८१४ च्या आरंभाला तर पिरिनीज उतरून त्यानें खुद्द फ्रान्सांत पाऊल घातलें. फ्रेंच सैन्याशीं हिकमतीनें लढत लढत एप्रिलांत त्यानें टुलूझ काबीज केलें. या वेळीं संयुक्तांचीं सैन्यें पॅरिसला येऊन पोंचलीं होतीं.

९ **द्वीपकल्पांतील युद्धाचें महत्त्व**—या युद्धाचें शुक्लकाष्ठ नेपोलियनच्या मागें एकसारखें पांच वर्षें लावून वेलिंग्टननें मोठीच कामागिरी बजाविली. नेपोलियन त्या युद्धास 'वाहती जखम' म्हणे. त्याकरितां त्याला एकसारखा सैन्याचा पुरवठा करावा लागल्यामुळें त्याचे युरोपांतील बेत पुरे करण्यास पुरेतशीं माणसें मिळालीं नाहींत. शिवाय स्पॅनिश राष्ट्र त्याच्या विरुद्ध उठून इतर ठिकाणच्या लोकांचेंही राष्ट्रीयत्व विशेष जागृत झालें व शेवटीं नेपोलियनचा पाडाव राजांनीं केला असें म्हणण्यापेक्षां 'राष्ट्रांनीं' केला हेंच म्हणणें खरें आहे. त्याचप्रमाणें खुष्कीवर फ्रेंचांशीं लढाया देण्याची इंग्रजांस संधि मिळून ब्रिटिश क्षात्रतेजाची चमक फ्रेंचांस व इतर

राष्ट्रांस दाखविण्यास इंग्रजांस अवसर मिळाला. जमिनीवर आपलें सैन्य उतरवून नेपोलियनच्या सामर्थ्यास आळा घालण्याचे प्रयत्न इंग्रजांनीं इतर ठिकाणींही केले होते; परंतु ते सर्व व्यर्थ झाले होते. तेव्हां या द्वीपकल्पांतील युद्धांत आपला टिकाव लागून नेपोलियनास चांगलाच पायबंद देतां आला म्हणून इंग्लंडांतही त्यामुळें लष्करी उत्साहाची खूप भरती आली.

**१० नेपोलियनचा पराभव**—इकडे नेपोलियन मॉस्कोवर चालून गेला होता. तेथें रशियनांनीं तें शहर जाळून जवळचा मुलूख उध्वस्त केल्यामुळें त्याच्या सैन्याची फजिती उडाली. कडक थंडींत त्यास परतावें लागलें. परत येत असतांही त्यानें शत्रूवर तीन जय मिळविले. तथापि त्याच्याविरुद्ध प्रशिया, ऑस्ट्रिया, रशिया हे सर्व शत्रू एकवटल्यामुळें शेवटीं लीप्झिग येथें त्याचा पराभव झाला ( १८१३ आक्टोबर ). शेवटीं रशिया, प्रशिया, ऑस्ट्रिया व स्वीडन यांचीं यशस्वी सैन्यें पॅरिसला येऊन पोहोंचलीं ( १८१४ ). नेपोलियनला फ्रान्सच्या गादीवरून काढून टाकण्यांत येऊन एल्बा बेटावर नजर कैदेंत ठेवण्याचें ठरलें; व मारला गेलेल्या सोळाव्या लुईच्या भावास 'अठरावा लुई' म्हणून गादीवर बसविण्यांत आलें.

**११ अमेरिकेशीं युद्ध**—हें फ्रान्सशीं युद्ध चाललें असतां इंग्रजांचें अमेरिकेशीं चाललेलें वर्तन तीस रुचलें नाहीं. तटस्थ राष्ट्रांच्या जहाजांची झडती घेण्याचा हक्क इंग्रज बजावीत होते, इतकेंच नव्हे तर अमेरिकन जहाजांवरील खलाशांस 'तुम्ही इंग्लंडांत जन्मलेले, सबब तुम्ही अमेरिकन नसून इंग्रजच आहांत' असें म्हणून ब्रिटिश जहाजांवर काम करण्यासाठीं सक्तीनें नेण्यांत येत असे. या इंग्लंडच्या अरेरावी धोरणास कंटाळून १८१२ त अमेरिकेनें इंग्लंडशीं युद्ध जाहीर केलें. इंग्लंड नेपोलियनशीं भांडतां भांडतां अगदीं मेटाकुटीस आलें होतें व अमेरिकेचेंही आरमार अजून फारच लहान होतें. तथापि अमेरिकन खलाशांच्या अचुक नेमबाजीमुळें इंग्रजांना पहिल्या पहिल्यानें अपयशच आलें. १८१३

त अमेरिकन आरमाराची दर्यावरून बहुतेक हकालपट्टीच झाल्यासारखें दिसत होतें. तरी पण अमेरिकन चांच्यांनीं इंग्लिश व्यापाराची बरीच नुकसानी चालविली होती. १८१४ त नेपोलियनचा पराभव झाल्या-नंतर इंग्लिश प्रधानमंडळानें अमेरिकेवर तीन मोहिमा करण्याचें ठरविलें. वेलिंग्टनच्या कांहीं शिपायांनीं अमेरिकेची राजधानी वॉशिंग्टन यावर चालून जाऊन त्या शहरांतील बऱ्याच इमारती जाळल्या ( आगष्ट ). उत्तरेकडून लेक शॅम्प्लेनच्या मार्गानें एक हल्ला करण्यांत आला; पण जनरल मॅक्डोनो यानें त्या सैन्यास थोपवून धरिलें. न्यू ऑर्लिन्सवरचा हल्ला जनरल जॅक्सन यानें परतवून लाविला. शेवटीं घंट येथें तह ठरला (१८१४) त्यांत जिंकलेलीं स्थळें परत देण्याचें ठरलें. ज्या 'झडतीच्या हक्कामुळें' युद्धास सुरुवात झाली होती त्याचा कांहींच निकाल लागला नाहीं.

---

# ५५ वॉटर्लूचा घनघोर रणसंग्राम !!



**१ दोस्तांचा निश्चय**—नेपोलियनला एल्बा बेटांत कैदेंत ठेवि-ल्यावर आणि फ्रान्सच्या गादीवर अठराव्या लुईस बसविल्यावर इंग्लंड, ऑस्ट्रिया, रशिया व प्रशिया या राष्ट्रांचे प्रतिनिधी युरोपची व्यवस्था लावण्यासाठीं व्हिएन्ना येथें जमले. इतक्यांत अशी बातमी आली कीं, नेपोलियन एल्बांतून सुटून ( मार्च १ सन १८१५ ) प्रॉव्हेन्स बंदरावर उतरून पॅरिसला येऊन पोहोंचला आहे व त्याला फ्रान्समधील शिपायी व लष्करी कामगार मिळाले असून टयुलेरीज राजवाड्यांत बादशहा ही पदवीही त्यानें पुन्हां धारण केली आहे ! यावर व्हिएन्नाच्या कॉंग्रेसमध्यें बरीच वाटाघाट होऊन मार्चच्या १५ तारखेस ऑस्ट्रिया, स्पेन, इंग्लंड, पोर्तुगाल, प्रशिया, रशिया व स्वीडन या सात राष्ट्रांनीं एक जाहीरनामा काढिला. सर्व राष्ट्रांनीं केलेल्या तहांतील करारमदार नेपोलियननें

मोडिले असल्यामुळें त्याचा कायमचा मोड होऊन युरोपच्या शांततेचा भंग फिरून त्याच्या हातून न होईल अशी तजवीज करण्याविषयीं सर्व राष्ट्रांचें वचनप्रमाण झाल्याचें त्यांनीं जाहीर केलें. इंग्लिश पार्लमेंटनें लागेल तो पैसा खर्च करण्यास प्रधानमंडळास मंजुरी दिली व लवकरच इंग्लिश सेनापति वेलिंग्टन हा हॉलंड, बेल्जम व हॅनोव्हर या प्रांतांतील सैन्य व इंग्लिश सैन्य हीं हाताखालीं घेऊन बेल्जियममध्यें दाखल झाला. प्रशियन सैन्य ब्लूचरच्या हाताखालीं असून तें ऱ्हाइन नदीवर चालून येऊं लागलें. रशिया व ऑस्ट्रिया यांचीही सैन्याची भरती सुरू झाली व त्यांचेंही सैन्य आणखी कांहीं महिन्यांत बेल्जियममध्यें येऊन दाखल होणार होतें.

**२ नेपोलियनची तयारी**—इकडे नेपोलियन २० मार्च रोजीं पॅरिस राजधानींत दाखल झाला. मॉस्को येथें पराभव झाल्यापासून फ्रेंच सैन्याचे फारच हाल झाले होते. तथापि सर्व राष्ट्रें एक होण्यापूर्वीं गर्दी करून एक एका राष्ट्राचा आपण फडशा पाडिला पाहिजे तरच आपली धडगत आहे हें नेपोलियननें पक्कें ओळखिलें होतें. तेव्हां त्यानें मुळींच वेळ न दवडतां दंगाधोपा होऊं नये म्हणून मागें थोडी फौज ठेविली व फ्रान्सच्या ईशान्येकडे शत्रूशीं लढण्याकरितां सव्वा लाख फौज तयार केली. या फौजेंतील शिपायांचा जामानिमा, हत्यारें, शिस्त, कवाईत हीं सर्व उत्कृष्ट असून इतकी कार्यक्षम फौज इतक्या थोड्या वेळांत व्यवस्थेनें व जलदी करून नेपोलियननें रणांगणावर उभी केली यांत त्यानें जें कौशल्य दाखविलें तें अवर्णनीय होय.

**३ नेपोलियनचे डावपेंच**—या वेळीं ब्लूचरच्या हाताखालीं एक लाख फौज असून तो लिग्नीवर होता; व वेलिंग्टनजवळही तितकीच फौज असून त्याची बिनी क्वाट्रब्रास या ठिकाणावर होती. या दोन्ही प्रचंड सैन्यांचा मिलाफ होण्याच्या पूर्वीं त्यांचा निरनिराळा पराभव करण्याचें नेपोलियननें ठरविलें. या निश्चयास अनुसरून मार्शल ने याच्या हाताखालीं एक पथक देऊन इंग्रजांच्या क्वाट्रब्रास येथील बिनीवर हल्ला

करण्यासाठीं त्यानें मार्शल नेची रवानगी केली आणि स्वतः नेपोलियननें आपलें मुख्य सैन्य घेऊन लिग्नीस ब्लूचरच्या हाताखालीं प्रशियन सैन्य होतें त्यावर हल्ला चढविला. थोड्याच वेळांत प्राशियन सैन्य पराभूत होऊन पळूं लागलें. या सैन्याचीं हाडें आपण चांगलींच खिळखिळीं केलीं आहेत तेव्हां यांना इंग्रज सैन्याकडे येऊं न देण्याचें काम फारसें अवघड नाहीं असें वाटून नेपोलियननें अवघें ३५००० सैन्य बरोबर देऊन ग्रूशी यास प्रशियनांचा पाठलाग करून त्यांस आणखी दूर हुसकून देण्याच्या कामगिरीवर नेमिलें. इकडे काट्रब्रास येथील ब्रिटिश ब्रिनीनें मार्शल नेचे हल्ले परतविले होते; व प्रशियनांचा पुरता मोड झाल्याचें ऐकून इंग्रज फौज काट्रब्रासपासून मागें वॉटर्लूपर्यंत हटली होती. आणखीही मागें हटण्याचा वेलिंग्टनचा बेत होता; परंतु ब्लूचरकडून 'मी तुम्हास मिळण्यास खास येतों, तुम्ही हटूं नका' असा निरोप आल्यामुळें वेलिंग्टननें वॉटर्लू येथेंच तळ देण्याचें ठरविलें. नेपोलियनला तर जितक्या लवकर इंग्रजांस गांठून त्यांचा पराभव करितां येईल तितकें चांगलें होतें. म्हणून लिग्नीस प्रशियनांचा पराभव केल्यावर मुळींच वेळ न गमावतां वॉटर्लूवर तो चालून गेला.

४ **रणांगण**—वॉटर्लूजवळ समोरासमोर दोन टेकड्यांची रांग असून त्यांच्यामध्यें सुमारें अर्धा मैल अंतर आहे. त्यांपैकीं उत्तरेकडील टेकडीवर इंग्रज फौजांनीं तळ दिला व दक्षिणेकडील रांगेवर फ्रेंच फौजेचा तळ पडला. या लढाईत वेलिंग्टनच्या हाताखालीं ६८००० फौज होती. तिजपैकीं २४००० इंग्रज असून त्यांतील १५१०० काय ती स्पेनमध्यें वेलिंग्टनच्या हाताखालीं यशस्वी झाल्यापैकीं होती. बाकीची फौज बेल्जियन, हॅनोव्हेरियन व डच अशी होती. नेपोलियनच्या फौजेंत ७२००० लोक असून त्याचा तोफखाना इंग्रजांच्या वरचढ होता. इंग्रजांपाशीं १५६ तोफा असून फ्रेंचांजवळ २४६ होत्या.

५ **लढाई**—१८ जूनला रविवार होता. त्या दिवशीं सकाळीं सैनिक निजून उठले, तों रात्रभर पाऊस पडल्यामुळें सर्व बाजूस चिखल

झाला होता व अजूनही पाऊस पडत होता. सुमारें नऊ वाजण्याच्या सुमारास आकाश निवळूं लागलें, पाऊस थांबला व सूर्य प्रकाशूं लागला. मग घोड्याचे पाय निसरणार नाहींत इतका चिखल वाळल्यावर लढाई सुरू झाली. शत्रूच्या सैन्यावर तोफांची सरबत्ती करून त्यास अगोदर जर्जर करावयाचें व मग घोडेस्वारांचे हल्ले चढवून त्याचा पुरा मोड करावयाचा असे नेपोलियनचे डावपेंच होते. प्रशियन सैन्य आपल्या मदतीस येईपर्यंत आपण आपल्या स्थानापासून ढळावयाचें नहीं व आपणास स्थानत्याग करण्यास भाग पाडणारे शत्रूचे सर्व प्रयत्न निष्फळ करावयाचे, असें संरक्षक धोरण वेलिंग्टननें स्वीकारिलें ! इंग्रजांच्या उजव्या अंगास दोन्ही टेकड्यांमध्यें हूगुमाँ व ला हे सेंट हीं दोन ठाणीं होतीं. तीं जर फ्रेंचाच्या हातीं आलीं असतीं तर इंग्रजांच्या उजव्या बगलेवर हल्ला चढवून त्यांची ती बाजू फ्रेंचांस चीत करतां आली असती. त्यामुळें या दोन ठाण्यांवर फारच जोराची लढाई चालू होती. नेपोलियननें आपल्या धोरणास अनुसरून टेकडीवरील इंग्रज सेनेवर पहिल्यानें तोफांचा भडिमार केला; व मग फ्रेंच घोडेस्वारांनीं हल्ला चढविला. इंग्लिश पायदळानें आपला बचाव करण्याची शर्थ केली. संगिनी भोसकून हजारों घोडेस्वार त्यांनीं कापून काढिले. अशा रीतीनें सर्व दिवसभर सारखें रणकंदन चाललें होतें. सायंकाळचे चार वाजण्याच्या सुमारास पूर्वेकडून तोफांचा आवाज ऐकूं आला. तेव्हां ब्लूचर आपल्या मदतीस येत आहे असें पाहून इंग्रजांस धीर आला. नेपोलियनला आतां प्रत्येक क्षण अत्यंत महत्त्वाचा होता. ब्लूचर येऊन पोंचण्याच्या आंत इंग्लिश फौजेचा निःपात करणें त्याला भाग होतें. म्हणून त्यानें आपल्याजवळ शिल्लक ठेविलेलें शौर्याविषयीं विख्यात 'जुन्या गार्डां'चें पलटण मार्शल नेच्या हाताखालीं देऊन इंग्रजावर निर्वाणीचा हल्ला चढविण्याचा त्यास हुकूम दिला. इंग्रजांनीं बंदुकीच्या गोळ्यांनीं त्याचें पहिल्यानें स्वागत केलें; व मग तें टेकडी चढत असतां त्याच्यावर इंग्रज चालून गेले. नंतर निकराची लढाई सुरू झाली. चोहोंकडून बंदुकींचा व संगिनींचा मारा सुरू झाल्यामुळें त्या कसलेल्या जुन्या गार्डांच्या पलटणाचें कांहीं चाललें

नाहीं. इतक्यांत प्रशियन सैन्य येऊन पोंचलें. मग फ्रेंच सैन्याचा अगदीं धीर सुटून तें वाट मिळेल तिकडे पळूं लागलें. प्रशियनांचा जेना व लिग्नी येथें फ्रेंचांनीं चांगलाच समाचार घेतला होता. त्याचा सूड घेण्याच्या ईर्षेनें प्रशियन सैन्यानें पळपुट्या फ्रेंचांचा पाठलाग करून हजारों लोकांस कंठस्नान घातलें ! लढाईत व पाठलागांत मिळून फ्रेंचांचे ४०००० लोक मारले गेले व संयुक्तांचे अवघे १५००० च काय ते पडले.

**६ नेपोलियनचें दुर्दैव**—नेपोलियनला "युद्धांत जय मिळण्याची आशा राहिली नाहीं, गार्डोचाही हल्ला परतविण्यांत आला आहे" अशी जेव्हां बातमी समजली तेव्हां तो युद्धभूमीवरून निसटला व पॅरिसला गेला. तेथून अमेरिकेस जाण्याच्या उद्देशानें तो रॉकफोर्ट बंदरीं गेला; पण इंग्लिश आरमारानें सर्व फ्रेंच किनाऱ्यावर पहारा ठेविला असल्यामुळें १५ जुलै रोजीं 'बेलेरेफोन' जहाजावरील कप्तानाच्या स्वाधीन झाला. येवढ्या अवधींत संयुक्तांचीं सैन्यें पॅरिस शहरावर चालून गेलीं होतीं. त्यांनीं ८ जुलै रोजीं अठराव्या लुईस पुनः फ्रान्सच्या गादीवर बसविलें. संयुक्तांनीं नेपोलियनला फिरून दंगा सुरू करण्यास बिलकूल संधि मिळूं नये यासाठीं सेंट हेलिना या दूरच्या बेटांत ठेविण्याचें ठरविलें. तेथें ता सहा वर्षेपर्यंत होता. १८२१ च्या मे महीन्यांतील ५ व्या तारखेस तो वारला. पुढें १८४० त त्याच्या अस्थि पॅरिसमध्यें आणून मोठ्या समारंभानें पुरण्यांत आल्या. पॅरिस येथें तह ठरला. त्यांत इंग्रजांनीं गेल्या युद्धांत जे प्रांत जिंकले होते ते त्यांजकडेच कायम झाले. त्यावरून युरोपांत हेलिगोलँड व माल्टा, आफ्रिकेंत मॉरिशस व केप ऑफ गुड होप, अमेरिकेंत हॉन्डुरास आणि टोबॅगो व आशियांत सीलोन हे प्रदेश ब्रिटिश साम्राज्यांत सामील झाले.

**७ शतसांवत्सरिक युद्धाचा उपसंहार**—वॉटर्लूचें रणकंदन फारच भयंकर झालें. या लढाईत यशस्वी झालेल्या वेलिंग्टननें पुढील उद्गार काढिले. "जय मिळणें ही पृथ्वीवर ज्या काय अत्यंत दुःखद गोष्टी

असतील त्यांपैकीं एक आहे असें मला वाटतें. येवढें मात्र खरें कीं पराभवापेक्षां तेवढी ती कमी दुःखद आहे." शेवटीं आशा केल्याप्रमाणें ब्लूचरचें सैन्य वेळेवर साहाय्यास आलें व सुदैवानें वेलिंग्टनचा जय झाला. वॉटर्लूची लढाई म्हणजे इंग्रज–फ्रेंचांची, गेलीं शंभर वर्षें किंबहुना त्याहूनही अधिक काळपर्यंत जगांतील साम्राज्याकरितां झटापट चालली होती, तिचा शेवटचा दुवा होय! चौदावा लुई व तिसरा वुइल्यम, डुप्ले व क्लाइव्ह, मॉन्ट्काम व वूल्फ, नेपोलियन व वेलिंग्टन या निरनिराळ्या दुकली भिन्न काळीं व भिन्न स्थळीं लढल्या ही गोष्ट खरी; तथापि त्यांच्या सर्वांच्या कृतीमध्यें एकाच उद्देशाचें सूत्र दिसून आल्याशिवाय रहाणार नाहीं. अठराव्या शतकांतील इंग्लंडचे बडे मुत्सद्दी चॅथॅम व त्याचा मुलगा पिट, इंग्लंडचे पहिल्या प्रतीचे सेनानायक मॉर्लबरो व वेलिंग्टन व इंग्लंडचे थोर नौकानायक रॉड्नी व नेल्सन, या सर्वांच्या पुढें असें कोणतें ध्येय होतें कीं, त्या सर्वांनीं फ्रान्सशींच युद्ध करण्यास झटावें? फ्रान्सनें त्यांचा असा कोणता अपराध केला होता? याचें उत्तर असें कीं इंग्लंडास अमेरिकेंत वसाहतींचा लाभ झाला होता व हिंदुस्थानांत राज्य मिळूं लागलें होतें, त्यांत आपणांस वांटा असावा किंबहुना या वसाहती व हिंदुस्थानांतील राज्य आपणा एकट्यासच मिळाल्यास बरें असें फ्रेंच लोकांस वाटूं लागलें. तेव्हां या दोन राष्ट्रांत झटापट होणें साहजिक होतें; व 'जसा यक्ष तसा बळी' या न्यायानें ही झटापट पुष्कळ काळ चालली, इतकेंच नव्हे तर दोन्ही राष्ट्रांना या झगड्यांत पुष्कळच नुकसान सोसावें लागलें. इंग्लंडचे वूल्फ, नेल्सन यांच्यासारखे शूर नरवीर रणांगणावर पडले! राष्ट्रीय कर्जाचा आंकडा तर ८६ कोटींवर येऊन भिडला! देशांत नानातऱ्हेचे कर बसवावे लागून धान्याची फारच महागाई झाली! हें शतवार्षिक युद्ध चाललें असतां इंग्लंडच्या हातून अमेरिका–संयुक्त संस्थानें गेलीं. हिंदुस्थानांतही म्हैसूरचा राजा टिपू याशीं नेपोलियननें कारस्थानें चालविलीं होतीं. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. वेलिंग्टनचा वडील भाऊ मार्क्विस ऑफ वेल्स्ली हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल ( १७९८–१८०५ ) होता. त्यानें एतद्देशीय राज्यांतून शांतता

ठेविण्यासाठीं कांहीं मुलूख खर्चाकरितां तोडून घेऊन ब्रिटिश फौज ठेविण्याचें धोरण स्वीकारिलें व लवकरच एतद्देशीय राजे नामधारी बनून इंग्रजच हिंदुस्थानचे खरे सत्ताधारी बनले ! अशा रीतीनें इंग्रजांस यश येऊन फ्रेंचांस पराजय आला. या युद्धांत इंग्लंडनें कोठें जमिनीवर मोठ्या लढाया मारल्या असें मुळींच नाहीं. त्यांनीं ज्या मोठमोठ्या लढाया जिंकल्या त्या समुद्रावरच्याच होत्या. वसाहती व हिंदुस्थान हीं फार लांब असून त्यांच्याशीं संबंध राखण्यास समुद्रावरचें वर्चस्व हेंच खरें साधन होय. हें साधन इंग्रजांनीं पूर्णपणें आपल्या हस्तगत केलें होतें. फ्रेंचांनींही हें साम्राज्य घेण्याचा प्रयत्न केला; पण त्यांची वृत्ति द्विधा असे. युरोपमध्येंही फ्रान्सच्या ताब्यांत जास्त मुलूख आणावा ही इच्छा चौदाव्या लुईस होतीच, पण नेपोलियनला ती त्याच्याहून बलवत्तर होती. यामुळें फ्रेंचांचें आरमार असावें तसें बलिष्ठ कधींच झालें नाहीं. इंग्रजांचें धोरण याच्या अगदीं उलट होतें. युरोपांत फ्रान्सशीं जमिनीवर लढाया करण्यासाठीं युरोपियन राष्ट्रांस पैशाची बिदागी द्यावी व वसाहती व हिंदुस्थान हीं ताब्यांत ठेविण्यास अवश्यक अशा आरमाराची फ्रेंचांस नेहमीं वाण ठेवावी हा उद्योग आपलें समुद्रावरचें सामर्थ्य जय्यत ठेवून इंग्लंडनें केला. याचा परिणाम असा झाला कीं, इंग्लंडच्या हातीं साम्राज्य आलें व फ्रान्सला धोरण चुकल्यामुळें नेपोलियनसारखी असामान्य विभूति वांट्यास येऊनही चुरमुरे खात घरीं स्वस्थ बसणें भाग पडलें !!

---

## ५६ देशांतील अस्वस्थता.



**१ सुधारणेस विरोध**—१८०३ मध्यें फ्रान्सशीं दुसरें युद्ध सुरू झालें, त्यापूर्वीं पिट, फॉक्स, बर्क व ग्रे यांनीं पार्लमेंट लोकमत निदर्शक व्हावी म्हणून पुष्कळ मार्ग सुचविले; परंतु युद्ध चालू असेपर्यंत पार्लमेंटनें कोणतीही सुधारणा मान्य करण्याचें नाकारिलें. पुष्कळ वर्षेंपर्यंत वाद-

विवाद होऊन १८०७ त गुलामांचा व्यापार बंद करण्याचें बिल पास झालें. ग्रेनें सुचविलेलें क्याथॉलिकांवरील कडक निर्बंध काढून टाकण्याचें बिल नापास झालें. क्याथॉलिकांना राजकीय हक्क दिले तर राज्यारोहणाच्या वेळीं 'कायद्यानें प्रस्थापित झालेल्या प्रॉटेस्टंट धर्माचें मी पालन करीन' अशी जी आपण शपथ घेतली तिचा भंग होईल अशी तिसऱ्या जॉर्जची समजूतच या बिलाच्या फेटाळणीस कारण झाली. राजास मधून मधून वेडाच्या लहरी येऊं लागल्या होत्या. तेव्हां या प्रश्नाचा वादविवाद चालू ठेविला तर राजाला वेडाची लहर येईल याकरितां ( १८०७-१८१२ ) पर्यंत पोर्टलंड व पर्सीव्हल यांच्या प्रधान–मंडळांनीं हा प्रश्नच मुळीं वादविवादाकरितां पुढें येऊं दिला नाहीं. १८१० त राजास कायमचा चित्तभ्रम झाला व त्याचा चैनी व दुर्व्यसनी मुलगा जॉर्ज ( पुढें चौथा जॉर्ज म्हणून गादीवर आलेला ) यास त्याच्या सत्तेवर बरेच निर्बंध घालण्यांत येऊन रीजेंट नेमण्यांत आलें.

**२ नवे टोरी प्रधान**— रीजेंट झाल्यावर व्हिग प्रधानमंडळ बनवावें असा जॉर्जचा बेत होता. त्याला व्हिग पक्षाचीं तत्त्वें मान्य होतीं म्हणून तो ही गोष्ट करणार होता असें नव्हे; तर व्हिगपक्षाला अधिकारारूढ करणें म्हणजे आपल्या बापाच्या इच्छेविरुद्ध असल्यामुळें तो ती गोष्ट मुद्दाम करणार होता. पण त्याच्या प्रयत्नास यश न येऊन त्याला टोरी प्रधानमंडळच बोलवावें लागलें. लॉर्ड लिव्हरपूल हा मुख्य प्रधान असून त्याचा अधिकार १८१२ पासून १८२७ पर्यंत टिकला. लिव्हरपूल हा सुशील होता, परंतु तो पक्का 'टोरी' असून जनतेच्या हक्काबद्दल त्याच्या ठिकाणीं मुळींच सहानुभूति नव्हती. त्यामुळें काळाचा ओघ कसा आहे व आपण काय करावयास पाहिजे हें कांहीं त्यास समजलें नाहीं. हट्टी स्वभावाबद्दल त्याची प्रसिद्धि होती. त्याच मुख्य सहकारीही पक्के टोरी असून लोक–स्वातंत्र्याच्या विरुद्ध होते. लॉर्ड सिड्मथ हा ( पूर्वीचा ॲडिंग्टन ) ' होम सेक्रेटरी' असून अन्तर्गत व्यवस्था त्याच्याकडे होती. लॉर्ड क्यासलरे ( Castlereagh ) हा परराष्ट्रीय मंत्री होता. हे दोघेही सुधारणेच्या व लोकस्वातंत्र्याच्या अगदीं विरुद्ध असून लोकांनीं आपल्या

हक्कांकरितां चळवळ केली तर तिच्यावर राज्यक्रान्तीच्या गुप्त हेतूंचा शिक्का मारून ती दडपून टाकावी, या मताचा पुरस्कार त्यांनीं जोरानें केला, लोकमताला मान देऊन आपण सुधारणा केली तर लोक शेफारून जातील हें तत्त्व उराशीं बाळगिलें, व कोणतीही सुधारणा न करितां दडपशाहीचा सक्तीनें अंमल केला. असले मंत्री व युद्धामुळें उत्पन्न झालेली बिकट परिस्थिति यांची गांठ पडली, व मंत्र्यांना कोडें नीट न उलगडतां आल्यामुळें असंतोष जास्तच पसरला. युद्ध थांबल्यावर (१८१५) सुधारणा करण्याविषयीं फार ओरड होऊं लागली. पण क्याथॉलिकांना सैन्य व आरमार यांतील नोकऱ्यांवर घेण्याचा ठराव करण्यापलीकडे (१८१७) या टोरी प्रधानमंडळानें कांहींएक केलें नाहीं.

३ **सांपत्तिक अडचण**—१७८३ पासून १७९३ पर्यंत बँकांत व व्यापारांत पैसे घालण्याच्या प्रवृत्तीस अत्यंत ऊत आला होता. १७९३ त फ्रान्सशीं युद्ध सुरू झालें त्या वर्षीं देशांतील बँकांपैकीं एक चतुर्थांश बँकांचें दिवाळें वाजलें! पिटनें तगण्यासारख्या व्यापाऱ्यांस सरकारी मदत देऊन या आणीबाणीच्या प्रसंगांतून कसें तरी निभावून नेलें. सरकार जरी दोन कोटी तीस लक्ष पौंड याप्रमाणें दरसाल कर्ज काढीत होतें तरी करवाढविल्याशिवाय अगदीं भागेना. स्टँप, मृत्युपत्रें, वारसपत्रें, प्राप्ति, धान्य व खिडक्या यांजवर कर बसविण्यांत आले. युद्ध जसजसें रंगांत येऊं लागलें तसतशी इंग्लंडांत नाण्यांची टंचाई भासूं लागली. याचीं कारणें पुढीलप्रमाणें होतीं. पुष्कळ धान्य व युद्धसामुग्री परदेशांत विकत घेण्यांत येत असल्यामुळें पैसा बाहेर देशांस पाठवावा लागे. ऑस्ट्रिया व प्रशिया यांना युद्ध चालू ठेवण्यासाठीं ज्या देणग्या द्यावयाच्या त्या निमित्तानें पुष्कळ पैसा देशाबाहेर जात होता. शिवाय फ्रान्स, इटली, स्पेन व हॉलंड या देशांत फारच थोडा माल निर्गत होऊं लागल्यामुळें त्या मालाची किंमत म्हणून देशांत जो पैसा यावयाचा तोही येईनासा झाला. लोकांची बँकांत पैसे ठेवण्याची प्रवृत्तिही बहुतेक नाहींशी होऊन पैशाचा खाजगी संचय करण्याकडेच त्यांचा ओढा सुरू झाला. याचा परिणाम असा झाला कीं, बँक ऑफ इंग्लंडसारख्या बड्या बँकेजवळ

१७९७ च्या फेब्रुवारी २० तारखेस दोन दिवसांच्या व्यवहारास पुरेल इतकाच सोन्याचा सांठा होता! एक पौंडाच्या वर देणें द्यावयाचें म्हणजे नाणीं न देतां बँक नोटा देऊं लागली व बावीस वर्षेपर्यंत सांपत्तिक विनिमयाचें साधन नाणीं नसून बँक–नोटांनीं तें स्थान सर्वस्वी पटकाविलें होतें! इतर राष्ट्रांच्या व्यापारी जहाजांस समुद्रांत फिरण्याची बहुतेक बंदीच करण्यांत आल्यामुळें समुद्रावरील सर्व व्यापार इंग्रजांच्या हातीं आला हें खरें. तथापि १८१० ते १८१४ पर्यंत दिवाळ्यांचा सुकाळ झाला व युद्धाचा ताण फारच भासूं लागला. १७९२ पासून १८१५ पर्यंत राष्ट्रीय कर्जाचा आंकडा २४ कोटीवरून ८६ कोटीवर आला!

**४ खालच्या वर्गांतील असंतोष**—युद्धाच्या काळीं परदेशी धान्य येण्याचें बंद झालें होतें; त्यामुळें धान्याचे भाव खूप वाढले व शेतकरी व जमीनदार यांना चांगली प्राप्ति होऊं लागली. परंतु आपल्याला जबर कर व भाडें भरावें लागतें या सबबीवर जमीनदार व शेतकरी यांनीं शेतावर काम करणाऱ्या मजुरांचा रोजमुरा वाढविला नाहीं. युद्धाच्या वेळीं गव्हाचा भाव सरासरीनें एका क्वॉर्टरला शंभर शिलिंग इतका होता तो युद्ध थांबतांच खूप उतरला व तो एका क्वॉर्टरला ६० शिलिंगांपासून ८० शिलिंगांपर्यंत राहूं लागला. तेव्हां जमीनदारांचें एकदम खूप नुकसान होऊं लागलें. या धान्याच्या स्वस्ताईमुळें भाकरीस कमी किंमत पडूं लागली; परंतु जमीनदारांनीं मजुरी व शेतकामावरील मजुरांची संख्या हीं दोन्ही कमी केलीं. त्यामुळें शेतकाम करणाऱ्या मजुरांचे हाल युद्ध समाप्तीनें कमी होण्याऐवजीं उलट वाढले, व त्यांच्यांत असंतोष पसरला. युद्धाच्या काळीं सरकारच्या सैन्यास व आरमारास हर प्रकारचा माल लागत असल्यामुळें देशांतील कारखान्यांस खूप जोर आला व उद्योगधंद्यांची चंगळ उडाली. परंतु बायका व मुलें यांचा कारखान्यांत उपयोग करण्यांत येऊं लागल्यामुळें मजुरीचे दर मोठ्या प्रमाणांत वाढले नाहींत. परंतु युद्ध बंद झालें तेव्हां लष्कर व आरमार यांची मागणी एकदम कमी झाल्यामुळें उद्योग–धंद्यांस एकदम जबर धक्का बसला.

त्याच वेळीं परदेशांतीलही मागणी बहुतेक बंद होऊन लोखंड व दगडी कोळशाच्या खाणी या दोहोंवर चालणाऱ्या कारखान्यांची स्थिति अत्यंत शोचनीय झाली. सूत व कापड विणणाऱ्या कारखान्यांचेंही बरेंच नुकसान झालें. कारखाने बंद झाल्यामुळें हजारों मजुरांस घरीं बसावें लागलें. यांत्रिक शोधांमुळें थोडया मजुरांच्या श्रमावर खूप माल निघूं लागला; व तो स्वस्त विकतां येऊं लागला. त्यामुळें मागणींतही पुष्कळ वाढ झाली, व नंतर मजूरही पुष्कळ लागूं लागले. परंतु हा बदल पूर्णपणें होण्यास बराच काळ लागला. पहिल्यानें यंत्रांमुळें मजुरांची जरूर कमीच झाली. तेव्हां युद्ध सुरू असतांच नवीन यंत्रांच्या शोधांमुळें ज्यांच्या पोटावर पाय आला त्या 'हातकाम' करणाऱ्या मजुरांनीं दंगे करून यंत्रें मोडण्याचा उपक्रम केला होता ( १८११ ). लड नांवाचा एक वेडा पोर होता त्यानें वेडाच्या लहरींत पूर्वीं कांहीं यंत्रें मोडिलीं होती, त्याच्या नांवावरून या यंत्र–नाशकांस 'लडाइट' हें नांव प्राप्त झालें. थोडयाच दिवसांत हें यंत्रें मोडण्याचें वेड शेतांवरील मजुरांच्या डोक्यांत शिरलें व त्यांनीं मुख्यतः मळणी करण्याच्या यंत्रांवर मोहीम सुरू केली. युद्ध थांबून शांतता झाल्यावर देशांत स्वस्थता व्हावयाच्याऐवजीं अस्वस्थता बोकाळली ! कारखान्यांतून काम न मिळाल्यामुळें बेकार झालेल्या मजुरांत सरकारच्या लष्करी व आरमारी खात्यांतील नोकऱ्यांवरून निघालेल्या हजारों लोकांची भर पडली. खालच्या वर्गांत असंतोष पसरला व मजूर लोक जमून दंगे करूं लागले. दंगेखोरांच्या मनांत राज्य–क्रान्तिकारक हेतु असून ते भयंकर गुप्त कट करीत आहेत अशाही बातम्या उठल्या. कारखानदारही अत्यंत स्वार्थपरायण असल्यामुळें त्यांनीं खेडे-गांवांतील दीन लोकांमधून मजुरांची भरती केली होती. कारखान्यांतून बायकामुलेंसुद्धां कामावर असून 'कमींत कमी वेतन व जास्तींत जास्ती काम' या तत्त्वावर ते चालविले जात होते. त्यामुळें तेथील मजुरांचे अत्यंत हाल होत व ते अगदीं असंतुष्ट असत.

५ **दडपशाही**—प्रधानमंडळांत पक्के टोरी असल्यामुळें देशांत शांतता राखण्यास दडपशाही केली पाहिजे अशी त्यांची समजूत होती.

त्यांनीं हेबियस कॉर्पस ॲक्ट १८१७ सालीं तहकूब केला व कोणाही माणसास कोर्टापुढें त्याजवर खटला न चालवितां वाटेल तितका वेळ कैदेंत ठेविण्याचा अधिकार आपल्या हातीं घेतला. त्याचप्रमाणें यंत्रनाशकास फांशीची शिक्षा ठेविली. मँचेस्टर, लीड्स, बर्मिंगहॅम हीं गांवें उद्योगधंद्यांतील नवीन शोधांमुळें भरभराटलीं असून तीं आतां मोठीं शहरें बनलीं होती. तथापि पार्लमेंटला एकही प्रतिनिधि पाठविण्याचा त्यांना अजून हक्क नव्हता. मजूरवर्ग सांपत्तिक बिकट परिस्थितीमुळें अस्वस्थ होताच. त्यांनीं आपल्याला राजकीय अधिकार मिळाल्यास आपलीं दुःखें कमी होतील या समजुतीनें पार्लमेंटला प्रतिनिधि पाठविण्यासाठीं चळवळ सुरू केली. बर्मिंगहॅम येथील लोकांनीं कायद्यानें हक्क दिला नसतांना एक सभा भरवून एक प्रतिनिधि पार्लमेंटला निवडून दिला! मँचेस्टरमधील नागरिकांनीं त्यांचाच कित्ता गिरविण्याचें ठरविलें. 'सेंट पीटर्स फील्ड्स' पटांगणांत चाळीस हजार लोकांची सभा भरली व भाषणें होऊं लागलीं ( १६ आगष्ट १८१९ ). मॅजिस्ट्रेटनें वक्त्यास पकडण्याचा घोडेस्वारांस हुकूम केला. तो हुकूम ते अंमलांत आणूं लागले; तेव्हां दंगा झाला! त्यांत पांच सहा माणसें ठार होऊन शंभर जखमी झालीं! ही 'पीटर्लू कत्तल' म्हणून पुढें प्रसिद्ध झाली. या प्रसंगींच्या अधिकाऱ्यांच्या वर्तनानें लोक चिडून गेले होतेच. त्यातून लोकक्षोभ वाढविण्यासच कीं काय सहा कडक कायदे करण्यांत आले ( १८१९ ). १ पटांगणावर सभा भरविण्यावर निर्बंध घालण्यांत आला. २ वर्तमानपत्रांत राजद्रोही मजकूर छापल्यास कडक शिक्षा ठेविली ३ सरकारवर टीका करणारीं हस्तपत्रकें छापण्याची मनाई झाली. ४ खाजगी लष्करी कवाईत करणें बेकायदेशीर ठरविण्यांत आलें. ५ दंगेखोरांवरील खटला तडकाफडकी करून टाकण्याची तजवीज करण्यांत आली. ६ ज्या सोळा कौंटींत दंगे वारंवार होत त्यांत शस्त्रांची जप्ती करण्याचा हुकूम सुटला. या दडपशाही कायद्यांमुळें सामान्य जनसमूहांत टोरी अत्यंत अप्रिय झाले. कित्येक जलाल लोक तर अगदीं चिडून गेले व त्यांनीं १८२० च्या फेब्रुवारींत 'केटो स्ट्रीटमधील कट' केला. लॉर्ड

लिव्हरपूल व प्रधानमंडळांतील त्याचे सर्व साहाय्यकारी एका भोजनप्रसंगीं जेवावयास जमणार होते त्यावेळीं केटो स्ट्रीटमधील एका घरांत जमून कांहीं साहसी लोकांनीं त्या सर्वांस यमसदनास पाठविण्याचा बेत केला होता. पण सुदैवानें कट वेळींच उघडकीस येऊन कटवाल्यांचा पुढारी थिसल्वुड व त्याचे साथीदार यांस फांशीं देण्यांत आलें. याच सुमारास परदेशांतील पक्क्या मालाची मागणी सुरू झाली व देशांतील उद्योगधंद्यांची मांडणी नवीन परिस्थितीस अनुरूप बसविण्यांत आली. त्यामुळें मजूर-वर्गाचे हाल बहुतेक बंद झाले. लवकरच प्रधानमंडळांतही बदल होऊन प्रगतिप्रिय टोरींचा भरणा झाला. त्यामुळें लवकरच देशांतील खालच्या वर्गांतील अस्वस्थता बहुतेक नाहींशी झाली.

**६ चौथ्या जॉर्जचें राज्यारोहण ( १८२०–१८३० )—** १८२० च्या जानेवारींत तिसरा जॉर्ज मरण पावला व रीजंट असलेला चैनी व व्यसनी जॉर्ज 'चौथा जॉर्ज' ही पदवी घेऊन इंग्लंडचा राजा बनला. हा उधळ्या असून चैनीशिवाय दुसरें कांहींच त्याला सुचत नव्हतें. प्रिन्स ऑफ वेल्स असतां त्याला दरसाल एक लक्ष पौंडांचें उत्पन्न तोडून देण्यांत आलें होतें, तरी सुद्धां हे राजश्री नेहमीं कर्जबाजारी असत. त्याच्या राज्यारोहणसमारंभासाठीं राष्ट्रास २ लक्ष पौंड खर्च आला. त्या प्रसंगीं यानें उसने दागिने आणिले होते, ते परत करण्याचें त्यास भान राहिलें नाहीं व पार्लमेंटला त्यांची किंमत भरावी लागली. त्याची दानत तर काय विलक्षणच होती! प्रिन्स ऑफ वेल्स असतां ( १७८५ ) कायद्या[१]विरुद्ध त्यानें मिसेस फिट्झहर्बर्ट या सुंदर क्याथॉलिक बाईशीं

---

१ १७७२ सालीं 'राजघराण्यांतील विवाहाचा कायदा' पास झाला होता. त्यायोगें दुसऱ्या जॉर्जच्या कोणाही वंशजानें पंचवीस वर्षें वयाच्या आंत सिंहासनारूढ राजाच्या संमतीखेरीज विवाह करूं नये असें ठरविण्यांत आलें. नंतरसुद्धां विवाहापूर्वीं बारा महिने प्रिव्ही कौन्सिलला त्याविषयीं कळविलें पाहिजे असा निर्बंध होता; व विवाहास पार्लमेंटची हरकत नसल्यास तो करण्यास मोकळीक ठेविण्यांत आली होती.

खाजगी लग्न लाविलें ! दहा वर्षांनंतर बापाच्या आग्रहावरून व मुख्यतः आपलें कर्ज फेडण्यास पैसे मिळावे म्हणून त्यानें प्रिन्सेस क्यॅरोलिन हिशीं लग्न लाविलें ! परंतु हा संबंध दोघांसही दुःखद झाला. लग्न झाल्यावर एक वर्षाच्या आंतच त्यानें क्यॅरोलिनशीं सबंध सोडिला व ती युरोपांत निघून गेली. राज्यावर आल्यावर जॉर्जनें तिचें नांव प्रार्थनापुस्तकांतून वगळलें. तिनें लग्नाच्या वेळच्या शपथा मोडिल्या या सबबीवर तिच्याशीं काडीमोड मंजूर करण्याचें बिल राजाच्या आग्रहावरून प्रधानमंडळानें लॉर्डांपुढें आणिलें ( १८२० जुलै ). पण भरपूर पुरावा न मिळाल्यामुळें पार्लमेंटनें तशी मंजुरी देण्याचें नाकारिलें व लोकमत राणीस अनुकूल असल्यामुळें बिल परत घेणें प्रधानमंडळास भाग पडलें. मात्र राणी म्हणून राज्यारोहण–समारंभाचे वेळीं तिला जो मान मिळावयाचा तो मिळू नये असें ठरविण्यांत आलें. आपल्या वकिलाच्या सल्ल्यावरून राज्यारोहण-समारंभाच्या वेळीं वेस्टमिन्स्टर ॲबेच्या दरवाजाशीं आंत प्रवेश करून घेण्यासाठीं क्यॅरोलिन आली ( जुलै १८२१ ). पण जॉर्जच्या हुकुमावरून तिला आंत जाण्याची परवानगी देण्यांत आली नाहीं. तेव्हां तिच्या मनास धक्का बसला व ती तशीच परत गेली. पुढें एकोणीस दिवसांनीं या दुर्दैवी राणीचा अंत झाला.

**७ प्रगतिप्रिय टोरींचा अंमल**— १८२२ च्या जानेवारींत लॉर्ड सिड्मथ यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला व त्याच्याऐवजीं होम सेक्रेटरीच्या जागीं रॉबर्ट पील आला. पुढें ऑगस्टांत क्यासलरेनें आत्महत्त्या केली व त्याच्या जागीं क्यानिंग परराष्ट्रीय प्रधान झाला. पुढील सालीं हस्किसन व्यापर–नियामक बोर्डाचा प्रेसिडेंट झाला. पील, क्यानिंग व हस्किसन हे तिघेही प्रगतिप्रिय टोरी असून त्यांनीं जोमदार धोरण स्वीकारून आपआपल्या खात्यांत सुधारणा घडवून आणिल्या. १८१५ त वॉटर्लूच्या लढाईनंतर ऑस्ट्रिया, प्रशिया व रशिया येथील राजांनीं एक 'पवित्र संघ' स्थापिला. ख्रिस्ती धर्माच्या तत्त्वांना धरून राज्यकारभार करावयाचा हा त्याचा वरकरणी उद्देश होता. परंतु खरा हेतु हा होता कीं, निरनिराळ्या देशांतील लोकस्वातंत्र्याच्या चळवळी हाणून पाडून

राजांची सत्ता दृढ राखावयाची. क्यासलरे हा त्या वेळीं इंग्लंडचा परराष्ट्रीय मंत्री होता. त्यानें या संघांत शिरण्याचें नाकबूल केलें; परंतु त्या बरोबरच हक्क मागणाऱ्या लोकांसही कसलीसुद्धां मदत करावयाची नाहीं असें त्याचें धोरण होतें. पण क्यानिंग परराष्ट्रीय प्रधान झाल्याबरोबर त्यानें लोकस्वातंत्र्याच्या चळवळींस उत्तेजन दिलें. व्हेरोना येथें जमून 'पवित्र-संघा'च्या सभासदांनीं ग्रीसच्या स्वातंत्र्याचा प्रश्न पुढें ढकलला, त्या सभेस हजर राहण्याचें त्यानें नाकारिलें, व दक्षिण अमेरिकेंतील स्पॅनिश वसाहतींनीं स्वातंत्र्य जाहीर केलें तेव्हां क्यानिंगनें त्या कृत्यास चटकन् संमति दिली. तेव्हां पवित्र संघाच्या प्रतिगामी धोरणास बराच आळा बसला. पोर्तुगालमधील लोकांनीं आपल्या राजाच्या सत्तेवर आळा घालण्याच्या खटपटी चालविल्या; तेव्हां स्पेनच्या राजानें पोर्तुगालच्या राजास साहाय्य करून लोकांस हाणून पाडण्याचा बेत केला; तेव्हां क्यानिंगनें इंग्रज सैन्याची हालवाहलव करून पोर्तुगीज लोकांची कड घेतली; त्याबरोबर स्पेननें ढवळाढवळ करण्याचें बंद केलें (१८२६). पुढें नॅव्हॅरिनो बंदराजवळ तुर्कस्थान व इजिप्त यांच्या आरमाराचा अँग्लो-फ्रेंचांनीं नाश केला व ग्रीस देश स्वतंत्र झाला ( १८२७ ). त्या काळीं फौजदारी कायदा 'रानटी' स्थितींत असून दोनशेंवर साध्या गुन्ह्यांना फांशीची शिक्षा होती. पीलनें ही यादि पुष्कळ कमी केली व त्यामुळें समान शिक्षेमुळें मोठे गुन्हे करण्याची लोकांची प्रवृत्ति नाहींशी झाली व साध्या गुन्ह्यांसही जबर शिक्षा असल्यानें आरोपीस दोषी न ठरवितां सोडून देण्याच्या न्यायाधिशांच्या प्रवृत्तीसही आळा बसला. हस्किसननें पिटचें धोरण पुढें चालवून परदेशांच्या इंग्लंडशीं असलेल्या व्यापारावरील निर्बंध खूप कमी केले. जो देश इंग्लंडला व्यापारांत सवलती देईल त्याला इंग्लंडनेंही सवलती द्याव्या असें ठरविणारा 'जकातीच्या अन्योन्य समतेचा कायदा' (Reciprocity of Duties Bill) पास झाला ( १८२३ ). त्यामुळें नौकानिर्बंधाचे कायदे रद्द होऊन इंग्लंडचा व्यापार सर्व देशांस खुला झाला. आतां इंग्लिश जहाजांची संख्या खूप वाढल्यामुळें व समुद्रावरील नाविक सत्ता पूर्ण असल्यामुळें या सवलतीपासून इंग्लंडचें नुकसान होणें अशक्य होतें.

त्याचप्रमाणें हस्किसननें परदेशी कच्च्या मालावरील जकाती जवळ जवळ अजीबात उठविल्या व पक्क्या मालावर मात्र शेंकडा १५ पासून ३० टक्के-पर्यंत जकात ठेविली. इंग्लंडच्या उद्योगधंद्यांस थोडीशी संरक्षक जकातीची जरूर आहे ही भावनाच या फरकाच्या मुळाशीं होती. हस्किसनच्या या सुधारणांनीं व्यापाराची पुष्कळ अभिवृद्धि झाली व त्या मानानें इंग्लंडच्या उद्योगधंद्यांसही पुष्कळ उत्तेजन मिळालें.

---

# ५७ मध्यम–वर्गास मताधिकार मिळाला.



**१ एकोणिसाव्या शतकाचा ओघ (१८१५–१९१४)**— १८१५ सालीं वॉटर्लूच्या लढाईत ब्रिटिश साम्राज्याचा बडा शत्रु नेपोलियन याचा पराभव झाला व ब्रिटिश साम्राज्य निर्बाध झालें. यापुढें राष्ट्रीयत्व व लोकसत्ता या दोन शक्ति युरोपच्या इतिहासांत जोरानें वावरूं लागल्या. इटली व संयुक्त जर्मनी यांची स्थापना होऊन ( १८७१ ) तुर्कस्थानच्या अवनतीमुळें सर्व्हिया, बल्गेरिया, रुमानिया इत्यादि बाल्कन राष्ट्रांचा उदय झाला. राष्ट्र या नात्यानें इंग्लंडचें अस्तित्व पूर्व कालापासून अगोदरच कायम झालें असल्यानें राष्ट्रीयत्वाचा उदय करण्याचें कार्य करण्याची इंग्रजांस जरूर नव्हती. १६८८ च्या क्रान्तीनें लोकसत्तेचें तत्त्वही इंग्लंडांत प्रस्थापित झालें होतें. परंतु अजून लोकसत्तेची अभिवृद्धि करून त्या तत्त्वाचें उन्नत स्वरूप इंग्लंडांत रूढ करावयाचें होतें. पार्लमेंटचा दाब राजसत्तेवर पडला होता; परंतु पार्लमेंट म्हणजे लोक किंवा लोकप्रतिनिधि हें समीकरण अजून यथार्थ व्हावयाचें होतें. १८१५ पासून इंग्लंडच्या इतिहासांतील नवीन कालविभागास सुरवात झाली; व त्यांत खऱ्याखुऱ्या लोकसत्तेची स्थापना व अभिवृद्धि करण्याचें कार्य इंग्रजांनीं साधिलें. पहिल्यानें धार्मिक स्वातंत्र्याची प्रस्थापना करून ( १८२८ ), पार्लमेंटच्या निवडणुकीच्या पद्धतींत व'मत' देण्याच्या

हक्कांत सुधारणा करून ती खरी लोकमतनिदर्शक करण्याचा इंग्रजांनीं जोरानें उद्योग केला. १८३२, १८६७, १८८४ व १९१८ या सालीं पार्लमेंट-सुधारणेचे कायदे पास झाले. हें सुधारणेचें कार्य कोणत्या एका पक्षाचें अशी स्थिति राहिली नसून सर्व पक्ष मिळून तें घडवून आणण्याचा प्रयत्न करीत. परंतु येवढीं सुधारणा-बिलें पास केलीं म्हणजे लोकसत्ता पुरी कृतार्थ झाली असें कोणीही समजत नसे. ही पार्लमेंट-सुधारणा होत असतां सामान्य जनसमूहाचा रोजचा जीवनक्रम जेणें करून सुखावह होईल असे कायदे पास करण्याचा पार्लमेंटनें धूमधडाका चालविला. त्याचप्रमाणें या काळीं भौतिक शास्त्रांतील अकल्पित शोधांमुळें आगगाड्या, तारायंत्रें व इतर सुखसोयींचीं साधनें निघून समाजस्थितींत विलक्षण बदल झाला. गेल्या शतकाच्या अखेरीस इंग्रजांच्या हातून अमेरिका गेली. त्यावरून बोध घेऊन वसाहतींना साम्राज्यान्तर्गत स्वराज्याचें दान देऊन संतुष्ट राखण्याचें धोरण इंग्रजांनीं स्वीकारिलें व तें यशस्वी झालें. या कालांत इंग्लंडच्या वसाहतींत बरीच भर पडली असून ब्रिटिश साम्राज्य कळसास चढलें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

**२ क्याथॉलिकांचें दुःखनिवारण**—पार्लमेंटांत क्याथॉलिक लोकांस सभासद म्हणून बसणें अशक्य होतें; व आयर्लंडचा बहुजनसमाज तर क्याथॉलिक होता. तेव्हां आयर्लंडांतून इंग्लिश पार्लमेंटांत निवडून आलेले सभासद, त्यांच्यापैकीं एकही क्याथॉलिक नसल्यामुळें, आयर्लंडांतील लोकमताचे निदर्शक नव्हते हें सांगणें नकोच. आपल्यांतील लोकांना जरी सभासद होतां येत नसलें तरी निदान जे सभासद निवडून यावयाचे ते आपल्याला संमत असेच असावेत या हेतूनें डॅनियल ओकॉनेल या प्रसिद्ध आयरिश देशभक्तानें १८२३ त एक क्याथॉलिक समिति (Catholic Association) स्थापिली व आयर्लंडांतील सर्व निवडणुकींवर तिची हुकमत चालू लागली. तेव्हां सरकारनें ती समिति बेकायदेशीर ठरवून तीन वर्षेंपर्यंत मोडून टाकिली (१८२५). कायद्याची मुदत भरतांच १८२८ त त्या समितीचें पुनरुज्जीवन झालें. इकडे

इंग्लंडांतील व्हिग पक्षीयांनीं दुसऱ्या चार्लसच्या कारकिर्दींत पास झालेले कॉर्पोरेशन व टेस्ट ॲक्ट हे धर्म–स्वातंत्र्यावर निर्बंध घालणारे कायदे रद्द करण्याविषयीं प्रधानमंडळाच्या मागें सारखें टुमणें लाविलें. सन १७२७ पासून या कायद्यांतील निर्बंधांपासून सवलत देणारें बिल दरसाल पास होत असल्यामुळें हे कायदे रद्द करणें म्हणजे कागदी फरक होता. परंतु येवढाही फरक करण्यास पक्का टोरी प्रधान ड्यूक ऑफ वेलिंग्टन (१८२८ जानेवारी–१८३० नोव्हेंबर) आढेवेढे घेऊं लागला. तथापि शेवटीं व्हिगपक्षाचा जोर होऊन टेस्ट व कॉर्पोरेशन ॲक्ट रद्द झाले (१८२८). त्यायोगें प्रॉटेस्टंट असून प्रस्थापित धर्माहून अन्य मार्गानें जाणाऱ्या लोकांस (Dissenters) सरकारी नोकरीवर येण्यास मोकळीक झाली. १८२८ त ओकॉनेल हा क्याथॉलिक असतांही आयरिश लोकांनीं त्याला पार्लमेंटचा सभासद निवडिलें. हें बेकायदेशीर होतें; पण त्याला पार्लमेंटांत बसूं न दिलें तर दंगा होऊन यादवी माजणार हें निश्चित होतें. या वेळीं टोरी प्रधानमंडळ अधिकारारूढ असून वेलिंग्टनसारख्या पक्क्या टोरीच्या हातीं अधिकारसूत्रें होतीं. तो क्याथॉलिकांस सवलती देण्याच्या अगदीं विरुद्ध होता. परंतु त्यानें शांतता राखण्यासाठीं रोमन क्याथॉलिकांविरुद्ध असलेले निर्बंध काढून घेण्याचें ठरविलें. १८२९ च्या एप्रिलांत 'रोमन क्याथॉलिक रिलीफ बिल' पास होऊन क्याथॉलिकांस पार्लमेंटचे सभासद होण्याची परवानगी मिळाली, व राजा आणि धर्मखातें यांच्याशीं निकट संबंध असलेल्या जागा सोडून इतर नोकऱ्याही मिळण्याची सवलत मिळाली. वेलिंग्टनचें या वेळचें वर्तन बऱ्याच पक्क्या टोरी अनुयायांस पसंत पडलें नाहीं व त्यांचा त्याच्यावरील विश्वास उडाला. अगोदरच क्यानिंगचे अनुयायी प्रगतिप्रिय असल्यामुळें टोरी पक्षांत फूट होती; त्यांत आतां पक्क्या टोरींमध्यें द्विधामत होऊन तो पक्ष अधिकच दुर्बल झाला.

**३ सुधारणेची जरुरी**––पार्लमेंटला सभासद पाठविण्याचा हक्क पुष्कळ गांवांस (बरो) ट्यूडर व स्टुअर्ट यांच्या काळीं किंवा तत्पूर्वींही देण्यांत आला होता. त्या काळीं इंग्लंड हा कृषिप्रधान देश होता. परंतु अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत मोठी औद्योगिक क्रान्ति होऊन इंग्लंडां-

तील स्थलांचें महत्त्व पार बदलून गेलें. ज्या खेड्यांस सभासद पाठविण्याचा हक्क होता त्यांपैकीं कित्येक अगदीं मोडकळीस आलीं असून कांहीं तर नामशेष झालीं होतीं. अर्थात् अशीं खेडीं कोणा तरी श्रीमंताच्या मालकीचीं बनून गेलीं असून त्यानें आपल्या हस्तकास त्यांचेतर्फे सभासद नेमावें असा क्रम राजरोसपणें सुरू होता. लजर्सहॉल या खेड्यांत अवघा एक मतदार असून तो स्वतःस सभासद निवडी व आपला प्रतिनिधी म्हणून पार्लमेंटांत बसे! कित्येक गांवीं सभासदांच्या जागेचा लिलाव होई व सर्वांत जास्त पैसे देणारास सभासद निवडण्यांत येई. उलटपक्षीं औद्योगिक क्रान्तीमुळें मँचेस्टर, लीड्स, बर्मिंगहॅम हीं शहरें भरभराटलीं होतीं, तरी त्यांस सभासद निवडण्याचा हक्क मुळींच नव्हता. अशा रीतीनें पार्लमेंट लोकमतनिदर्शक राहिली नाहीं. अशांत तिसऱ्या जॉर्जनें पैसे भरून व पदव्यांची लालूच दाखवून 'राजमित्रांनीं' कॉमन्स सभा जेव्हां भरवून टाकिली तेव्हां तर ही गोष्ट विशेषच उघड झाली. तेव्हां चॅथॅम व पिट यांनीं नामधारी बरोंचा हक्क काढून घेण्यांत यावा, अशा सूचना पार्लमेंटपुढें मांडिल्या. राष्ट्रांतही सभासद निवडण्याच्या हक्कासंबंधीं सुधारणा होणें अत्यंत जरूर आहे अशी जाणीव उत्पन्न होऊं लागली होती. परंतु लवकरच फ्रेंच राज्यक्रान्तीनंतरच्या युद्धांत इंग्लंड पडल्यामुळें १८१५सालीं तह होईपर्यंत हा प्रश्न मागें पडला. या युद्धांत ब्रिटिश साम्राज्याच्या प्राणावरील संकट दूर होऊन इंग्लंडचें वर्चस्व कायम झालें. मग पार्लमेंटच्या निवडणुकींत सुधारणा करण्याचा प्रश्न ओघानेंच पुढें आला. चालू निवडणुकीच्या हक्कांचा सर्रास दुरुपयोग करण्यांत येत होता. नवीन भरभराटीस आलेल्या शहरांस मुळींच हक्क नव्हता. शिवाय प्रत्येक प्रौढ पुरुषास मत देण्याचा हक्क असावा या तत्त्वाचें अंधुक दर्शन कित्येक सुधारणावाद्यांच्या मनश्चक्षूंस होऊं लागलें होतें. या कारणत्रयीचा जोर होऊन सुधारणेचा प्रश्न मोठ्या झपाट्यानें इंग्लिश राष्ट्रापुढें आला. अशांत १८३० त पॅरिसमध्यें दुसरी राज्यक्रान्ति झाली. तेव्हां तर सुधारणापक्षीयांस जास्तच हुरूप आला.

**४ सुधारणेचें बिल**—१८३० च्या जुलैंत पार्लमेंटची निवडणूक

झाली. तिच्यांत व्हिग लोकांची सरशी होऊन वेलिंग्टनला राजीनामा द्यावा लागला. मग व्हिग प्रधानमंडळ अधिकारारूढ होऊन लॉर्ड ग्रे हा मुख्य प्रधान झाला (नोव्हेंबर). अधिकारावर येतांच या प्रधानमंडळानें पार्लमेंटांतील अन्याय एकदम दूर करण्यासाठीं एक सुधारणेचें बिल पास करून घेण्याचें ठरविलें. कॉमन्स सभेचा पुढारी लॉर्ड[1] जॉन रसेल यानें एक बिल तयार करून तें कॉमन्सपुढें मांडिलें ( १८३१ मार्च ). कॉमन्स सभेंत थोडीं मतें कमी पडून तें बिल नापास झालें. राष्ट्रमत आपणास अनुकूळ आहे अशी प्रधानमंडळाची खात्री असल्यामुळें त्यानें पार्लमेंट बरखास्त करून नव्या निवडणुकी केल्या. निवडणुकी होत असतां आपली बाजू प्रधान-मंडळानें लोकांपुढें जोरानें मांडिली. त्याचा सुपरिणाम होऊन पूर्वीं-पेक्षां विरुद्ध पक्षाचे शंभर सभासद कमी निवडून आले. नव्या कॉमन्स-सभेंत 'रिफॉर्म बिल' १३६ च्या बहुमतानें पास झालें; पण लॉर्ड्स-सभेंत ४१ मतें कमी पडून बिल नामंजूर झालें. लॉर्डांच्या या कृत्याब-द्दल सर्व देशभर नापसंतीदर्शक सभा होऊं लागल्या. हजारों लोकांनीं जमून सभांतून लॉर्डांच्या कृत्याचा निषेध केला. लवकरच दंगे होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं ! 'बिल, संपूर्ण बिल व बिलाशिवाय दुसरें कांहीं नको' हें सुधारणा-पक्षाचें यावेळीं लोकजागृति-दर्शक सूत्र-वाक्य बनून गेलें होतें. प्रधानमंडळानें फिरून एक बिल तयार केलें, तें १६२ च्या मताधिक्यानें कॉमन्समध्यें पास झालें ( डिसेंबर ). शांततेनें व सरळ मार्गानें या प्रकरणाचा निकाल करण्याची लॉर्डांस आतां संधि होती. पण लॉर्ड पडले हट्टी, ते ऐकेनात. तेव्हां सामोपचारानें करीत नाहींत तर

---

१ हा सहाव्या ड्यूक ऑफ बेडफर्डचा तिसरा मुलगा होता. ड्यूकच्या सर्व मुलांस लॉर्ड हें सन्मानदर्शक उपपद लावण्याची चाल आहे, त्या-प्रमाणें त्याचा या ठिकाणीं प्रयोग केला आहे. लॉर्ड जॉन हा कॉमन्स-सभेचा सभासद होता. १८६१ त तो अर्ल झाला तेव्हां तो रीतसरपणें लॉर्ड्स सभेचा सभासद झाला.

सक्तीनें लॉर्डांस हें बिल पास करावयास भाग पाडिलें पाहिजे असा विचार करून लॉर्ड ग्रे यानें बिल पास होण्यास अवश्य इतके नवे लॉर्ड बनविण्याची राजास सूचना केली! १८४० सालीं चौथा जॉर्ज वारून त्याचा भाऊ 'चौथा वुइल्यम' ही पदवी घेऊन त्याच्यामागून गादीवर आला होता. तो मृदु स्वभावाचा असल्यामुळें येवढा कडक उपाय योजण्यास त्यास धैर्य झालें नाहीं. त्यानें लॉर्डांच्या पुढाऱ्यांस बोलावून आणून राष्ट्रमतास विरोध करून देशावर आपत्ति आणण्याच्या हट्टापासून निवृत्त होण्याविषयीं सुचविलें. तेव्हां आपल्या पक्षाचें दौर्बल्य ओळखून ड्यूक ऑफ वेलिंग्टन व त्याचे कित्येक अनुयायी यांनीं मतें दिली नाहींत व रिफॉर्म बिल लॉर्डांच्या सभेंत मंजूर होऊन त्यास कायद्याचें स्वरूप आलें ( १८३२ ). रिफॉर्म बिलची चळवळ देशांत चालू असतां इंग्लंडांतील पक्षांस नवीन नांवें पडलीं. जुनी स्थिती आहे तशीच ठेवावी, तींत सुधारणा करण्याची जरुरी नाहीं असें टोरी पक्ष म्हणत असे. त्यावरून त्यास कॉन्झर्व्हेटिव्ह ( Conservative, स्थितिप्रिय ) पक्ष असें नांव पडलें. त्याच्या उलट सुधारणा करून लोक-स्वातंत्र्य जेणेंकरून वाढेल अशी राज्यरचना झाली पाहिजे असें म्हणणाऱ्या व्हिग पक्षास लिबरल ( Liberal, उदार) पक्ष असें अभिधान प्राप्त झालें. कित्येकजण राज्ययंत्राच्या मुळाशींच सुधारणा करणें जरूर आहे असें प्रतिपादीत त्यांस रॅडिकल(Radical; मूलस्पर्शी ) म्हणत.

५ **कलमें**—या बिलाअन्वयें निवडणुकीच्या हक्कांत पुढीलप्रमाणें फरक करण्यांत आले. ( १ ) कांहीं नामधारी बरोंचा सभासद निवडून पाठविण्याचा संपूर्ण हक्क काढून घेण्यांत येऊन, कांहींचा हक्क अंशतः कमी करण्यांत आला. अगदीं लहान अशा ५६ बरोंचे प्रत्येकीं दोन प्रतिनिधी कमी करण्यांत आले व त्याजपेक्षां जीं लोकसंख्येनें मोठीं होतीं असल्या ३१ बरोंचा प्रत्येकीं एक प्रतिनिधी कमी करण्यांत आला. अशा रीतीनें कॉमन्ससभेंतील १४३ जागा रिकाम्या झाल्या. ( २ ) या रिकाम्या झालेल्या जागांपैकीं ६५ जागा बड्या कौन्टींना जास्त सभासद निवडून देण्याचा हक्क देण्यांत येऊन भरून काढल्या गेल्या. बर्मिंगहॅम, शेफील्ड,

मँचेस्टर, लीड्स, यांजसारख्या बावीस शहरांस प्रत्येकीं दोन सभासद निवडण्याचा हक्क देण्यांत आला. दुसऱ्या एकवीस छोट्या शहरांस एक एक प्रतिनिधी पार्लमेंटांत पाठविण्याचा हक्क मिळाला. अशा रीतीनें ६५ जागा भरल्या. म्हणजे एकूण १३० सभासदांच्या जागा भरल्या गेल्या. बाकी राहिलेल्या तेरा रिकाम्या जागा आयर्लंड व स्कॉटलंड यांना अधिक प्रतिनिधी निवडण्याचा हक्क देऊन भरून काढण्यांत आल्या. ( ३ ) मतदारांची संख्याही सुमारें पांच लक्षांनीं वाढली. बरोंमध्यें वर्षास दहा पौंड खंड देणाऱ्या घरवाल्यास मत देण्याचा हक्क मिळाला. कौन्टीमध्यें ४० शिलिंग वार्षिक कराच्या जमीनीच्या मालकास ( Freeholder ) मत देण्याचा हक्क होता, तो कायम झाला. तसाच १० पौंड भाडें भरून पूर्वीपासून जमीनीची वहिवाट करणाऱ्या कुळांसही[1] ( Copyholder ) मताचा हक्क मिळाला. त्याचप्रमाणें सालीना ५० पौंड खंड भरणाऱ्या खंडकऱ्यासही ( Leaseholder ) मतदार म्हणून पार्लमेंटला सभा-

---

१ मध्ययुगांत सरंजाम—पद्धति जोरांत असून जमिनदारांच्या शेतवाड्या ( Manors ) सर्व इंग्लंडभर पसरल्या होत्या. जमीनदार शेतवाडीपैकीं अर्धी जमीन स्वतःकडे ठेवी. बाकीच्या अर्ध्यापैकीं कांहीं भाग स्वतंत्र शेतकऱ्याकडे ( Freeholder ) असून कांहीं गुलामवर्गाकडे ( Villein ) असे. या गुलामवर्गास जमिनीबाबद जमीनदारानें स्वतःकडे राखिलेल्या जमिनीवर कांहीं दिवस खपावें लागे व प्रत्यक्ष—मुख्यतः ऐन जिनसी—खंड भरावा लागे. पुढें जमीनदार वर्गास धर्म—युद्धांत आणि पुढें शतसांवत्सरिक युद्धांत सामील होण्यास पैशाची जरूर लागली, तेव्हां कित्येक गुलामांनीं रोख पैसे देऊन शेतावरील चाकरीपासून आपली मुक्तता करून घेतली व ठराविक वार्षिक खंड भरून जमिनीची वहिवाट करण्याचा करार करून ते जवळ जवळ स्वतंत्र शेतकरी बनले. त्यावेळीं झालेले ठराव शेतवाडीवरील कागद—पत्रांत नोंदून त्याच्या नकला शेतकऱ्यांस देण्यांत आल्या. तेव्हांपासून हे करारपत्रवाले शेतकरी ( Copyholders ) अस्तित्वांत आले.

सद पाठविण्याचा हक्क मिळाला. अशा रीतीनें शहरांत व खेडेगांवांत सुखवस्तु लोकांस पार्लमेंटला सभासद निवडून देण्याचा अधिकार मिळाला व आजपर्यंत पार्लमेंटवर जमीनदार–वर्गाची हुकमत चालत असे, त्या स्थितींत पालट होऊन मध्यम वर्गाच्या हातीं सत्ता आली. अजून शहरांतील व खेडेगांवांतील कामकरी वर्गाला मतदारीचा हक्क मिळावयाचाच होता. त्या दृष्टीनें १८६७ व १८८४ सालीं कायदे होऊन सुधारणेचें काम पुढें चालू राहिलें.

**४ म्युनिसिपल रिफॉर्म अॅक्ट ( १८३५ )**—रिफॉर्म बिलाप्रमाणें निवडणुकी झाल्या, त्यांत व्हिग पक्षाचे ४८६ सभासद निवडून येऊन टोरी पक्षाचे अवघे १७२ निवडून आले. १८७४ पर्यंत आठ वर्षें सोडून बाकीचा सर्व काळ व्हिग पक्षच अधिकारारूढ होता. १७८४ पासून १८३० पर्यंत टोरी प्रधानांच्या हातीं राज्यकारभार होता. रिफॉर्म बिल पास करून व्हिग पक्षानें मध्यम–वर्गाला राजकीय हक्क दिले व त्यामुळें त्या पक्षास दीर्घकालीन अधिकार प्राप्त झाला. अधिकारावर येतांच व्हिग पक्षानें पांच सहा वर्षांत सामाजिक सुधारणेचें कायदे पास केले; ते आतां सांगावयाचे. या काळपर्यंत बरोमधील म्युनिसिपालिटीचे सभासद एकदां बनले म्हणजे हयातीपर्यंत त्या जागेवर रहात व आपल्या मागून येणाऱ्या लोकांचीही सामान्यतः तेच निवडणूक करीत. कॉमन्ससभेच्या निवडणुकीवर त्यांची हुकमत चाले व त्यांच्या सभा गुप्त असल्यामुळें लांचलुचपतीचा प्रकार सर्रास सुरू असे. १८३५ त म्युनिसिपल रिफॉर्म अॅक्ट पास करण्यांत आला. त्यांत म्युनिसिपालिटीचे कौन्सिलर निवडून देण्याचा हक्क कर भरणाऱ्या सर्व नागरिकांस देण्यांत आला व दर तीन वर्षांनीं नव्या कौन्सिलरांची निवडणूक व्हावी असे ठरलें. त्यामुळें या अॅक्टानें म्युनिसिपालिट्यांत मध्यम–वर्गाचे प्रतिनिधी येणें सुलभ होऊन परंपरेनें पार्लमेंट ज्यास्त लोकमतानिदर्शक झाली. १८३६ सालीं कॉमन्ससभेमध्यें कोणत्या सभासदानें कोणत्या बाजूला मत दिले या माहितीची याद सरकारी रीतीनें प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करण्यांत आली. त्या योगानें मतदारांना आपण निवडून दिलेला सभासद कसें वर्तन

ठेवितो हें कळण्याचें साधन झालें. १७७१ पासून पार्लमेंटमधील वाद-विवाद प्रसिद्ध करण्यास अडकाठी राहिली नव्हतीच. तथापि १८३७ पासून वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींना सभागृहांत हजर रहाण्याची चांगली सोय झाल्यामुळें राजकीय प्रश्न व सरकारचे हेतु आणि कृत्यें प्रसिद्ध होऊन जनतेला राजकीय शिक्षण निरायासानें मिळूं लागलें.

**५ गुलामांची मुक्तता**— भूतदयाप्रेरित होऊन गुलामांच्या मुक्ततेचा प्रश्न आतां पार्लमेंटनें हातीं घेतला. आफ्रिकेंतून निग्रो लोक पकडून त्यांना अमेरिकेंत नेऊन गुलाम म्हणून विकण्याचा धंदा कित्येक इंग्रज करीत. हा गुलामांच्या व्यापाराचा अमानुष प्रकार १८०७ सालच्या गुलामांच्या व्यापार-बंदीच्या कायद्यानें बंद झाला. तथापि अजून ब्रिटिश वसाहतींत, मळेवाल्यांकडून बडया शेतीवर गुलामांचा उपयोग राजरोसपणें करण्यांत येई. हा जनावरांप्रमाणें मनुष्यांचा उपयोग करून घेण्याचा अमानुष प्रकार बंद करण्यासाठीं झटणाऱ्या लोकांत वुइल्यम विल्बरफोर्स ( १७५९-१८३३ ) हा प्रमुख होता. त्यानें सर्व ब्रिटिश साम्राज्यांतून गुलामगिरी नाहींशी करण्याचें बिल पार्लमेंटपुढें आणिलें व पुष्कळ वादविवादानंतर तें पास झालें ( १८३३ आगष्ट ). या फरकानें एकदम उद्योगधंद्यांना धक्का बसूं नये यासाठीं त्या वेळीं असलेले गुलाम ५ पासून ७ वर्षेंपर्यंत 'मुक्त' समजण्यांत येऊं नयेत अशी सवलत ठेवण्यांत आली असून गुलामांच्या मालकांस त्यांच्या या कायद्यानें होणाऱ्या नुकसानाबद्दल मोबदला म्हणून दोन कोट पौंड सरकारनें देण्याचें ठरविलें. या मुक्तीच्या कायद्यानें वेस्ट इंडीज मधील साखर व कॉफी या दोन्ही धंद्यांस अत्यंत जबर धक्का बसला. मुक्त

---

१ ल्यूक हॅन्सार्ड ( १७ २-१८२८ ) हा छापखानेवाला १७९८ पासून पार्लमेंटमधील वादविवाद प्रसिद्ध करीत असे. पुढें १८८९ पर्यंत हॅन्सार्ड-कंपनीकडेच सरकारी रीत्या वादविवाद प्रसिद्ध करण्याचें काम होतें. त्यावरून पार्लमेंटच्या सरकारी अहवालांस ( Official Parliamentary Reports ) 'हॅन्सार्ड' हें नांव पडलें आहे.

निग्रो आळशी व अव्यवस्थित झाले व लागवडीचें काम ते नीट करीत ना. पुढें हिंदी व चिनी मजुरांची भरती करण्यांत आली; परंतु विशेष सवलत मिळालेल्या फ्रान्स व इतर युरोपियन देशांतील साखरेशीं टक्कर द्यावयाची असल्यामुळें 'वेस्ट इंडीज' मधील धंद्यांना केव्हांही पूर्वीची ऊर्जितावस्था आली नाहीं. गुन्हेगारीच्या कायद्यांतही पुष्कळ सुधारणा होऊन सुमारें १०० साध्या गुन्ह्यांस फांशीची शिक्षा होती ती रद्द करण्यांत आली; व १८४४ त तुरुंगाच्या सुधारणेस आरंभ होऊन केवळ शिक्षा देण्यासाठीं कैद्यास तुरुंगांत कोंबावयाचें हें क्रूर तत्त्व जाऊन त्याच्या जागीं कैद्याच्या अंगचे समाजास घातुक गुण जाऊन तो समाजास उपयोगी व्यक्ति कसा बनेल याचा विचार होऊन त्या दृष्टीनें तुरुंगांतील शिस्त ठरविण्याचा प्रचार सुरू झाला.

६ **शिक्षण**—याचप्रमाणें शिक्षणविषयक बाबतींतही सुधारणा करण्यांत आल्या. १८३३ पर्यंत इंग्लंडांतील प्राथमिक शिक्षण केवळ खाजगी शाळा, धर्म खात्यानें चालविलेल्या शाळा व उदार गृहस्थांच्या देणग्यांनीं चाललेल्या शाळा यांतून होत असे. पांच मुलांपैकीं चार मुलांस शिक्षणच मिळत नसे. खासगी प्राथमिक शाळांस मदत देण्यासाठीं १८३३ मध्यें पार्लमेंटनें २०००० पौंड मंजूर केले. पुढें १८३९ त प्रिव्ही कौन्सिलची शिक्षण–कमिटी नेमण्यांत येऊन तिच्या हातीं बरीच मोठी रक्कम देण्यांत आली. या कमिटीनें शाळांतील शिक्षण नीट चालावें म्हणून मदत घेणाऱ्या शाळांवर देखरेख ठेविण्यास तपासनीस नेमिले. त्याचप्रमाणें या वेळीं शिक्षक तयार करण्यास एक नमुनेदार 'ट्रेनिंग स्कूल' स्थापण्यांत आलें.

७ **गरिबांचा कायदा**—भिकाऱ्यांच्या कायद्यांतही महत्त्वाचे फरक करण्यांत आले ( १८३४ ). चालू पद्धत अशी होती कीं, गांवच्या अधिकाऱ्यांनीं गरीब कुटुंबांस मदत म्हणून थोडी रक्कम द्यावयाची. त्या कुटुंबांनीं स्वश्रमानें मिळविलेल्या पैशांत ही भर पडे. परंतु या पद्धतीनें शेतकरी लोक मजुरीचा दर अगदीं कमी करीत व मजुरास 'सार्वजनिक

दानधर्मांतून' आपल्या रोजमुऱ्यांत भर घालावी लागे. त्यामुळें सार्वजनिक दानधर्मांतून अतिशय खर्च होऊं लागला व आळसास उत्तेजन येऊन पुष्कळ धट्टे कट्टे लोक स्वाभिमानशून्य होऊन 'गरीब' म्हणून दानधर्मांतून मदत घेऊं लागले. एकंदर लोकसंख्येपैकीं एक सप्तमांश लोकांस ही मदत देण्यांत येत असून 'दानधर्माचा कर' अतिशय वाढला. १८३२ सालीं कराचा आंकडा ७० लक्ष पौंडांवर येऊन तो वसूल करणें दानधर्म-खात्यास अतिशय जड जाऊं लागलें. तेव्हां १८३४त यासंबंधीं नवा कायदा करण्यांत येऊन त्या अन्वयें कोणाही धष्टपुष्ट भिकाऱ्यास 'भिकारखान्या' बाहेर ( Workhouse ) मदत द्यावयाची नाहीं असें ठरविण्यांत आलें. आतांपर्यंत दर खेडेगांव स्वतंत्रपणें दानधर्माचा कर वसूल करी. यापुढें पुष्कळ गांवें मिळून संघ स्थापण्यांत आले, व संघानें दानधर्म-कर बसवावयाचा व एक भिकारखाना ठेवावयाचा असें ठरलें. त्यायोगें भिकारखाने कार्यक्षम व यशस्वी होऊन त्यांतून धष्टपुष्ट भिकाऱ्यांपासून काम करून घेण्याची व्यवस्था झाली. याचा सुपरिणाम होऊन मजुरीचे दर वाढले, धष्टपुष्ट लोकांत स्वकष्टानें उदर पोषण करण्याची प्रवृत्ति चालू झाली, दानधर्मावर खर्च कमी झाल्यामुळें दानधर्माकरितां कर ( Poor Rate ) खूप कमी झाला; शिवाय दानधर्माचा पैसा दीनदुबळ्यांवर खर्च करावयाचा, धट्टयाकट्टयांना मदत करण्याकरितां नाहीं, हें तत्त्व प्रस्थापित झालें.

---

## ५८ औद्योगिक प्रगति.



**१ व्हिक्टोरिया**—रिफॉर्म बिल पास होऊन सत्ताधारी व्हिग पक्षाच्या तंत्रानें नवे कायदे पास होऊं लागले व गुलामगिरीसारखे अनिष्ट प्रकार बंद झाले. हें चाललें होतें इतक्यांत १८३७ सालीं चौथा वुइल्यम वारला व त्याच्या गादीवर त्याची तरुण पुतणी व्हिक्टोरिया ही आली. हनोव्हरचा संस्थानिक पहिला जॉर्ज हा इंग्लंडचे गादीवर आला

तेव्हांपासून इंग्लंडचा राजा व हॅनोव्हरचा संस्थानिक हीं दोन्ही पदें एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं असत. परंतु हॅनोव्हरची गादी स्त्रीस मिळावयाची नाहीं असा तेथील कायद्याचा निर्बंध असल्यामुळें व्हिक्टोरिया एकट्या इंग्लंडच्या राज्याचीच मालक झाली; व तेव्हांपासून इंग्लंडच्या राजघराण्याचा हॅनोव्हरशीं असलेला प्रत्यक्ष संबंध तुटला आणि इंग्लंड व हॅनोव्हर यांसारखे अगदीं भिन्न असलेले देश एका गादीखालीं आणल्यामुळें राजकारणांत नेहमीं अडचणी उत्पन्न होत, त्यांस आतां अवसर राहिला नाहीं. व्हिक्टोरिया जात्या सुशील होती व तिच्या आईनें तिला चांगलें शिक्षण दिलें होतें. १८३७ सालीं ती गादीवर आली तेव्हां व्हिग पक्ष अधिकारारूढ असून मेलबोर्न हा मुख्य प्रधान होता (१८३५–१८४१). या नूतन राणीस राजकारणांत तरबेज करण्याची नाजूक कामगिरी त्याच्यावर पडली. राणीस त्याची शिस्त पसंत पडली, आणि तिची त्याच्यावर मर्जी बसली. १८३९ त व्हिग प्रधानमंडळाला कॉमन्समध्यें एकसारखा विरोध होऊं लागला; तेव्हां मेलबोर्ननें राजीनामा दिला. विरुद्ध पक्षाचा पुढारी पील हा आपल्या प्रधानमंडळाची उभारणी करूं लागला. त्यावेळीं त्यानें अशी अट घातली कीं, राणीच्या खाजगीकडील व्हिग स्त्रियांनीं आपल्या नवऱ्यांबरोबर आपल्या नोकऱ्या सोडल्या पाहिजेत ! यावर राणी क्षुब्ध झाली व तिनें आपल्या तैनातींतील स्त्रियांना नोकरीवरून काढण्याचें साफ नाकारलें. अर्थातच पील अधिकारारूढ झाला नाहीं व मेलबोर्नचें प्रधानमंडळ आणखी दोन वर्षें अधिकारारूढ राहिलें ! अशा रीतीनें अधिकारसूत्रें मेलबोर्नच्या हातीं ठेविल्याबद्दल कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षांतील टवाळ मंडळींनीं राणीवर तोंडसुख घेण्यास कमी केलें नाहीं. १८४० त सॅक्सकोबर्ग–गॉथा या जर्मन प्रांताच्या ड्यूकचा दुसरा मुलगा आल्बर्ट याशीं व्हिक्टोरियाचा विवाह झाला. हा मोठा धोरणी असून 'लोकप्रियता संपादन करण्यास इंग्लंडच्या राजपदारूढ व्यक्तीनें साधुवृत्तीनें वागून पक्षांध होता कामा नये' हें त्यानें ओळखिलें होतें, आणि प्रधानमंडळ व व्हिक्टोरिया यांच्यांत समेट घडवून आणण्यास त्याचा फार उपयोग होई. तो १८६१ त वारला. याच काळांत इंग्लंडची औद्योगिक

उन्नति जोरांत होत होती. ती व तिच्याशीं संबद्ध इतर गोष्टी यांचा आतां विचार करूं.

**२ औद्योगिक शोध**—अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत सूत काढण्याचीं व विणण्याचीं यंत्रें निघून स्टीम-एंजिनचाही ( बाष्प—यंत्र ) शोध लागला होता असें पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. त्याचप्रमाणें दगडी कोळशाच्या साहाय्यानें लोखंड ओतण्याची युक्तिही निघाली. या शोधांचा परिणाम असा झाला कीं, उत्तर इंग्लंडांत कापड तयार करण्याचे कारखाने भराभर निघाले व मध्य इंग्लंडांत लोखंड सांपडत असे, तेथें लोखंड ओतून त्याचा यत्नें करण्याकडे उपयोग होऊं लागला. तथापि एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं माल नेण्यास रस्ते चांगले नसल्यामुळें जिकीर पडे. ठिकठिकाणीं कालवे करण्यांत आले होते; तथापि त्यांचा प्रसार सर्व देशभर करणें अशक्य होतें. १८०२ ते १८२० पर्यंत टेलफर्ड व मॅक्ॲडम हे आपल्या सुधारलेल्या रस्त्यांचें जाळें पसरून देण्यांत गुंतले होते. परंतु डोंगराळ भागांत कालवे करण्यास भयंकर खर्च येई व रस्ते केले तरी अतिशय चढ-उतारांमुळें ते व्यवहारास फारसे उपयोगी नसत. याचा परिणाम असा झाला कीं, डोंगराळ भागांतील खनिज संपत्ति वाहतुकीच्या साधनांच्या अभावीं असून नसल्यासारखीच झाली. परंतु लवकरच बाष्प—यंत्राचा उपयोग वाहतुकीस करण्याचा शोध लागून या अडचणींतून मार्ग निघाला.

**३ बाष्प—वाहनांचा शोध**—न्यूकॅसल ऑन टाइन या गांवाजवळ बाष्प—यंत्राच्या आगवाल्याचें काम करणाऱ्या गृहस्थाचा जॉर्ज स्टीफन्सन ( १७८१—१८४८ ) नांवाचा मुलगा होता. त्याच्या झोपडीजवळून दगडी कोळशाच्या गाड्या लोखडी रुळाच्या रस्त्यावरून घोडे ओढीत. त्या गाड्यांखालीं आपल्या लहान भावंडांस सापडूं न देण्याचें काम लहानपणींच जॉर्जकडे आलें. पंधराव्या वर्षीं त्यास बाष्पयंत्रावर नोकरी लागली. तेथें असल्यापासूनच वाफेचा उपयोग पाणी उपसण्यास व कोळसा वर काढण्यास जसा करून घेतां येतो तसा तो

कोळशाच्या गाड्या लोखंडी रुळावरून चालविण्यास करतां येईल काय, हा प्रश्न त्याच्या डोक्यांत सारखा घोळत असे. १८१४ त त्यानें पहिला प्रयोग करून पाहिला; पण तो फसला. आपल्या यंत्रांतील पुष्कळच वाफ व्यर्थ जाते असें स्टीफन्सनला आढळून आलें. वाफेचा उपयोग पूर्णपणें करून घेतला तर आपलें यंत्र खास यशस्वी होईल असें स्टीफन्सनला वाटलें. मग त्यानें खाशी युक्ति योजिली. त्यानें आपल्या यंत्रांतील वाफेस सुटण्याचा मार्ग धुराच्या चिमणींतूनच ठेविला. त्यायोगें धूर भराभर जाऊं लागून भट्टीला जास्त हवा मिळूं लागली; भट्टी जोरांत चालू लागली व वाफ जास्त लवकर बनूं लागली, ही सुधारणा व आणखी कित्येक सुधारणा केल्यामुळें यंत्र यशस्वी होऊन आगगाडीचा शोध लागला. १८२५ त स्टॉक्टनपासून डार्लिंग्टनपर्यंतच्या लोखंडी रस्त्यावरून स्टीफन्सनच्या एंजिननें मालाचे अडतीस डबे ताशीं सहा मैल वेगानें ओढले. १८३० त मँचेस्टरपासून लिव्हरपूलपर्यंत लोखंडी रस्ते बांधण्यांत येऊन आगगाडीचा व्यवहार या दोन ठिकाणांमध्यें सुरू झाला. पहिल्यानें आगबोटी अमेरिकेंत निघाल्या; त्या फक्त नद्यांतूनच चालत ( १८०७ ). पहिल्यानें ॲटलँटिक महासागर आगबोटींनें आक्रमिला तो १८१९ सालीं होय. परंतु दगडी कोळसा ठेवितां यावा या दृष्टीनें बोटी बांधण्याचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविण्यास नौकाकारांस बरींच वर्षे लागलीं. वाष्प-शक्तीनें ॲटलँटिक महासागरावरून सुखानें प्रवास घडविणारी पहिली आगबोट १८३७ त झाली. पुढें थोड्याच काळानें, भाड्यानें इंग्लंड व अमेरिका यांजमध्यें प्रवास घडविणाऱ्या आगबोटींचा प्रचार सुरू झाला. त्याचप्रमाणें बातमी कळविण्याच्या कामीं विजेचा उपयोग याच वेळेपासून करण्यांत येऊं लागला. १८४६ सालीं 'इलेक्ट्रिक टेलिग्रॅफिक कंपनी' स्थापण्यांत आली. या सर्व शोधांमुळें केवळ इंग्लंडांतील नव्हे तर जगांतील निरनिराळ्या देशांमधील दळणवळण अत्यंत सुलभ होऊन उद्योगधंद्यांत विलक्षण क्रान्ति घडून आली.

**५ कारखान्यांची पद्धति**—उद्योगधंद्यांतील या सर्व शोधांमुळें देशांत उद्योग फार जोरानें सुरू झाले. उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर सुरू

झाल्यामुळें कारखान्यांची पद्धति चालू होऊन हजारों मजूर एकएका कारखान्यांत काम करीत आहेत अशी परिस्थिति निर्माण झाली. प्रथम प्रथम या कारखान्यांतून मजुरांना गुराप्रमाणें वागवीत. बायका व लहान मुलें यांचा भरणा कामकऱ्यांत विशेष होता. मजुरांना पोटभर अन्न व अंगभर वस्त्र कधींही मिळत नसे. बरेचसे मजूर 'भिकाऱ्यां'मधून गोळा करून आणलेले असल्यामुळें कारखानदाराच्या जागेंतच रहात. त्यांची रहाण्याची जागा गलिच्छ असे. एकदरीनें कारखान्यांतील व खाणींतील मजूर म्हणजे दारिद्र्य, रोग, गलिच्छपणा व व्यसनें यांचीं आगरें असत. परंतु या गोष्टीकडे लवकरच कित्येक उदारात्म्यांचें लक्ष जाऊन मजुरांची स्थिति सुधारण्यासाठीं कायदे झाले. १८०२ मध्यें कारखान्यांतील मजुरांचें आरोग्य व नीति सुधारण्यासाठीं पार्लमेंटनें कायदा केला. मध्यंतरीं नऊ वर्षांहून लहान मुलास कोणत्याही कारखान्यांत कामास लावावयाचें नाहीं असा कायदा होऊन १८३३ त बायका व अठरा वर्षांखालील पुरुष यांना रोज बारा तासांपेक्षां जास्त कामास लावावयाचें नाहीं, असा कायदा पास झाला. १८४७ त ही मर्यादा दहा तास झाली. कारखान्यांतील मजुरांस अनुकूल कायदे झाले, ते कित्येक उदारधी टोरी जमीनदारांच्या उद्योगाचें फळ होतें. अगदीं अलीकडे १९०८ त खाणीमधील मजुरांस आठ तासांवर काम करावयास लावावयाचें नाहीं असा कायदा पास झाला आहे. त्याचप्रमाणें आपला रोजमुरा वाढविण्यासाठीं, कामाचे तास कमी करण्यासाठीं किंवा काम करीत असतां पोहोंचत असलेले इतर उपसर्ग दूर करण्यासाठीं मजूर-संघ (Trade Unions) स्थापून आपली दाद लावून घेण्याचे मजुरांनीं प्रयत्न सुरू केले. १८०० त मजुरानें संघांत सामील होणें हा गुन्हा होय असा कायदा पास झाला होता. परंतु १८२५ त तो रद्द झाला. मग मजूर-संघ भराभर स्थापन होऊं लागले. तथापि १८७१ व १८७६ सालचे 'मजूर-संघाचे कायदे' पास होतपर्यंत या संघांस पूर्ण कायदेशीर स्वरूप प्राप्त झालें नाहीं.

५ **चार्टिस्टांची चळवळ**—१८३२ सालचें रिफॉर्म बिल पास झालें व त्यायोगें पार्लमेंटच्या निवडणुकींतील मतदारांची संख्या पुष्कळ

वाढविण्यांत आली. परंतु त्या बिलानें मजूर–वर्गास मत देण्याचा हक्क मुळींच मिळाला नाहीं, त्यामुळें तो वर्ग असंतुष्टच होता. १८३८ त सामान्य जनसमूहास राजकीय हक्कांची सनद (Charter) मिळविण्यासाठीं एक जंगी चळवळ सुरू करण्यांत आली. या चळवळ करणाऱ्यांच्या सहा मागण्या होत्या. ( १ ) पार्लमेंटच्या निवडणुकीकरितां देशाचे सम विभाग करावेत. ( २ ) पार्लमेंटचे सभासद होण्यास अमक्या एका रकमेहून जास्त त्या माणसाचें उत्पन्न पाहिजे अशी अट नसावी. ( ३ ) मत देण्याचा हक्क सर्व वयांत आलेल्या पुरुषांस असावा ( Manhood Suffrage ). (४) कॉमन्स सभेच्या सभासदांस वेतन मिळावें. (५) गुप्तपद्धतीनें ( Ballot, बॅलट ) निवडणूक व्हावी. ( ६ ) पार्लमेंटची निवडणूक दरसाल व्हावी. १८४० त ही चळवळ फारच जोरांत सुरू होती; पण पुढें मजूर–वर्गाची स्थिति सुधारल्यावर जरा थंड पडली. पण १८४८ त सर्व युरोपभर क्रांतिकारक चळवळींना जी उसळी आली होती त्यांत ही चळवळ फिरून सुरू झाली. फारच जंगी जाहीर सभा भरविण्यांत येऊं लागल्या व दहा लाख लोकांच्या सह्यांचा एक अर्ज तयार करून तो पार्लमेंटला सादर करण्याचें घाटत होतें. अशा तऱ्हेचा प्रयत्न म्हणजे कायदे करणाऱ्या सभेच्या हक्कावर गदा आणण्यासारखें आहे असा युक्तिवाद लढवून सरकारनें अर्ज सादर करण्याच्या समारंभास मनाई केली. शिवाय शांततेचा बिघाड होऊं नये म्हणून अडीच लक्ष जादा पोलिसांची व्यवस्था केली. परंतु चार्टिस्ट लोकांच्या कृतीनें लोकांत उत्साह उत्पन्न न होतां पार्लमेंट सभागृहापाशीं 'अर्जाचें धूड' घेऊन जेव्हां चार्टिस्ट पोंचले, तेव्हां बारा माणसें सुद्धां समारंभांत हजर नव्हतीं ! त्यांचीं मतें कांहीं दिवस केवळ कागदा-

---

१ कौंटींतील सभासदाची निदान सहाशें पौंड वार्षिक उत्पन्नाची जमीन असावी, व बरोंतील सभासदाची निदान तीनशें पौंड उत्पन्नाची मिळकत असावी असा निर्बंध १७११ सालच्या टोरी पार्लमेंटनें केला होता. तो केव्हांही नीटपणें अंमलांत आला नाहीं. १८५८ सालीं पार्लमेंटच्या कायद्यानें तो रद्द करण्यांत आला.

तच राहून १८४८ साल पूर्ण होण्याच्या अगोदरच ती चळवळ कोठल्या-कोठें विरून गेली. या काळांत मजुरांची स्थिति सुधारण्यासाठीं सरकारनें पुष्कळ कायदे केले होते; त्यामुळें मजूर-वर्गाची स्थिति पुष्कळ सुधारली, त्यांच्यांत शांतता नांदूं लागली व त्यांच्यांत क्षोभ उत्पन्न करूं पाहणाऱ्या क्रान्तिकारक पुढाऱ्यांस फारशें यश आलें नाहीं.

**६ धान्याचा कायदा**—मजूर-वर्गानें देशांत धान्य स्वस्त व्हावें यासाठीं केलेली चळवळ मात्र यशस्वी झाली. १८१५ त फ्रान्सशीं चाल-लेलें जंगी युद्ध संपल्यानंतर देशांत 'माणसांची गर्दी व कामाची वाण' या दुकलीचा प्रभाव सुरू झाला. युद्ध थांबतांच परदेशांतून धान्य येऊं लागल्या-मुळें धान्याचा भाव एकदम खूप उतरला. परंतु पार्लमेंटांत जमीनदारांचें चांगलें वजन असल्यामुळें त्यांनीं १८१५ त परकीय धान्यावर जबर जकात बसविण्याचा कायदा पास करून घेतला. या कायद्यानें गव्हाची किंमत एका क्वार्टरला ८० शिलिंग होईपर्यंत परदेशी गहू देशांत आयात होऊं द्यावयाचा नाहीं असें ठरविण्यांत आलें. या कायद्यानें धान्य फिरून महागल्यामुळें शेतकऱ्यांस तो फार आवडला. पण मजुरांस अधिक पगार द्यावा लागल्यामुळें कारखानदार लोकांस जांच होऊं लागला. १८३७ सालीं या कायद्याविरुद्ध कारखानदारांच्या पुढाऱ्यांनीं चळवळ सुरू केली. धान्याच्या कायद्याचा निषेध करणारी एक मंडळी (Anti Corn Law League) स्थापण्यांत आली. अर्थशास्त्रज्ञ क्यॅलिको प्रिंटर (चिटाचें कापड तयार करणारा) रिचर्ड कॉब्डेन हा मोठा कारखानदार व उदारात्मा जॉन ब्राइट हे या मंडळीचे नेते होते. ते दोघेही मोठे वक्ते असून त्यांनीं लव-करच आपली चळवळ नांवारूपास आणिली. धान्याच्या कायद्यानें होत असलेल्या अन्यायाचें वर्णन करणारीं हस्तपत्रकें वांटण्यांत आलीं. दरसाल या मंडळीच्या वतीनें धान्याचा कायदा रद्द करण्याविषयींचें बिल पार्ले-मेंटपुढें मांडण्यांत येई, परंतु दर वेळीं तें फेटाळून लावण्यांत येत असे.

**९ पीलचें प्रधानमंडळ (१८४१–४६)**—१८४१ मधील निवडणुकींत कॉन्झर्व्हेटिव्हांचें मताधिक्य झालें व लिबरल मेलबोर्नास

राजीनामा द्यावा लागून कॉन्झर्व्हेटिव्ह ( टोरी ) प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें व रॉबर्ट पील मुख्य प्रधान झाला. पील हा 'प्रगतिप्रिय' टोरी असून त्याचें राज्यकारभारांतील कौशल्य व आर्थिक व्यवस्थेंतील नैपुण्य हीं प्रख्यात होतीं. लवकरच पार्लमेंटमध्यें त्याची अशी छाप बसली कीं, धाकट्या पिटप्रमाणें त्याचें प्रधानमंडळ दीर्घकाळ टिकणार अशी पुष्कळांनीं अटकळ केली. पण तसा योग आला नाहीं. खुला व्यापार (Free Trade) व संरक्षण ( Protection ) या दोन्ही तत्त्वांचा अंगीकार अंशतः करण्याचें त्याचें धोरण होतें. परकीय मालावर जबर जकाती बसवून देशांतील मालास उत्तेजन द्यावयाचें हें संरक्षक तत्त्व होय; व व्यापारापासून सरकारला थोडा वसूल उत्पन्न व्हावा या उद्देशानें परदेशी मालावर हलकी जकात ठेवून त्याचा देशांत खुशाल वावर होऊं द्यावयाचा हें खुल्या व्यापाराचें तत्त्व होय. पीलनें धान्य, साखर व इमारतीचें लांकूड येवढ्या जिनसा सोडून बाकीच्या वस्तूंसंबंधीं खुल्या व्यापाराचें तत्त्वच आपणास कबूल असल्याचें जाहीर केलें. त्यानें बहुतेक सर्व पदार्थांवरील आयात–जकाती कमी केल्या. त्यामुळें येणारी उत्पन्नांतील तूट भरून काढण्यासाठीं पीलनें 'प्राप्तीवरील कर' ( Income-tax ) बसविला. तो बसवितांना पांच वर्षांनीं तो आपण रद्द करूं असें पीलनें वचन दिलें. परंतु ती मुदत भरण्यापूर्वीं पील अधिकार–भ्रष्ट झाला. त्याच्यामागून आलेल्या कोणत्याही प्रधानानें त्याच्या वचनाप्रमाणें कृति केली नाहीं व प्राप्तीवरील कर आजही कायम आहे !

८ **धान्याचा कायदा रद्द झाला**—अशा रीतीनें पील आर्थिक व्यवस्था लावीत असतां असा प्रसंग घडून आला कीं धान्याच्या बाबतींतही खुल्या व्यापाराचें धोरण स्वीकारणें त्याला भाग पडलें. १८४५ सालीं अतिवृष्टीमुळें देशांतील गव्हाचें पीक बुडालें ! आयर्लंडांत तर धान्य बुडालेंच; पण त्याबरोबर गरिबांच्या जीविताचें साधन जे बटाटे त्यांचेंही पीक पार बुडालें ! देशांत भयंकर दुष्काळ पडला व उपासमार होऊं लागली. सरकारनें दुष्काळ–कामें सुरू केलीं. पण परदेशांतून येणाऱ्या धान्यावरील जकात अगदीं कमी करून मुबलक परकीय धान्य देशांत

आणण्याचें श्रेय घेण्यास कांहीं सरकार तयार होईना. शेवटीं आयर्लंडां तील जनतेचे भयंकर हाल पाहून मात्र इंग्रज सरकारचे डोळे उघडले. लिबरल पुढारी लॉर्ड जॉन रसेल यानें आपलें मत धान्याच्या बाबतींत खुला व्यापार सुरू करावा असें झालें असल्याचें जाहीर केलें! पील यानेंही तसेंच केलें व धान्याच्या बाबींत संरक्षक तत्त्व पाळण्यास निवडणुकीच्या वेळीं तो बांधला असल्यामुळें त्यानें प्रधानगिरीचा राजीनामा दिला ( १८४५ डिसेंबर ). परंतु लिबरल पुढारी रसेल यास प्रधानमंडळ बनवितां न आल्यामुळें फिरून पीलच अधिकारारूढ झाला. वेलिंग्टन वगैरे लॉर्डांनीं लॉर्ड्‌ससभेंत विरोध न करितां धान्याचा कायदा रद्द होऊं दिला ( १८४६ मे ). पुढील तीन वर्षांत धान्यावरची जकात कमी करीत शेवटीं एका क्वॉर्टरवर एक शिलिंग इतकी कमी करावयाचें ठरलें. एकदम करण्यांत आलेल्या या फरकामुळें शेतकऱ्यांचें फारच नुकसान होईल अशी कित्येकांस भीति वाटत होती; परंतु कारखान्यांच्या वाढीमुळें शहरांतून दूध, मांस, गवत इत्यादि जिन्नसांची मागणी इतकी वाढली होती कीं, धान्यांतील तोटा या मालाच्या विक्रीनें सहज भरून आला. १८४९ त नौकानिर्बंधाचे कायदे रद्द करण्यांत येऊन वाटेल त्या देशांतील जहाजांस वाटेल त्या ब्रिटिश साम्राज्यांतील भागास जातां येऊं लागलें; व परदेशी मालावर वसुलाकरितां ठेविलेली हलकी जकात देऊन तो कोठेंही विकतां येऊं लागला. एव्हांपासूनच खुल्या व्यापाराचें धोरण बरेंचसें अमलांत आलें. पीलनें धान्याचा कायदा रद्द केला ही गोष्ट जमीनदारवर्गास रुचणें शक्य नव्हतें, व कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षांत त्या वर्गाची सरशी असल्यामुळें पीलच्या विरुद्ध त्या पक्षांत एकच गिल्ला झाला. डिझराइली व बेंटिंक या कॉन्झर्व्हेटिव्ह पुढाऱ्यांनीं पीलनें स्वपक्षाशीं विश्वासघात केला असा पुकारा केला. तेव्हां कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षांत फूट होऊन

१ १८४६ पासून १८७४ पर्यंत कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष तीन वेळां मिळून चार वर्षें अधिकारारूढ होता. त्यावेळीं सुद्धां कॉमन्समध्यें त्या पक्षाचें मताधिक्य नसे. व्हिग प्रधानांचें एकादें महत्त्वाचें बिल नापास झाल्यामुळें कॉन्झर्व्हेटिव्हांना औट घटकेची सत्ता प्राप्त होई.

पीलला राजीनामा देणें भाग पडलें व लिबरल लॉर्ड जॉन रसेल प्रधानगिरीवर आला ( १८४६ जून–१८५२ फेब्रुवारी ).

९ **इतर कायदे**—येथेंच इंग्लंडच्या औद्योगिक उन्नतीस पोषक अशा आणखी कांहीं गोष्टी झाल्या त्या सांगितल्या पाहिजेत. १८३९ त सर रोलंड हिल यानें पोस्टांत सुधारणा करून एक पेनीच्या तिकिटावर स्कॉटलंड व इंग्लंड या दोन्ही देशांत कोणत्याही स्थळीं पत्र पोंचविण्याची व्यवस्था केली. तोंपर्यंत एका पत्रास एका शिलिंगाइतका जबर स्टँप लावावा लागे; त्यामुळें गरिबांस पत्रें पाठविणें अशक्य होतें. यानंतर तारायंत्रांतून अल्प किंमतीस विद्युत्संदेश पाठविण्याची व्यवस्था होऊन पार्सलेंही स्वस्त दरानें पाठवितां येऊं लागलीं. याच सुमारास क्याले व डोव्हर यांचेमध्यें तार घालण्यांत आली ( १८५१ ). हीच समुद्रांतून विद्युत्संदेश पाठविण्याची पहिली व्यवस्था होय. १८५१ त सर्व जगांतील कलाकौशल्याचें प्रदर्शन लंडनांतील क्रिस्टल पॅलेसमध्यें भरविण्यांत येऊन आपल्या देशांत कोणता माल होतो व कोणता व्हावयास पाहिजे याची लोकांस माहिती करून देण्याच्या कामीं त्याचा मोठा उपयोग झाला. या प्रदर्शनावरून कित्येक फाजील आशावाद्यांनीं असा तर्क काढिला कीं, आतां राष्ट्रा–राष्ट्रांमध्यें पुरी शांतता नांदणार, युद्धासारखा रानटी प्रकार पार मागें पडणार व उद्योगधंद्यांत चढाओढा करून राष्ट्रें वर नंबर पटकाविण्याची हाव बाळगणार ! त्याच वर्षीं खिडक्यांवरील-अप्रत्यक्षपणें हवा व उजेड यांवरील–कर काढून टाकण्यांत आला व त्याच्या ऐवजीं घरावर कर बसविण्यांत आला. ॲनराणीच्या वेळेपासून वर्तमानपत्रांवर एक स्टँप टॅक्स म्हणून कर असे; १८३६ त तो उतरवून एक पेनी करण्यांत आला व १८५५ त तो अजीबात काढून टाकण्यांत आला; त्यामुळें वर्तमानपत्रें अधिक निघूं लागलीं व तीं स्वस्त झालीं. आतां मजूर–वर्गासही तीं विकत घेऊन जगांत आपल्या भोंवतीं काय चाललें आहे याचें ज्ञान करून घेतां येऊं लागलें.

---

# ५९ साम्राज्यान्तर्गत स्वराज्याचें दान.



## क्यानडा, ऑस्ट्रेलिया, न्यू झीलंड यांच्या हकीकती.

**१ क्यानडास स्वराज्य**—ब्रिटिश साम्राज्यांत क्यानडा, ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड या अत्यंत महत्त्वाच्या वसाहती ( Dominions ) होत. वसाहतींना जबाबदार राज्यपद्धति देण्याचें तत्त्व मुत्सद्यांनीं पाहल्यानें १८४० त अंमलांत आणिलें व स्वस्थ आणि समृद्ध क्यानडाचा उदय झाला. पुढें याच तत्त्वाचा इतर ठिकाणीं उपयोग करण्यांत येऊन स्वायत्त वसाहत–सरकारें निर्माण झालीं. या महत्त्वाच्या विषयाची माहिती आपण या प्रकरणांत करून घेऊं. क्यानडा हा देश अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या उत्तरेस आहे. १७६३ त सप्तवार्षिक युद्ध संपून इंग्रज–फ्रेंचांमध्यें जो तह झाला त्यानें क्यानडा इंग्रजांस मिळाला. पुढें अमेरिकेंतील इंग्रज वसाहतवाल्यांनीं बंड केलें व 'संयुक्त संस्थानें' स्वतंत्र झालीं. क्यानडांत क्वेबेकच्या आसपास फ्रेंचांची वस्ती होती. इंग्रज वसाहतींनीं जेव्हां बंड केलें तेव्हां त्यांतील कित्येक लोकांस इंग्लंडशीं भांडणें गैरशिस्त वाटलें व त्यांनीं आपलें बिऱ्हाड उचलून क्यानडांत जाऊन वसति केली. या लोकांपैकीं कांहीं सेंट लॉरेन्स नदीच्या मुखापाशीं नोव्हास्कोशिया व न्यू ब्रन्सविक येथें राहिले व कांहीं क्वेबेकच्या पश्चिमेस ओन्टारिओ येथें राहिले. पुढें क्वेबेकमधील फ्रेंच वसाहतवाले व ओन्टारिओंतील इंग्रज वसाहतवाले यांच्यामध्यें भांडणें होऊं लागलीं. शेवटीं ओन्टारिओला 'उत्तर क्यानडा' व क्वेबेकला दक्षिण क्यानडा अशीं नांवें ठेविण्यांत येऊन उत्तर क्यानडांत ब्रिटिश वस्ती असल्यामुळें इंग्लिश कायद्याप्रमाणें तेथील सर्व व्यवस्था चालावी व दक्षिण क्यानडांत फ्रेंच कायदा चालावा असें ठरलें ( १७९१ ). क्यानडाच्या पॅसिफिक किनाऱ्यालगत फार दूरवर ब्रिटिश कोलंबिया म्हणून एक वसाहत होती. बाकीचा विस्तृत प्रदेश अजून तसाच पडलेला होता. फ्रेंच वसाहती व इंग्रज वसाहती

यांच्या मधलीं भांडणें कांहीं पुरतीं मिटलीं नाहींत. १८३७ त तर दक्षिण क्यानडांतील फ्रेंचांनीं बंड उभारिलें! त्यांना संयुक्त संस्थानांतून पैशाची व दारुगोळ्याची मदत मिळाली. परंतु संयुक्त संस्थानांच्या अध्यक्षानें ब्रिटिश सरकारशीं तंटा करावयाचा नाहीं असा हुकूम काढिल्यामुळें अमेरिकनांची मदत चालू राहिली नाहीं. तेव्हां बंडावा लवकरच मोडिला. पण इकडे दुर्लक्ष केल्यास संयुक्त संस्थानें जशीं हातचीं गेलीं तसा क्यानडाही हातचा जाईल अशी इंग्रजांस भीति पडली. तेव्हां लॉर्ड डरहॅम यास क्यानडियन परिस्थितीची बारीक चौकशी करण्यासाठीं क्यानडांत पाठविण्यांत आलें. त्यानें तेथील वस्तुस्थितीचें निरीक्षण करून जबाबदार राज्यपद्धति ( Re-ponsible Government ) सुरू करावी असा अभिप्राय दिला. दक्षिण व उत्तर क्यानडा एक करण्यांत येऊन दोन्ही लोकांचें एक पार्लमेंट बनवावें, परराष्ट्राशीं सर्व व्यवहार इंग्लंडच्या हातीं ठेवून, सर्व अंतर्गत सत्ता त्या पार्लमेंटच्या हातीं देऊन टाकण्यांत यावी, व ब्रिटिश सरकारनें नेमिलेल्या गव्हर्नरनें पार्लमेंटांतील लोकप्रतिनिधींच्या विश्वासांतील गृहस्थाची मंत्र्याच्या जागीं नेमणूक करावी, अशा त्याच्या सूचना होत्या. त्या ब्रिटिश सरकारास पटून १८४० त पहिली लोकसत्तेचा सुखमय उपभोग घेणारी वसाहत निर्माण झाली. पुढें क्यानडांतील इतर भागांसही अशीच पार्लमेंट देण्यांत येऊन कार्यमंत्री लोकप्रतिनिधींस जबाबदार रहातील अशी व्यवस्था करण्यांत आली व अशा रीतीनें निरनिराळ्या भागांत खरीखुरी लोकसत्ता सुरू झाली.

**२ क्यानडा एकराष्ट्र बनला**—क्यानडांतील निरनिराळ्या प्रांतांस स्वराज्य मिळून राज्यकारभाराची जबाबदारी जसजशी त्यांजवर पडूं लागली तसतशी आपल्या सर्व प्रांतांची एक जूट करून सगळ्या क्यानडाचें एकराष्ट्र करावें ही इच्छा त्यांच्या ठिकाणीं प्रबळ होऊं लागली. यास कारणें तीन होतीं. एक तर इंग्रज व फ्रेंच वसाहतवाले यांचीं भांडणें पार्लमेंटांतही चालून राज्यकारभार चालणें जवळ जवळ अशक्य झालें; तेव्हां या लोकांपुढें उच्च ध्येय ठेविलें नाहीं तर हे असेच भांडत बसतील असें पुष्कळ विचारी मुत्सद्यांस वाटूं लागलें. दुसरें असें कीं, संयुक्त

संस्थानांत १८६१ सालीं उत्तर व दक्षिण असे तट होऊन गुलामगिरीच्या प्रश्नावरून युद्ध झालें. तेव्हां हें युद्ध संपल्यावर अमेरिकनांनीं आपल्यावर स्वारी केल्यास आपल्या बाजूला एकीकृत बल नाहीं याची क्यानडांतील लोकांस जाणीव उत्पन्न झाली व एकराष्ट्र करण्याच्या भावनेस जास्त जोर आला. तिसरें असें कीं, क्यानडांतील ॲटलँटिक महासागराच्या लग-तचा पूर्व प्रदेश व पॅसिफिक किनाऱ्यावरील पश्चिम प्रदेश यांजमध्यें जी विस्तृत मध्य क्यानडाची पट्टी पसरलेली आहे ती या वेळीं 'हडसन बे' कंपनीच्या मालकीची होती व तिचा मेंढ्यांस कुरण या नात्यानें फार उप-योग होत असे. क्यानडांतील लोकांस अशी भीति वाटूं लागली कीं, ही पट्टी जर एकाद्या परराष्ट्रानें उपटली व परकीय लोक तेथें वसती करूं लागले तर आम्हांला नवेच शत्रु उत्पन्न होणार तेव्हां क्यानडांतील बहु-तेक सर्व प्रांतांस ही एकराष्ट्रीयत्वाची कल्पना पटली; व त्यांच्या मागणीवरून १८६७ त ब्रिटिश पार्लमेंटनें 'नॉर्थ अमेरिका ॲक्ट' हा कायदा पास केला. या कायद्यानें जुनी क्यानडाची वसाहत ( क्वेबेक व ओन्टारिओ ), नोव्हास्कोशिया व न्यू ब्रन्सविक हीं तिन्हीं राज्यें मिळून क्यानडाचें एक मध्यवर्ती सरकार बनविण्यांत आलें. या नव्या सरकारानें तीन वर्षांनीं हडसन बे कंपनीपासून मध्यपट्टी विकत घेतली. त्यांतून पुढें मानिटोबा, सॅस्कचिव्हान, आल्बर्टा असे तीन प्रांत करण्यांत आले. १८७१ सालीं पॅसिफिक किनाऱ्यावरची ब्रिटिश कोलंबिया ही वसाहतही या नव्या राष्ट्रांत सामील झाली. अशा तऱ्हेनें १८७२ त ॲटलँटिक महासागरापासून पॅसिफिक महासागरापर्यंत पसरलेला व बड्या सरोवरा-पासून जवळ जवळ उत्तर ध्रुवापर्यंत उत्तर दक्षिण पसरलेला विस्तीर्ण क्यानडा हा एक उत्कृष्ट राष्ट्र ( Dominion of Canada ) बनून ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत स्वराज्यसुख अनुभवूं लागला. राजानें नेमिलेला गव्हर्नर जनरल हा या क्यानडांतील मध्यवर्ती सरकारचा मुख्य असून क्यानडांतील सर्व संस्थानांतून निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या पार्लमेंटच्या तंत्रानें तो राज्यकारभार हांकतो.

३ **क्यानडाची प्रगति**—१८८५ त पॅसिफिक किनाऱ्यापासून

अॅटलँटिक किनाऱ्यापर्यंत आगगाडीचा रस्ता बांधण्यांत येऊन दळणवळण सुरू झालें. पहिल्यानें क्यानडांत फारसे लोक वसाहत करण्यास जात नसत; परंतु लौकरच क्यानडांतील मध्यभागांत गहूं चांगला पिकतो असें आढळून आलें. तेव्हां मात्र इंग्लंडांतून, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतून व युरोपांतून वसाहतवाल्यांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. तेव्हांपासून क्यानडाची लोकसंख्या झपाझप वाढत आहे व क्यानडाचें दौर्बल्य जाऊन तें चांगलें सबळ राष्ट्र बनलें आहे. क्यानडाचे सरकारनें इंग्लंडच्या मालास जास्त सवलत देण्याचा कायदा १८९७ सालीं केला. त्याचप्रमाणें साम्राज्याचें संरक्षण करण्यासाठीं ब्रिटनला जें बडें आरमार ठेवावें लागतें त्यास मदत म्हणून स्वतःच्या देशाच्या किनाऱ्याचें संरक्षण करण्यासाठीं १९०९ सालीं कांहीं लढाऊ जहाजें बांधण्याचाही क्यानडानें ठराव केला.

४ **ऑस्ट्रेलिया**—इ. स. १६२० च्या सुमारास टॅलिस्मन नांवाचा डच खलाशी न्यू झीलंड बेटावर जाऊन आला. त्याचप्रमाणें १६६८ त डॅम्पियर हा इंग्रज खलाशी ऑस्ट्रेलियाच्या पश्चिम किनाऱ्याजवळून गेला. परंतु तो किनारा त्याला इतका निर्जन वाटला कीं सुपीक ईस्ट इंडीज बेटाकडे तो निघून गेला. १७६८ च्या सुमारास क्यॅप्टन कुक नांवाचा धाडसी जलपर्यटण करणारा इंग्रज गृहस्थ दक्षिण समुद्रांत सफरीस गेला. त्यानें न्यू झीलंड या बेटाचे दोन स्वतंत्र भाग असल्याचा शोध लाविला व ऑस्ट्रेलियाच्या पूर्व किनाऱ्यावर जाऊन तेथें इंग्रजी राज्याचें निशाण त्यानें उभारिलें. इतक्यांत इंग्लंडच्या हातून अमेरिका गेली व इंग्रज सरकारास एक नवीनच अडचण उपस्थित झाली. आतांपर्यंत गुन्हेगार व आडदांड लोकांस अमेरिकेंत हद्दपार करण्यांत येत असे. तो मार्ग आतां बंद झाला. पण याचवेळीं ऑस्ट्रेलिया सांपडल्यामुळें सरकारनें गुन्हेगार व बंडखोर यांची ऑस्ट्रेलियांत रवानगी करण्याचें ठरविलें! या बेतास अनुसरून १७८७ सालीं १०३० बंडखोरांची टोळी ऑस्ट्रेलियाच्या पूर्व किनाऱ्यावर हल्लींच्या सिड्नी गांवाजवळ जाऊन उतरली व तेथील वसाहतीचा अशा चमत्कारिक रीतीनें श्रीगणेशायनमः झाला. पुढें आयर्लंड व स्कॉटलंड या देशांतून पुष्कळ

नीतिमान् व उद्योगी गृहस्थ ऑस्ट्रेलियांत वसाहत करण्यास गेले; व त्यांना त्या देशांत हद्दपारीची शिक्षा झालेले गुन्हेगार पाठविले जाणें आवडलें नाहीं. १८३५ त ऑस्ट्रेलियांतील गोऱ्या लोकांची वस्ती ८०००० वर गेली; व न्यू साउथ वेल्स प्रांतांतील लोकांनीं बंडखोरांची रवानगी ऑस्ट्रेलियांत न करण्याबद्दल ब्रिटिश सरकारास विनंति केली. त्यावरून न्यू साउथ वेल्सला गुन्हेगार पाठविण्याचें थांबलें; तथापि पश्चिम ऑस्ट्रेलिया व टास्मेनिया या प्रांतांत मात्र ते पाठविण्यांत येत होते. परंतु १८५१ सालीं ऑस्ट्रेलियांत सोन्याच्या खाणी सांपडल्या; त्यामुळें बुभुक्षित गोऱ्या लोकांच्या टोळयाच्या टोळया त्या देशांत गेल्या व अवघ्या दोन वर्षांत लोकसंख्या दुप्पट झाली ! तेव्हांपासून मात्र ऑस्ट्रेलियांत गुन्हेगार पाठविणें बंद करावें लागलें. परंतु थोडयाच वर्षांनीं फौजदारी कायद्यांत सुधारणा होऊन हद्दपारीची शिक्षाच बहुतेक बंद करण्यांत आल्यामुळें गुन्हेगार पाठविण्याचा प्रश्नच राहिला नाहीं (१८५७).

**५ क्वीन्सलँड व मध्यभाग**— ऑस्ट्रेलियांत आतांपर्यंत ज्या वसाहती झाल्या त्या सर्व दक्षिण व पूर्व इकडेच किनाऱ्यालगत झाल्या. अजून देशाचा मध्यभाग व उत्तरभाग हे वसाहतींवांचूनच होते. एकतर उत्तरेकडील हवा उष्ण असून मध्यभागीं निर्जल प्रदेश आहे अशी समजूत होती व दक्षिणेकडे थंड हवा व प्रकृतीस मानवणारी परिस्थिति असल्यामुळें लोक तिकडेच राहिले. परंतु या खालच्या जागा भरून गेल्यावर जे वसाहतवाले आले ते वरवर जाऊं लागले व शेवटीं उत्तरेकडचा भाग वसला जाऊन क्वीन्सलँड ही उत्तरेकडची वसाहत बनविण्यांत आली ( १८५४ ). त्याचप्रमाणें मध्यदेशाचा शोध करण्यासाठीं निरनिराळे साहसी प्रवासी झटूं लागले. रॉबर्ट बर्क व वुइल्यम जॉन विल्स यांच्या नेतृत्वाखालीं प्रवाशांची पहिली टोळी देशाचा मध्यभाग शोधण्यास गेली. यानंतर एकामागून एक अशी एकसारखी मंडळी जात होती. शेवटीं सर्व ऑस्ट्रेलियाचा शोध १८६० चे सुमारास लागला. लोकांची मध्यभाग निर्जल असल्याबद्दलची समजूत चुकीची ठरून जरा खोल विहिरी खणल्यास मुबलक पाण्याचे झरे लागतात असें आढळून आलें.

६ **स्वराज्यदान**—१८५६ सालीं न्यू साउथ वेल्स, व्हिक्टोरिया, साउथ ऑस्ट्रेलिया व टास्मेनिया या सर्वांना सनदशीर राज्यपद्धतीचा हक्क मिळाला. १८५९ त क्वीन्सलँड ही निराळी वसाहत समजण्यांत येऊन ब्रिटिश पार्लमेंटनें तिलाही एक पार्लमेंट दिलें. पुढें वेस्टर्न ऑस्ट्रेलियांत वसाहती होऊन १८९० त त्याही संस्थानांस स्वराज्य देण्यांत आलें. त्यानंतर ऑस्ट्रेलियांतील निरनिराळ्या वसाहतींना आपलें खात्रीपूर्वक संरक्षण व्हावें व आपल्या देशाची प्रगति व्हावी यासाठीं सर्व वसाहतींचें एकच राष्ट्र करून टाकावें असें वाटूं लागलें. याच सुमारास फ्रान्स व जर्मनी यांनीं ऑस्ट्रेलियाच्या नजीक कित्येक बेटें काबीज केलीं. तेव्हां तेथून हे लोक आपल्या देशावर स्वारी करितील अशी ऑस्ट्रेलियांतील इंग्लिश वसाहतींस भीति पडली व एक-राष्ट्रीयत्वाच्या भावनेस जोर येऊन ऑस्ट्रेलियांतील सर्व वसाहतींचें मिळून एक वरिष्ठ सरकार बनविण्याची योजना तयार झाली. ऑस्ट्रेलियन लोकांचें म्हणणें इंग्रजांस पटून उपरिनिर्दिष्ट सर्व वसाहतींचा एक संघ बनविण्यांत येऊन त्यांना एक पार्लमेंट देण्यांत आलें ( १९०१ ). चीन व जपान ही आशियाटिक राष्ट्रें उदयास येत आहेत व संनिध असल्यामुळें त्यांना ऑस्ट्रेलियांत वसाहती करण्याचा मोह होईल व अशा रीतीनें गोऱ्या लोकांहून इतर वर्णांचें बीज ऑस्ट्रेलियांत पेरलें जाईल या भावी संकटाची अगोदरच तजवीज करण्यासाठीं आशियाटिक मनुष्यास ऑस्ट्रेलियांत वसाहत करूं न देण्याचा निर्बंध करणारा कायदा ऑस्ट्रेलियनांनीं केला व ऑस्ट्रेलियांत गोऱ्यांचा सवता सुभा निर्माण केला ! क्यानडाप्रमाणें येथील सरकारानेंही आपल्या किनाऱ्याच्या संरक्षणार्थ आरमार निर्माण केलें असून शिवाय देशांतील प्रत्येक तरुणानें कांहीं काळपर्यंत लष्करी शिक्षण घेतलेंच पाहिजे असा जर्मन लोकांप्रमाणें निर्बंध केला आहे ! ऑस्ट्रेलियांतून पहिल्यानें खनिज द्रव्याबरोबर केवळ लोकरच निर्गत होई. मार्गांतील उष्ण हवेनें मांस व दूध-दुभत्याचे पदार्थ नासून जाण्याची भीति असे. परंतु अलीकडे बर्फाच्या थंड आवरणांतून हे पदार्थ बांधून

पाठविण्याची व्यवस्था झाल्यामुळें यांचीही बरीच निर्गत युरोपांत हल्लीं होऊं लागली आहे.

**७ न्यू झीलंड**—क्यॅप्टन कुक ऑस्ट्रेलियाच्या किनाऱ्यावर गेला होता त्यावेळीं न्यू झीलंड या देशांतही तो गेल्याचें मागें सांगितलेंच आहे ( १७६८ ). हें बेट ऑस्ट्रेलियाच्या आग्नेयीस असून सुमारें ग्रेट ब्रिटन-येवढेंच आहे. १८३० पर्यंत न्यू झीलंडवर इंग्रजांची कायमची वसाहत अशी झाली नाहीं. पहिल्यानें इंग्रजांच्या वसाहती उत्तर भागांत झाल्या. परंतु १८३९ च्या सुमारास फ्रेंच लोकांचें एक जहाज दक्षिण भागाकडे जातांना दिसलें. फ्रेंचांचा उद्देश दक्षिण बेट आपल्या ताब्यांत घेऊन तेथें फ्रेंच राज्य स्थापण्याचा होता. हें उत्तरेकडील इंग्रज वसाहतवाल्यांस कळतांच त्यांनीं दक्षिण बेटावर एक स्वारी केली व तें आपल्या ताब्यांत घेतलें. फ्रेंचांस फाजील उशीर झाल्यामुळें तसेंच चुरमुरे खात घरीं परतावें लागलें. न्यू झीलंडला १८५३ सालीं पार्लमेंट मिळालें. न्यू झीलंड-मधील मूळ रहिवाशी रानटी असून त्यांचें नांव माओरी आहे. त्यांच्याशीं इंग्रजांस बरेंच झगडावें लागलें. १९११ सालीं माओरी लोकांनाही न्यू झीलंडच्या पार्लमेंटमध्यें ५।६ सभासद निवडून देण्याचा हक्क मिळाला आहे. हल्लीं न्यू झीलंडची गोरी वस्ती सुमारें १० लाख असून तेथून बर्फानें थंड केलेलें मांस, लोणी व चीज हे पदार्थ इंग्लंडला जातात. त्याचप्रमाणें सोनेंही निर्गत होतें. न्यू झीलंडचाही आत्मसंरक्षण करण्याचा प्रयत्न ऑस्ट्रेलियाप्रमाणेंच जोराचा चालू आहे. या वसाहतीची साम्राज्य-निष्ठा विलक्षण असून प्रसंग पडल्यास दोन बेडर जहाजें आपल्या खर्चानें ब्रिटिश आरमारास देण्याचा त्या वसाहतीनें ठराव केला आहे (१९०९).

---

# ६० रशियाशीं विरोध.



## क्रिमियन युद्ध.

१ **अफगाण युद्ध**—नेपोलियनचा पाडाव झाल्यानंतर ऑस्ट्रिया, प्रशिया व रशिया हीं राष्ट्रें एकोप्यानें वागत. लवकरच तीं बलाढ्य झालीं. त्यांतल्यात्यांत रशियानें मध्य आशियांत मुलूख मिळवून आपल्या देशाच्या मर्यादा वाढविल्या; व अफगाणिस्थानच्या गादीवर दोस्त महम्मद होता, त्याशीं रशियानें तहाचीं बोलणीं सुरू केलीं ( १८३७ ). तेव्हां रशियाची हिंदुस्थानवर स्वारी होणार, त्यावेळीं अफगाणिस्थान आपल्या बाजूचें राखणें जरूर असें वाटल्यामुळें गव्हर्नर जनरल ऑकलंड यानें शहासुजा नांवाच्या अफगाण राजकुलांतील पळून आलेल्या गृहस्थास अफगाणिस्थानच्या गादीवर बसविण्याचें ठरविलें. इकडे दोस्त महंमदानें रशियाशीं तह केला. त्याचप्रमाणें तुर्कस्थानचा मांडलिक इजिप्तचा सुलतान हा दंगा करीत होता; त्याच्यापासून तुर्कस्थानच्या सुलतानाचें रक्षण करण्याचें अभिवचन रशियानें तुर्कस्थानास दिलें. त्यावरून रशिया हिंदुस्थानावर चालून येणार व तुर्कस्थानांतही गडबड सुरू करणार अशी इंग्रजांस भीति पडली. तुर्कस्थानची स्वतंत्रता मान्य असल्याबद्दल ग्वाही देण्याचें सर्व प्रमुख राष्ट्रांपासून इंग्लिश परराष्ट्रीय प्रधान पामर्स्टन यानें कबूल करून घेतलें; व हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल ऑकलंड यानें अफगाणिस्थानांत सैन्य पाठवून इंग्रजांस अनुकूळ असलेल्या शहासुजास काबुलांत नेऊन गादीवर बसविलें ( १८३९ ). हें काम झाल्यावर मुख्य इंग्रज सैन्य परत गेलें. १८४२ त पदच्युत केलेल्या दोस्त महंमदाचा मुलगा अकबर यानें काबुलांत दंगा आरंभिला व तेथें राहिलेल्या इंग्रजांच्या सैन्यास हिंदुस्थानांत परत जाण्याचें कबूल करावयास लाविलें ! परत जात असतां अफगाणिस्थानच्या सरहद्दीवरील खिंडींत गाठून अफगाण लोकांनीं निर्दयपणें इंग्लिश सैन्याची कत्तल केली! सर्व लोक कापले

जाऊन फक्त डॉक्टर ब्रायडन नांवाचा एक इसम जिवंत परत आला! या दुष्कृत्याचा सूड उगविण्यासाठीं १८४३ त एक सैन्य अफगाणिस्थानांत पाठविण्यांत आलें. त्यांनें काबूलमधील बाजारपेठ उध्वस्त केली, मागील स्वारींतील बायकामुलें वांचविलीं व इतकी कामगिरी करून तें परत हिंदुस्थानांत आलें. अशा रीतीनें आपल्याला अनुकूळ अमीर अफगाणिस्थानच्या गादीवर बसविण्याचा इंग्रजांचा प्रयत्न बहुतेक फसला.

**२ क्रिमियन युद्धाचीं कारणें**—१८४१त 'तुर्कस्थान स्वतंत्र आहे' असें जाहीर करून इंग्लंडनें रशियास तंबी पोंचविली; तेव्हांपासून रशियानें आपलें सैन्य व आरमार समर्थ करण्याचा धडाका सुरू केला. विशेषतः काळ्या समुद्रांतील सैन्य व आरमार जय्यत करण्याची रशियानें गर्दी चालविली. खिस्ती लोकांत लॅटिन चर्च व ग्रीक चर्च असे दोन पंथ आहेत. इंग्लंड व पश्चिम युरोपांतील राष्ट्रें लॅटिन चर्चचीं असून रशिया व इतर पूर्व युरोपांतील राष्ट्रें ग्रीक चर्चचीं आहेत. या दोन पक्षांत जरुसलेममधील देवळांबद्दल तंटा पडला होता. जरुसलेम तुर्कस्थानच्या मुलुखांत असल्यामुळें त्याचा निकाल करण्याचें काम तुर्कस्थानच्या सुलतानाकडे होतें. त्यानें इस्तंबूलमधील ( कॉन्स्टॅन्टिनोपल ) इंग्रज व फ्रेंच वकील यांच्या सांगण्यावरून ग्रीक चर्चच्या विरुद्ध निकाल दिला. त्या निकालाची सबब दाखवून रशियन झारनें असें जाहीर केलें कीं, तुर्की साम्राज्यांतील ग्रीक खिस्त्यांचें संरक्षण करण्याचा हक्क आपणास आहे. हें कारण केवळ वरकरणी होतें. रशियाच्या अंतर्यामीं कांहीं निराळेच दुष्ट हेतु जागृत होते. ब्रिटिश वकिलापाशीं आपलें मन खुलें करून "तुर्कस्थान हें राष्ट्र मृत्युपंथास लागलेलें आहे तेव्हां त्याचें बरेंवाईट झाल्यास 'लूट' वांटून कशी घ्यावी हें ठरविण्याचाच माझा मुख्य हेतु आहे" असें झारनें बोलून दाखविलें! पण ही 'लूट' मिळविणें इंग्रजांच्या पथ्यावर नसल्यामुळें इंग्रज कबूल झाले नाहींत व रशियानें एकट्यानेंच तुर्कस्थानचा समाचार घेण्याचें ठरविलें. १८५३ च्या जुलैंत युद्ध सुरू होऊन रशियानें तुर्कांच्या वॉलेशिया प्रांतावर स्वारी केली; व रशियन आरमारानें सिनोप बंदरांत तुर्की जहाजांच्या काफिल्याचा नाश केला.

**३ युद्धास सुरवात**—हें रशियानें सुरू केलेलें युद्ध पाहून इंग्लंडांतील लोकमत फारच क्षुब्ध झालें. रशिया तुर्कस्थानची राजधानी इस्तंबूल ( कॉन्स्टॅन्टिनोपल ) घेणार व रशियन आरमार भूमध्य समुद्रांतही नाचूं लागणार व मग हिंदुस्थानशीं आपला व्यापार कसा चालणार किंबहुना त्या देशाचीं राज्यसूत्रें तरी आपण कशीं हांकणार इत्यादि जिव्हाळ्याचे प्रश्न इंग्रज लोकांच्या कल्पनेपुढें येऊन रशियाची तुर्कस्थानावर सरशी म्हणजे इंग्लंडचें जवळजवळ मरणच आहे असें इंग्रजांस वाटूं लागलें ! मग काय विचारितां ? रशियन आरमार भूमध्य समुद्रांत संचार करून आज काय घे जिब्रॉल्टर उद्यां काय कर एशिया मायनर, ग्रीस, इटली व फ्रान्स यांच्या किनाऱ्यांवर स्वारी, अशा तऱ्हेनें कसा धुमाकूळ मांडणार व जर सर्व राष्ट्रांनीं मिळून त्याचा नाश करावयाचा प्रयत्न केला तर डार्डानेल्ज व बास्फोरस या दोन अरुंद तोंडांना कुलपें ठोकून काळ्या समुद्रांत कसें सुरक्षित जाऊन बसणार, याचीं कल्पनाचित्रें सर्व इंग्लंडभर निघूं लागलीं. या वेळीं लॉर्ड ॲबर्डीन हा मुख्य प्रधान होता ( १८५२ डिसेंबर–१८५५ जानेवारी ). तो पीलच्या अनुयायांपैकीं असून त्यांनीं १८४६ त टोरी पक्षांतून फुटून व्हिगपक्षाशीं सख्य केलें होतें. तो शांततावादी असल्यामुळें जोरदार परराष्ट्रीय धोरण स्वीकारण्याची त्याची इच्छा नव्हती. परंतु पामर्स्टन हा जोमदार परराष्ट्रीय मंत्री युद्धास उत्सुक होता. तेव्हां त्याच्या व इंग्रज व्यापाऱ्यांच्या मतापुढें शेवटीं त्याला हात टेंकावे लागले. १८५४ मार्च २८ ला इंग्लंड व फ्रान्स या दोन राष्ट्रांनीं तुर्कांचें रशियाच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेपासून संरक्षण करण्यांत आपलें हित आहे हें ओळखून रशियाशीं युद्ध जाहीर केलें.

**४ तीन लढाया**—डॅन्यूब नदीच्या तीरीं रशियन सैन्यास तुर्कांनीं मोठ्या शौर्यानें अडवून धरल्यामुळें इस्तंबूलचें रक्षण करण्याची जरूर नाहीं असें पाहून क्रिमिया या द्वीपकल्पांत उतरून सिबॅस्टॉपल बंदरांत जो दारूगोळा रशियानें जमवून ठेविला होता त्याचा नाश करण्याकरितां इंग्लिश व फ्रेंच सैन्य क्रिमियांत जाऊन उतरलें. सैन्य उतरलें

तें ठिकाण सिबॅस्टॉपलच्या उत्तरेस वीस मैलांवर होतें. तेथें उतरून सैन्य सिबॅस्टॉपल किल्याकडे चाललें तेव्हां वाटेंत आल्मा नदीवर लढाई झाली ( १७५४ सप्तेंबर ). तेथें रशियनांचा पराभव होऊन ते सिबॅ-स्टॉपलपर्यंत मागें हटले. तेव्हां संयुक्तही सिबॅस्टॉपलनजीक चालून गेले व त्यांनीं किल्ल्याला वेढा दिला. इंग्रजांनीं दक्षिणेस बॅलॅक्लाव्हा या बंदरीं आपलें मुख्य ठाणें दिलें होतें. इंग्रजांच्या बॅलॅक्लाव्हा या ठाण्यावर रशियनांनीं १८५४ च्या आक्टोबरांत हल्ला केला पण तो ताबडतोब परतविण्यांत आला. या हल्ल्याच्या वेळीं जी लढाई झाली ती चिर-स्मरणीय राहील ! हल्ला चालू असतां इंग्रजांकडील सहाशें स्वारांच्या पथकास लढाईच्या तयारीनें उभ्या असलेल्या शत्रूच्या तोफखान्यावर हल्ला चढविण्याचा चुकीनें हुकूम सोडण्यांत आला ! तसा हल्ला करणें म्हणजे मृत्युमुखांत उडी घेण्यासारखें होतें. तथापि त्या पराक्रमी वीरांनीं आज्ञा प्रमाण मानून हल्ला चढविला व बहुतेक सर्व लोक मृत्युमुखीं पडले ! नोव्हेंबर महिन्यांत धुकें पडत होतें; त्याचा फायदा घेऊन राशियन लोकांनीं इन्कर्मनच्या उतारावरील इंग्रज सैन्यावर अचानक हल्ला केला. पण इंग्रज जोरानें लढले व लवकरच फ्रेंचांची मदत पोंचून रशियनांचा मोड झाला.

५ **सैन्यावरील संकटें व तह**—१८५४ च्या शेवटीं थंडी पडूं लागली तेव्हां इंग्रज सैन्याची फारच त्रेधा उडाली. बरेच दिवस शांततेंत गेल्यामुळें सैन्यव्यवस्था चांगली नव्हती. सैन्यांतील कामगार दुर्बळ असून सैनिक जरी शूर होते तरी त्यांची शिस्त बिघडली होती व सैन्याला लागणाऱ्या सामानाचा पुरवठा करणाऱ्या खात्याची व्यवस्था नीट नसून हॉस्पिटलांची स्थिति बरी नसे. या सर्व कारणांमुळें हजारों शिपायी थंडी व कॉलरा यांस बळी पडले. या कहराचें खापर ॲबर्डीन या मुख्य प्रधानावर फोडण्यांत येऊन लवकरच त्यास राजीनामा देणें भाग पडलें व त्याच्या जागीं कर्तृत्वक्षम पामर्स्टन याचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें ( १८५५ जानेवारी ). मिस फ्लॉरेन्स नाइटिंगेल ही उदारधी स्त्री सैनि-कांची शुश्रूषा करण्यासाठीं पुष्कळ 'सेविका' बरोबर घेऊन रणमैदानावर गेली व तिच्या मदतीचा पुष्कळच उपयोग झाला. जानेवारी १८५५

मध्यें सार्डिनियाही संयुक्तांच्या मदतीस आला. फेब्रुवारींत झार निकोलस वारला व पुढील झार तह करण्यास तयार होता. परंतु संयुक्तांचा सिबॅस्टॉपल किल्ला घेण्याचा निश्चय कायम असल्यामुळें तह ठरेना. आणखी सहा महिन्यांनीं सिबॅस्टॉपल पडलें; व मग १८५६ त पॅरिसचा तह ठरला. ग्रीक खिस्त्यांचें हितसंबंध मी नीट राखीन असें सुलतानानें कबूल केल्यावरून त्यांस आपल्या संरक्षकत्वाखालीं घेण्याचा हट्ट रशियानें सोडिला. एकमेकाचे जिंकलेले प्रांत रशिया व तुर्कस्थान यांनीं परत देण्याचें ठरविलें. रशियानें आपल्या किल्ल्यांची तटबंदी पाडिली, काळ्या समुद्रावरील आरमार कमी केलें, व शांततेच्या वेळीं डार्डानेल्स सामुद्रधुनी व डॅन्यूब नदी हीं व्यापारास सर्व राष्ट्रांस मोकळीं करण्यांत आलीं. सर्व प्रमुख राष्ट्रांनीं तुर्कस्थानची स्वतंत्रता व मुलूख कायम करण्याचेंही कबूल केलें.

**६ सॅन स्टेफॅनोचा तह**—रशियाच्या महत्त्वाकांक्षेस १८५६ सालीं जो हा आळा घालण्यांत आला तो इंग्लंड व फ्रान्स यांच्या जोडशक्तीनें घातला असून नाइलाज म्हणून तो तह रशियानें कबूल केला होता. १८७० सालीं प्रसिद्ध फ्रँकोजर्मन युद्ध होऊन फ्रान्स दुर्बळ झाला. बॉस्निया प्रांतांत १८७५ सालीं तुर्कांविरुद्ध बंड झालें. लवकरच सर्व्हिया व माँटेनेग्रो येथील संस्थानिकांनीं बंडवाल्यांची बाजू घेतली. तुर्क सैन्य बंडवाल्यांचा मोड करण्यांत गुंतलें असतां बल्गेरियांत दंगे होऊं लागले. तेव्हां तुर्कांनीं संतापून बल्गेरियांत सशस्त्र लोक पाठवून हजारो बल्गेरियनांची कत्तल केली ( १८७६ ). त्याबरोबर सर्व युरोपमध्यें तुर्कस्थानविरुद्ध क्रोधोद्गार निघूं लागले. तेव्हां या संधीचा उपयोग करून रशियानें तुर्कस्थानशीं युद्ध जाहीर केलें (१८७७), व रशियन सैन्य इस्तंबूलपासून शंभर मैलांच्या आंत आलें (१८७८). इंग्लंडांत यावेळीं लॉर्ड बिकन्सफील्ड ( डिझरायली ) हा मुख्य प्रधान होता. त्यानें रशियास तंबी पोंचविण्याकरितां मार्मोरा समुद्रांत ब्रिटिश आरमार धाडिलें; पण मध्यंतरीं तुर्कांनीं टेकीस येऊन सॅन स्टेफॅनोचा लज्जास्पद तह कबूल केला होता (१८७८ मार्च). त्यांत सर्व्हिया, मॉन्टेनेग्रो व रुमानिया हीं स्वतंत्र राष्ट्रें समजावीं, बल्गेरियास सुलतानाच्या नामधारी सत्तेखालीं स्वराज्य मिळून

डॅन्यूब नदीपासून एजिअन समुद्रांतील सॅलोनिका बंदरापर्यंतचा मुलूख त्यांत सामील व्हावा, डॅन्यूब नदीच्या उत्तरतीरीं कांहीं मुलूख क्रिमियन युद्धांत गेला होता तो रशियाला परत मिळावा, तुर्की राज्यांतील ग्रीक खिस्त्यांचा संरक्षक म्हणून झारला मानण्यांत यावें, व आशिया मायनर मधील आर्मेनियाचा बराच भाग रशियास मिळून युद्धांतील नुकसानीदाखल पैशांची भरपाईही तुर्कांनीं करावी या अटी होत्या. हा तह कबूल करणें म्हणजे तुर्कांचा युरोपांतून बहुतेक उठावच झाल्यासारखें होतें.

**७ बर्लिनचा तह**—इंग्रजांस हा तह पसंत न पडून त्यांनीं रशियास आपल्या मागण्या कमी करण्याबद्दल सांगितलें. पण रशिया दुर्लक्ष करूं लागला तेव्हां इंग्रजांनीं हिंदुस्थानांतून माल्टाला फौज आणिली व युद्धाची तयारी चालविली. तेव्हां रशिया अटी सौम्य करण्यास कबूल झाला व बर्लिन येथें सभा होऊन तह ठरला (१८७८ जून). या तहाअन्वयें रुमानिया, सर्व्हिया व मॉंटेनेग्रो यांचें स्वातंत्र्य कबूल करण्यांत आलें. परंतु बल्गेरियाचे दोन भाग करण्यांत आले. बाल्कन पर्वतापर्यंत उत्तरेचा भाग व तेथून ॲड्रिआनोपलपर्यंत दुसरा भाग. यांपैकीं पहिला भाग स्वतंत्र होऊन दुसऱ्यावर सुलतानाचें अधिराज्य कायम ठेवण्यांत आलें. बॉस्निया व हर्झेगोव्हिना हे प्रांत ऑस्ट्रियानें घेतले; व ग्रीसच्याही मुलुखांत कांहीं भर पडली. ग्रीक खिस्त्यांचा संरक्षक म्हणून रशियानें पुढें केलेला हक्क फेटाळून लावण्यांत आला; मात्र तुर्कांकडून धार्मिक बाबतींत समता ठेविण्यांत येईल असं वचन घेण्यांत आलें. आशियांतील तुर्कांचें राज्य अबाधित ठेविण्याचें वचन देऊन इंग्रजांनीं सायप्रस बेट वापरावयास मागितलें; त्याची दरसाल योग्य ती खडणी देण्याचें त्यांनीं कबूल केलें ( १८७८ जून ).

**८ अफगाणिस्थानशीं युद्ध**—युरोपांत तुर्कस्थानसंबंधीं तंटा चालला होता; तेव्हां रशियानें तुर्कस्थानच्या अमिराकडे वकील पाठविला, तेव्हां इंग्रजांनीं आपलाही वकील पाठविला; परंतु त्याला अमिरानें अफगाणिस्थानच्या सरहद्दीपाशींच मज्जाव केला ( १८७८ सप्टेंबर ). तेव्हां

इंग्रजांनीं हिंदुस्थानांतून अफगाणिस्थानांत सैन्य पाठवून आपल्याला अनुकूल असा याकूब नांवाचा पाहिल्या अमिराचा मुलगा गादीवर बसविला व त्यानें इंग्लिश वकिलाचा स्वीकार केला (१८७९ मे). परंतु १८४१-४२ चा अनुभव फिरून आला. इंग्रज वकिलास ठार मारण्यांत आलें, देशांत बंडाळी माजली व अमिरास पदच्युत करण्यांत आलें. नंतर फ्रेडरिक रॉबर्ट्‌सच्या हाताखालीं सैन्य पाठविण्यांत आलें. या सैन्यानें अफगाणी लोकांचे बऱ्याच ठिकाणीं पराभव केले. इंग्रजांशीं सख्य राखण्याच्या अटीवर अबदुल रहमानखान यास अमीर करण्यांत येऊन कोणत्याही प्रकारची अधिक ढवळाढवळ न करतां इंग्रज सैन्य हिंदुस्थानांत परत आलें. साम्राज्यप्राप्तीसाठीं अठराव्या शतकांत इंग्रजांना फ्रेंचांशीं एकसारखीं युद्धें करणें भाग पडलें. आतां तें साम्राज्य सुरक्षित रहावें म्हणून रशियाशीं त्यांना युद्धें करावीं लागलीं. त्यांत डोळे दिपवून टाकणारे विजय जरी इंग्रजांनीं संपादन केले नसले तरी रशियास थोपवून धरून साम्राज्यरक्षणाचें काम मात्र त्यांनीं चोख केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

# ६१ हिंदुस्थानांतील शिपायांचें बंड १८५७.



**१ ब्रिटिश राज्याची वाढ**—१८०२ सालीं दुसरे बाजीराव पेशवे यांशीं वसई मुक्कामीं तह करून मराठी सरदारांतील मुकुटमणी जे पेशवे त्यांस इंग्रजांनीं आपले मांडलिक करून सोडलें. पुढें १८०३ त दक्षिणेकडे सर आर्थर वेल्स्ली यानें असई येथील लढाई जिंकून व लेकनें उत्तरेकडे लास्वारीची लढाई मारून शिंदे व भोंसले या मराठे सरदारांस इंग्रजाचे अंकित बनविलें. १८०५ त होळकराशीं तंटा होऊन त्यासही इंग्रजाचें स्वामित्व कबूल करावें लागलें. १८१८ त पेशवाईचा अंत झाला व मराठी साम्राज्याचा सर्व मुलूख प्रत्यक्ष किंवा परंपरेनें इंग्रजांचे हातीं आला. या वेळीं हिंदुस्थानचें स्वामित्व इंग्रजांच्या हातीं आलें असें म्हणावयास हरकत नाहीं. या विस्तीर्ण देशाच्या कानाकोपऱ्यांत पसरलेले

प्रांत जिंकण्याचें गौण कामच आतां काय तें राहिलें. १८४३ त सिंधच्या अमिरांशीं भांडण झालें. तेव्हां नेपियर त्यांच्यावर चालून गेला, व सिंध इंग्रजांच्या हस्तगत झाला. १८४५ पासून १८४९ पर्यंत पंजाबांतील शीख संस्थानांशीं युद्ध झालें. कवाईत, शिस्त व तोफखाना या दृष्टींनीं शीखांचें सैन्य युरोपियन सैन्याच्या पद्धतीवर तयार केलें असल्यामुळें शीखांशीं सोब्रान, चिलियनवाला, गुजराथ वगैरे ठिकाणीं ज्या लढाया झाल्या त्या फारच भयंकर झाल्या. परंतु शीख सैन्यांत फितुरी असल्यामुळें इंग्रजांस शेवटीं जय होऊन हिंदुस्थानांतील ब्रिटिश मुलखांत पंजाबची भर पडली. अशा रीतीनें प्रांतामागून प्रांत सर होऊन बहुतेक सर्व हिंदुस्थान इंग्रजांच्या अंकित झालें.

**२ बंडाचीं कारणें**—१८४८ पासून १८५६ पर्यंत लॉर्ड डलहौसी हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होता. संस्थानिक निपुत्रिक वारला कीं त्याला दत्तक घेण्याचा हक्क हिंदुस्थानांत पूर्वापार चालत आलेला होता. तो कबूल न करितां निपुत्रिकाचें संस्थान जप्त करण्याचें कडक धोरण त्यानें स्वीकारिलें व नागपूर, झांशी, सातारा, तासगांव येथील संस्थानांचा मुलूख इंग्रजी राज्यास जोडला. अयोध्येचा नबाब चैनी व जुलमी आहे या सबबीवर त्याचीही राज्यावरून हकालपट्टी करून त्याच्याजागीं त्याच्या कुळांतील दुसरा मनुष्य न बसवितां अयोध्येचें संस्थानही जप्त केलें. यामुळें इंग्रजी राज्याविरुद्ध असंतोष धुमसूं लागला. इतक्यांत पुढील कारणांची त्यांत भर पडली. इंग्रजी राज्याची हिंदुस्थानांतील प्राणप्रतिष्ठा प्लासीच्या जयानें १७५७ मध्यें झाली, त्यास १८५७ त बरोबर शंभर वर्षें भरत होतीं. तेव्हां इंग्रजांचें राज्य शंभर वर्षेंच टिकणार असा लोकप्रवाद बराच फैलावला होता. त्यामुळें तें उलथून पाडून आपलें स्वतंत्र राज्य स्थापावें असें हिंदुस्थानांतील लोकांस वाटूं लागलें. त्याचप्रमाणें इंग्रजांची रशियाशीं लढाई चालू होती. तींत इंग्रजांस बरेच कष्ट सोसावे लागून ते अगदीं हलाखीस आले आहेत अशी ही बातमी होती. परंतु या सर्व कारणांहून विशेष बलवत्तर कारण म्हटलें म्हणजे इंग्रज अधिकारी आपल्या धर्मावर घाला घालून आपल्याला बाटविणार अशी

ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यांतील हिंदु व मुसलमान अशा दोन्ही शिपायांस भीति पडली हेंच होय. त्याच वेळीं रायफल बंदूक निघाली होती व तिचीं काडतुसें तयार करतांना तेलकट पदार्थांचा उपयोग करावा लागत असे. त्या वेळीं चहूंकडे अशी बातमी उठली कीं, या पदार्थांत गाईची व डुकराची चर्बी असते. गाय ही हिंदूंस पूज्य असल्यामुळें व डुकराची मुसलमानांस चीड असल्यामुळें या बातमीनें कंपनीच्या हिंदू व मुसलमान शिपायांची इंग्रज आम्हांस बाटविण्यास चुकावयाचे नाहींत अशी दृढ समजूत झाली. यांत पूर्वोक्त कारणांची भर पडून कंपनीच्या नोकरीवर असलेल्या हिंदु व मुसलमान शिपायांनीं ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचा व्यूह रचिला.

३ **दिल्ली**—या भयंकर बंडाचा स्फोट दिल्लीजवळ मिरत येथें १८५७ च्या मेमध्यें झाला. तेथील तीन हिंदी पलटणींनीं बंडाचें निशाण उभारिलें व आपल्या गोऱ्या ऑफिसरांना ठार करून मोठ्या उत्साहानें त्यांनीं दिल्लीस कूच केलें. तेथें बहादुरशहा हा हतभागी मोंगल बादशहा होता. तो आपला बादशहा असें जाहीर करून इतर हिंदी पलटणींस युरोपियन ऑफिसरांना ठार करून बंडांत सामील होण्याविषयीं चेतविणारे संदेश त्यांनीं पाठविले.

४ **कानपूर**—लागलीच बहुतेक सर्व उत्तर हिंदुस्थानांत धामधूम सुरू झाली. त्यांतल्या त्यांत कानपूर येथें दुसरा बाजीराव पेशवा याचा दत्तक मुलगा नानासाहेब हा होता. आपल्या बापास मिळत असणारें पेन्शन आपणास मिळावें म्हणून त्यानें पुष्कळ खटपट केली. परंतु त्याला यश आलें नाहीं. तेव्हां तो अगोदर असंतुष्ट होता. तो आतां बंडवाल्यांस मिळाला. कानपूर येथें सर ह्यू व्हीलर हा इंग्रज ऑफिसर असून ५०० बायका–मुलें तेथें होतीं. या इंग्रजांभोंवतीं बंडवाले जमले. इंग्रजांस वेढा सहन न होऊन ते अगदीं टेंकीस आले; शेवटीं बोटींत बसून गंगानदींतून अलाहाबादला परत जाण्याची त्यांनीं परवानगी मिळविली. परंतु बोटींत बसून ते लोक जाऊं लागले तोंच बंडवाल्यांनीं त्यांच्यावर गोळीबार

सुरू केला. त्या गोळीबारांतून जिवंत राहिलेल्या २५० लोकांस गांवांत परत आणण्यांत आलें. व अठरा दिवस झाल्यावर इंग्रज फौज आपल्या-वर चालून येत आहे असें कळतांच बंडवाल्यांनीं त्या हताश लोकांची निर्दयपणानें कत्तल केली ! पुढें जनरल हॅव्लॉकच्या हाताखालीं इंग्रज फौज चालून आली, तेव्हां नानासाहेब पळून गेला व कानपूर येथील बंडाचा मोड झाला.

५ **लखनौ**—अयोध्या प्रांताचा गव्हर्नर हेन्री लॉरेन्स यानें बंड-वाल्यांस कह्यांत राखणें आपणास शक्य नाही असें पाहून लखनौ येथील गव्हर्नरच्या राहण्याच्या वाड्यास तटबंदी केली व त्या प्रांतांतील सर्व इंग्रजांस तेथें बोलावून त्या तटबंदीच्या आश्रयानें बंडवाल्यांपासून आपलें संरक्षण करण्याचा घाट घातला. ८७ दिवसपर्यंत वेढा पडला होता. उन्हाळा, वाईट अन्न, कॉलरा व देवी या रोगांच्या सांथी या सर्वांस दाद न देतां त्या शिबंदीनें टिकाव धरला. हेन्री लॉरेन्स तर एक महिन्याच्या आंतच गोळी लागून मेला होता. तथापि इंग्रजांनीं धीर न सोडतां आपला बचाव करण्याचें काम चालू ठेविलें. जनरल हॅव्लॉक व औट्राम यांच्या हाताखालीं मदत आली तेव्हां आंतील शिबंदीचा पेंच बराच कमी झाला; व शेवटीं सर कॉलिन क्याम्प्बेल याच्या हाताखालीं इंग्लंडांतून फौज आली होती ती लखनौवर चालून आली, तेव्हां तर बंडवाल्यांचा पुरा मोड होऊन ब्रिटिश शिबंदीचा बचाव झाला.

६ **दिल्ली पडली**—दिल्लीमध्यें ३०,००० बंडवाले शिपाई असून तेंच बंडाचें केंद्रस्थान झालें होतें. पुरेशी फौज मिळतांच इंग्रजांनीं त्या शहरास वेढा घातला. पांच महिनेपर्यंत वेढ्याचें काम चाललें होतें. पंजाबां-तील शीख व गुरखा पलटणी राजनिष्ठच राहिल्या. त्यांनीं या दिल्लीच्या वेढ्याचे कामीं फार शौर्य गाजविलें. शेवटीं जनरल निकल्सनच्या हाताखालीं आणखी फौज आली, व निर्वाणीचा हल्ला करण्यांत आला. किल्ल्याचा काश्मीर दरवाजा दारूगोळ्याच्या मारानें उडवून दिला गेला. त्या दर-वाजासमोर पहिल्यानें दारूचीं पोतीं रचण्यांत येऊन मोठ्या शर्थीनें दारूस

चत्ती देण्यांत आली. सहा दिवसपर्यंत घनघोर युद्ध झालें, तेव्हां दिल्ली पडली ( १८५७ सप्तेंबर १४ ).

**७ बंडाचा मोड**—दिल्ली पडल्यावर बंडवाल्यांस एक होऊन लढाई देण्यास उत्तेजनपर कांहीं ध्येयच राहिलें नाहीं. यापुढें अठरा महिने बंडाळी चालली होती, त्यांत बंडवाल्यांनीं कांहींतरी भरमसाट उद्योग चालविला. अयोध्या प्रांत खेरीजकरून इतर सर्व प्रांतांतील सामान्य जनता बंडास अनुकूल नव्हती. इतकेंच नव्हे तर वेळोवेळीं इंग्रजांना युद्धसामुग्रीचा पुरवठा करून व इंग्रजांच्या बायकामुलांची सुटका करण्यासही मदत करून एकंदरींत इंग्रजांस तिनें साहाय्यच केलें. बहुतेक सर्व संस्थानिकही तटस्थच राहिले. झांशीची राणी लक्ष्मीबाई हिला मात्र, इंग्रजांनीं दत्तक घेण्याचा अधिकार न दिल्यामुळें आपलें संस्थान बुडालें, या गोष्टीनें खेद व संताप आला, व ती बंडवाल्यांस मिळाली. ती अत्यंत शौर्यानें लढली, व लढत असतांच रणांगणावर तिला मृत्यु आला. नंतर सर ह्यु रोज यानें ग्वाल्हेर घेतलें व त्या बाजूस बंडावाही मोडला. दिल्ली, लखनौ, कानपूर, हीं बंडवाल्यांचीं ठाणीं सर झाल्यावर बंडवाल्यांचें पारिपत्य करण्यांत आलें. बंडवाल्यांपैकीं कैद झालेल्या लोकांस तोफेच्या तोंडीं देण्यांत आलें. ज्यांनीं बंडवाल्यांस यत्किंचित् मदत केली असें आढळून आलें त्या सर्वांस फांशीं देण्यांत आलें. तेव्हां इंग्रजांचा दरारा चहूंकडे बसला. येणेंप्रमाणें ब्रिटिश साम्राज्यांतलि अत्यंत तेजस्वी मणि जो हिंदुस्थान तो इंग्रजांच्या हातून जाण्याचा दुर्धर प्रसंग ब्रिटिश साम्राज्यावर आला होता. परंतु हिंदुस्थानांतील सामान्य जनसमूह, शीख व गुरखे हे लष्करी लोक व बहुतेक सर्व संस्थानिक राजनिष्ठ राहिल्यामुळें तो प्रसंग टळला.

**८ राज्यव्यवस्थेंत फरक**—या बंडानंतर पार्लमेंटनें ठरविलें कीं, हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनीच्या हातून अजीबात काढून ब्रिटिश सरकारनें आपल्या हातीं घ्यावा. १८३३त ईस्ट इंडिया कंपनीचा व्यापाराचा मक्ता काढून घेण्यांत आला असून हिंदुस्थानची पेठ सर्व जगास मोकळी करण्यांत आली होतीच. तेव्हां व्यापारी काम नाहीं व राजकीय

काम नाहीं असें होऊन कंपनी १८५८ त नामशेष झाली! हिंदुस्थानचा सेक्रेटरी हा अधिकारी नेमण्यांत येऊन तो प्रधानमंडळांतील एक प्रधान झाला, व त्याला १५ सभासदांचें एक कौन्सिल देण्यांत आलें. जें कंपनीचें सैन्य होतें तें राणीचें सैन्य बनविण्यांत आलें. हिंदुस्थानांतील कंपनीचें आरमार मोडण्यांत येऊन हिंदी किनाऱ्याचें रक्षण 'रॉयल आरमारावर' सोंपविण्यांत आलें. गव्हर्नर जनरल लॉर्ड क्यानिंग हा हिंदुस्थानचा पहिला राजप्रतिनिधि (Viceroy, व्हाइसरॉय) झाला. त्याचप्रमाणें व्हाइसरॉयचें कायदेकारी कौन्सिल व मुंबई—मद्रासचीं कौन्सिलें यांत बिनसरकारी सभासद घेण्यांत आले.

९ **जाहीरनामा**——१८५८ तील नोव्हेंबरच्या १ ल्या तारखेस "राणीचा जाहीरनामा" अलाहाबाद येथें वाचून दाखविण्यांत आला. त्यांत, हिंदी लोकांचें सांत्वन करण्यासाठीं पुढील योजना करण्यांत आली. हिंदी संस्थानांशीं केलेले करारमदार आम्ही अक्षरशः पाळूं, व दत्तक घेण्याच्या त्यांच्या हक्कावर आम्ही गदा आणणार नाहीं, असें अभिवचन संस्थानिकांस देण्यांत आलें. सामान्य जनतेस असें अभिवचन मिळालें कीं, जो जी नोकरी करण्यास योग्य असेल त्यास, त्याची जात किंवा वर्ण, मनांत न आणितां ती देण्यांत येईल; सर्व लोकांस सारख्या रीतीनें वागविण्यांत येईल; व कोणत्याही धर्मांत आम्ही ढवळाढवळ करणार नाहीं. पुढें १८७७ सालीं लॉर्ड लिटन हा व्हाइसरॉय असतां दिल्ली येथें मोठा दरबार भरविण्यांत येऊन राणीनें 'हिंदुस्थानची बादशाहीण' हा किताब धारण केला.

१० **चीनवर छाया**—हिंदुस्थानांतील अफू चीनमध्यें खपत असे. चिनी राज्यकर्त्यांस हें अफूचें व्यसन कमी करण्याची प्रबळ इच्छा असल्यामुळें इंग्रज व्यापाऱ्यांस चिनांत अफू न आणण्याविषयीं त्यांनीं सांगितलें. तरीही इंग्रज व्यापारी चोरूनमारून अफू पाठवीतच राहिले. तेव्हां चिनी सरकारनें चिडून एक हजार पौंडांची अफू बुडविली. यावर इंग्रज प्रधानमंडळानें न्यायअन्याय कांहीं न बघतां आपल्या व्यापा-

त्यांची बाजू घेतली, व क्यान्टनला आरमार पाठविलें (१८४२). चीनला हाँगकाँग हें पूर्व किनाऱ्यावरील बेट इंग्रजांस देणें भाग पडून आपलीं बंदरें व्यापाराकरितां खुलीं करावीं लागलीं व युद्धाच्या खर्चाबद्दल म्हणून ४५ लाख पौंडांचा भुर्दण्ड भरावा लागला. हिंदुस्थानांतील शिपायांच्या बंडानंतर ब्रिटिश निशाण फडकावीत जाणाऱ्या एका जहाजावरील चांचे लोकांस चीननें पकडलें; त्यावरून भांडण उकरून काढून इंग्रजांनीं क्यान्टनवर भडिमार करून तें घेतलें. फ्रान्सही या युद्धांत सामील झाला. शेवटीं तह झाला. त्यांत यांगट्‌झी खोरें इंग्रज व फ्रेंच व्यापारी आणि मिशनरी यांस खुलें करण्यांत येऊन इंग्रजांचे व फ्रेंचांचे पेकिनला वकील असावेत व चीनचे पॅरिस व लंडन येथें वकील असावेत असें ठरलें. या युद्धाचा सर्व खर्चही चीननेंच सोसला. हा तह इतका जाचक होता कीं, चिनी सरकार त्याचा अंमल करूं देईना. तेव्हां पेकिनवर स्वारी करण्यांत येऊन चिनास संमति देण्यास इंग्रज-फ्रेंचांनीं भाग पाडिलें ( १८६० ). अशा रीतीनें हिंदुस्थानच्या निमित्तानें ब्रिटिश साम्राज्याची चीन देशावरही छाया पडली.

---

# ६२ लोकशाहीचा लाभ.



## मुख्य प्रधान

| लिबरल | कॉन्झर्व्हेटिव्ह |
|---|---|
| रसेल, १८६५–१८६६. | डार्बी–डिझरायली १८६६–१८६८. |
| ग्लॅडस्टन, १८६८–७४, १८८०–८५, ८६. | डिझरायली १८७४–८०. |

**१ पामर्स्टन**—रशियाशीं क्रिमियन युद्ध चाललें असतां पामर्स्टन हा मुख्य प्रधान होऊन व्हिग (लिबरल) प्रधानमंडळ अधिकारारूढ झाल्याचें मागें सांगितलेंच आहे ( १८५५ ). पुढें फ्रेंच बादशहा तिसरा नेपोलियन याचा पॅरिसमध्यें खून करण्याचा ऑर्सिनी नांवाच्या इटालियनानें

प्रयत्न केला, परंतु सुदैवानें तो फसला. या खुनाचा कट व त्याला लागणारे बॉंब लंडनमध्यें तयार झाल्याचें उघडकीस आलें. तेव्हां फ्रेंचांचा क्षोभ शांत करण्यासाठीं पामर्स्टननें परदेशच्या राजांचा खून करण्याच्या हेतूनें केलेल्या कटांचा जो कायदा होता त्यांत बदल करण्याचें बिल पार्लमेंटपुढें आणलें. तें पास न होऊन पामर्स्टनला राजीनामा द्यावा लागला ( १८५८ फेब्रुवारी ). त्यानंतर लॉर्ड डार्बी हा मुख्य प्रधान होऊन कॉन्झर्व्हेटिव्ह ( टोरी ) प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें. या प्रधानमंडळानें पार्लमेंटच्या सभासदांनीं घ्यावयाच्या शपथेंत फरक करून ज्यू लोकांस पार्लमेंटचे सभासद होतां येईल अशी व्यवस्था केली व तिच्यामुळें बॅरन रॉथ्शील्ड हा ज्यू गृहस्थ कॉमन्ससभेचा लंडन शहरातर्फे सभासद झाला. कॉमन्ससभेंत कॉन्झर्व्हेटिव्हांचें बहुमत नसल्यामुळें १८५९ च्या जूनमध्यें डार्बीचें प्रधानमंडळ अधिकारावरून जाऊन लॉर्ड पामर्स्टन फिरून मुख्य प्रधान झाला. तेव्हांपासून १८६५ त तो मृत्यु पावला तेथपर्यंत त्याच्याच हातीं अधिकारसूत्रें होतीं. तो मोठा कर्तबगार असून १८०९ पासून १८६५ पर्यंत बहुतेक सर्व काळ कोणत्याना कोणत्या जागेवर प्रधानमंडळांत त्यानें कामगिरी बजाविली होती. तरुणपणीं तो नेमस्त टोरी असून क्यानिंगचा अनुयायी असे. रिफॉर्म बिलच्या काळापासून तो व्हिग पक्षांत सामील झाला, व जुन्या व्हिग पक्षाचा तो खरा प्रतिनिधी होता. पार्लमेंटच्या निवडणुकीचा हक्क अधिक लोकांस देऊन इंग्लंडांत 'खरी लोकशाही' ( Democracy ) सुरू करावी हें मत त्याला मुळींच मान्य नव्हतें व निवडणुकीच्या हक्काचा उपभोग घेणाऱ्या देशांतील मध्यमवर्गाचेंही तसेंच मत होतें. इंग्लंडची इतर राष्ट्रांवर छाप कशी बसेल याचीच तो नेहमीं काळजी वहात असे. कोणताही प्रश्न चटकन् समजण्यास बुद्धीची जी ग्राहक शक्ति लागते ती त्याच्या ठिकाणीं पूर्णपणें असून कोणत्याही प्रश्नाचा चटकन उलगडा पाडून निकाल तडकाफडकी अंमलांत आणण्याची हातोटी त्याला साधून गेली होती. लोकांच्या इच्छेप्रमाणें वागून त्यांना संतुष्ट कसें ठेवावें व त्यांचा देशाभिमान जागृत करून त्यांचीं मनें वश कशीं करावीं यांत तो तरबेज अस-

त्यामुळें इंग्रज लोकांची त्याच्यावर भक्ति जडली होती. आर्थिक बाबतींत प्रगतिपर धोरण ठेवण्यास पामर्स्टन विरुद्ध नव्हता. प्रसिद्ध ग्लॅडस्टन हा त्याच्या प्रधानमंडळांत फडनविसाच्या जागीं असून त्यानें देशांत आयात होणाऱ्या साखर व चहा यांजसारख्या अवश्यक वस्तूंवरील जकाती पार उठविल्या व खुल्या व्यापाराचें तत्त्व पूर्णपणें अंमलांत आणिलें. तथापि पार्लमेंटमध्यें सुधारणा करण्याची जरूर पामर्स्टनास मुळींच वाटत नसल्यामुळें ग्लॅडस्टनसारख्या त्याच्या सुधारणावादी सहकाऱ्यांस आपलें सुधारणेचें धोरण गुलदस्तांत ठेवावें लागलें. पामर्स्टनच्या या बाबतींतील 'स्थिति'प्रियतेवरून त्यास डिझरायली हा कॉन्झर्व्हेटिव्ह पुढारी 'जहाल सुधारकांचा टोरी म्होरक्या' (The Tory chief of a Radical cabinet) म्हणत असे.

**२ आलाबामा प्रकरण**—१८६१ त अमेरिकेंत गुलामगिरीच्या प्रश्नासंबंधीं तंटा होऊन उत्तर संस्थानें व दक्षिण संस्थानें यांजमध्यें युद्ध सुरू झालें. दक्षिण संस्थानांत शेती फार असून गुलाम बाळगणें तेथील जमीनदारांस फार फायदेशीर असे. तेव्हां गुलामगिरी बंद करणाऱ्या उत्तर संस्थानांशीं त्यांचें न पटून त्यांनीं आपला निराळा संघ तयार केला. तेव्हां युद्ध सुरू झालें. या युद्धानें दक्षिण संस्थानांतून इंग्लंडांत जो कापूस येई तो बहुतेक बंद झाला. व लँक्याशायरमधील गिरण्या आठवड्यांतून अगदीं थोडे तास चालवून बाकीचा वेळ बंद ठेवण्याची पाळी आली. इंग्लंड हें तटस्थ राष्ट्र होतें तरी दक्षिणेकडील संस्थानांस ब्रिटिश बंदरांत कांहीं जहाजें इंग्रज सरकारनें खुशाल बांधू दिलीं. या जहाजांपैकीं "आलाबामा" नांवाचें एक होतें. त्यानें एकट्यानें उत्तर संस्थानांचीं ६५ व्यापारी जहाजें बुडविलीं. पुढें उत्तर संस्थानांचा जय होऊन युद्ध थांबलें (१८६५). तेव्हां इंग्रज सरकारनें तटस्थपणाचा दुरुपयोग केला असा अमेरिकेनें इंग्लंडवर टपका आणला. या "आलाबामा" प्रकरणाचा निकाल जिनिव्हा येथें भरलेल्या आंतर–राष्ट्रीय सभेनें केला (१८७२). त्यांत इंग्लंडनें नुकसान-भरपाईबद्दल अमेरिकेस तीस लक्ष पौंड द्यावे असें ठरलें.

**३ डिझरायली व ग्लॅडस्टन**—पामर्स्टन १८६५ त वारल्यानंतर अर्ल रसेल हा मुख्य प्रधान झाला. परंतु १८६६ त फिरून उलटापालट होऊन कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ होऊन लॉर्ड डार्बी हा मुख्य प्रधान झाला. या वेळीं अर्ल रसेल व डार्बी हे मुख्य प्रधान लिबरल व कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचे केवळ नामधारी पुढारी असून त्यांचे कॉमन्स सभेंतील दुय्यम ग्लॅडस्टन व डिझरायली हेच वस्तुतः पुढारी होते. हे दोघेही अत्यंत हुशार असून आपआपल्या पक्षाचे खरेखुरेच प्रतिनिधी होते, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. त्यांचें आपआपल्या पक्षाशीं इतकें तादात्म्य झालें होतें कीं, त्या वेळच्या लिबरल पक्षाचीं तत्त्वें व धोरणें कोणतीं हें एखाद्यास समजून घ्यावयाचें असल्यास त्यानें ग्लॅडस्टनचें चरित्र पहावें, व त्या वेळच्या कॉन्झर्व्हेटिव्हांच्या मतांची ओळख करून घेण्यास डिझरायलीचें चरित्र पहावें. ग्लॅडस्टन ( १८०९–१८९८ ) पहिल्यानें पीलचा अनुयायी असून नेमस्त टोरी होता. १८४६ त पील कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षांतून फुटला तेव्हां इतर पीलाइटांबरोबर ग्लॅडस्टन व्हिग पक्षांत सामील झाला. त्याचा स्वभाव अगदीं सरळ असून त्याच्या मनाचा मोकळेपणा विलक्षण होता. त्याचें आंकडेशास्त्रांतील प्रावीण्य नांवाजण्यासारखें असून तो उत्तम वक्ता होता. डिझरायलीची ( १८०४–१८८० ) बुद्धि तीव्र असून तो मोठा धूर्त होता. बहुजनसमूहाचें मत आपल्या पक्षास अनुकूल करून घेण्यासाठीं तो फार झटला. कोणत्याही प्रश्नावरील अस्फुट बहुमताचा स्पष्ट उच्चार करणें व तें अंमलांत आणणें हेंच पुढाऱ्याचें कर्तव्य होय असें ग्लॅडस्टन म्हणत असे व 'आपण लोकांवर विश्वास ठेवला पाहिजे,' या त्याच्या सूत्रवाक्याच्या मुळाशीं हीच कल्पना होती. पार्लमेंट–सुधारणेच्या बाबतींत केवळ विरोधाचें धोरण न स्वीकारतां कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें सुधारणा करण्यास तयार झालें पाहिजे व तेणेंकरून बहुजनसमूहास संतुष्ट राखून आपल्या बाजूस अनुकूल करून घेतलें पाहिजे असें डिझरायलीचें मत होतें, व त्यानें आपल्या पक्षास 'शिक्षण देऊन' हें मत त्याच्या पचनीं पाडिलें. एकंदरीनें लोकांना संतुष्ट राखावयाचें येवढ्याकरितांच डिझरायली ' सुधारणा ' करण्यास तयार

होई तर अमकी सुधारणा लोकांना हवी आहे व ती केली असतां लोक-कल्याण हटकून साधेल अशी पूर्ण विचाराअंतीं बुद्धीची खात्री झाली म्हणजे ती करावयाची असा ग्लॅडस्टनचा क्रम असे. परकीय राजकारणाच्या बाबतींतही दोघांच्या धोरणांत व कृतींत फरक दिसून येई. ब्रिटिश साम्राज्याचा बडेजाव वाढून जेणेंकरून इंग्रज लोकांच्या महत्त्वाकांक्षेस वावरावयास क्षेत्र मिळेल असें धोरण ठेवण्याचा डिझरायलीचा कटाक्ष असे; तर मानवजातीच्या स्वातंत्र्यांत व स्वास्थ्यांत जेणेंकरून भर पडेल तेंच राजधोरण अंगिकारण्यास ग्लॅडस्टन नेहमीं तयार असे. ग्लॅडस्टन आपल्या शत्रूशींही न्यायानें व समतेनें वागण्यास झटत असे; उलटपक्षीं शत्रूशीं दांडगाई करून शत्रूला चीत करावयाचा व त्यांत आनंद मानावयाचा अशी डिझरायलीची वृत्ति असे.

**४ सुधारणेचा कायदा १८६७**—१८३२ च्या रिफॉर्म बिलानें मध्यम-वर्गास निवडणुकीचा हक्क मिळाला होता. बहुजनसमूहासही तो देऊन पुढें पाऊल टाकलें पाहिजे अशी जाणीव पुष्कळ लिबरल पुढाऱ्यांच्या मनांत अलीकडे उत्पन्न झाली होती. परंतु मुख्य प्रधान पामर्स्टन हा ' १८३२ सालची सुधारणा पूर्ण आहे ' या जुन्या व्हिग मताचा असल्यामुळें त्याच्या मृत्यूपर्यंत हा प्रश्न पुढें ढकलण्यांत आला ( १८६५ ). १८६६ त ग्लॅडस्टन यानें पार्लमेंटच्या सुधारणेचें एक बिल कॉमन्स सभेपुढें मांडिलें. तें नापास झालें व लिबरल प्रधानमंडळास राजीनामा द्यावा लागला. त्याच्यानंतर डार्बी मुख्य प्रधान होऊन कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ झाला. डिझरायलीनें १८६७ त रिफॉर्म-बिल पार्लमेंटपुढें आणलें व तें पास झालें. १८३२ त मतदार होण्यास घातलेल्या अटी आणखी सैल करण्यांत आल्या. बरोमध्यें सर्व घरवाल्यांस पार्लमेंटला प्रतिनिधि निवडण्याचा हक्क देण्यांत येऊन वर्षाकांठीं निदान १० पौंड भाडें भरणाऱ्या भाडेकऱ्यांसही तो हक्क मिळाला. कौन्टीमध्यें ५ पौंड सारा भरणाऱ्या जमीनदारास व वर्षास १२ पौंड खंड भरणाऱ्या खंडकऱ्यासही मत मिळालें. मतदारांस घातलेल्या अटी अशा सैल केल्यानें शहरांतील कामकरी वर्ग व खेड्यांतील

गरीब शेतकरी यांस निवडणुकीचा हक्क मिळाला व पार्लमेंटची लोकमत-निदर्शकता अधिक वाढली. १८३२ च्या रिफॉर्म बिलाप्रमाणें या वेळींही आणखी ४६ नामधारी बरोंचा सभासद पाठविण्याचा हक्क काढून घेण्यांत आला, व निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या प्रतिनिधींना पार्लमेंटांत यावयास सांपडावें म्हणून मोठमोठ्या शहरांना तीन तीन प्रतिनिधी निवडून देण्याचा हक्क देण्यांत आला.

**५ सुधारणेचा कायदा (१८८४–१८८५)**--१८६८ त ग्लॅडस्टन अधिकारारूढ झाला. त्यानें १८७१ त निवडणुकीच्या वेळीं 'बॅलट' (Ballot) ची पद्धति सुरू करण्याचें बिल पास करून घेतलें. या पद्धतीनें मतदारास 'गुप्त' रीतीनें मत देतां येऊन त्यानें कोणास मत दिलें हें मागाहूनही कळण्यास मार्ग रहात नाहीं. ही पद्धति अंमलांत आल्यानें गरीब लोकांवर बड्या जमीनदार लोकांचा जो अप्रत्यक्ष जुलूम चालत असे तो बंद झाला. १८८४ सालीं ग्लॅडस्टन मुख्य प्रधान होता. त्यानें मताचा कायदा (Franchise Bill) पास करून मत देण्याचा हक्क आणखी पुष्कळ लोकांस दिला. या बिलानें कौन्टींतील घरवाल्यांस 'मत' देण्यांत येऊन एकाच घरांत वर्षभर भाडें देऊन राहणाऱ्या भाडेकऱ्यासही मताचा हक्क मिळाला. या सुधारणांनीं शेतावर काम करणाऱ्या मजुरासही मत मिळून मतदारांच्या संख्येंत सुमारें २५ लाख लोकांची भर पडली व इंग्लंडांत लोकशाही (Democracy) पूर्णपणें सुरू झाली. १८८५ त सभासदांच्या वांटणींत फेरबदल करण्याचें बिल पास झालें. हें बिल कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचा पुढारी लॉर्ड सॅलिसबरी याच्या संमतीनें ग्लॅडस्टननें तयार केलें होतें. त्यानें १५००० च्या आंतील लोकसंख्येच्या शहरांचा (बरो) पार्लमेंटला सभासद पाठविण्याचा हक्क अजीबात काढून घेण्यांत आला. ५०,००० च्या आंत ज्यांची लोकसंख्या होती त्या शहरांचा एक सभासद कमी करण्यांत आला, व कॉमन्स सभेच्या एकंदर सभासदांची संख्या ६५८ होती ती ६७० करण्यांत आली. या वेळीं मतदारसंघ जवळ जवळ समान संख्येचे करण्यांत आल्यामुळें पार्लमेंट अधिक लोकमतनिदर्शक बनली.

६ **शिक्षण**—लोकसत्ता यशस्वी होण्यास जनता साक्षर पाहिजे, याची जाणीव पुढाऱ्यांस झाली व लिबरल प्रधानमंडळानें हा प्रश्न लवकरच हातीं घेतला. प्राथमिक शिक्षणासंबंधीं १८७० त पार्लमेंटचा ठराव पास झाला. तोंपर्यंत सर्वतोपरी सरकारच्या मदतीनें चाललेल्या अशा प्राथमिक शिक्षणाच्या शाळाच नव्हत्या. कांहीं प्रस्थापित धर्माच्या अनुयायांनीं चालविलेल्या व कांहीं डिसेंटरांच्या शाळा असून सर्व शिक्षणसंस्था धर्मतत्त्वावर चालत. १८७० च्या कायद्यानें स्कूल-बोर्डे उघडण्यांत आलीं, व त्यांस खालील अधिकार मिळाले. ( १ ) शिक्षण-संस्थांच्या चरितार्थासाठीं स्थानिक कर बसविणें. ( २ ) चालू शाळा सुधारण्यास त्या पैशांचा उपयोग करणें ( ३ ) नवीं शाळागृहें बांधून नव्या शाळा उघडणें ( ४ ) शिक्षणाची फी ठरविणें ( ५ ) मुलांस शाळेंत जाण्याची सक्ती करणें. बोर्डाकडून चाललेल्या शाळांतून कोणत्याही एका धर्मपंथाचीं विशिष्ट मतें शिकवावयाचीं नाहींत असें ठरविण्यांत आलें; व ज्या ज्या शाळा सरकारी मदत घेऊन चाललेल्या असतील त्यांतूनही विशिष्ट धर्मपंथाचीं मतें शाळेचें काम सुरू होण्यापूर्वीं अगर झाल्यानंतर शिकवावीं व त्यावेळीं हजेरी अगदीं सक्तीची असूं नये असाही हुकूम काढण्यांत आला. १८७१ सालीं विद्यार्थ्यांनीं धार्मिक शपथ घेण्याचा निर्बंध काढून टाकण्यांत आला; त्यामुळें ऑक्सफर्ड व केंब्रिज येथील विद्यालयांत विद्यार्जन करण्यास रोमन क्याथॉलिक व डिसेंटर यांनाही मोकळीक मिळाली. पुढें १८९१ सालीं प्राथमिक शाळांतील शिक्षण मोफत करण्याचा कायदा पास झाला. त्या कायद्याअन्वयें शाळेंतील ३ पेन्सपर्यंतची फी सरकारी खजिन्यांतून देण्याचें ठरलें. स्कॉटलंडसंबंधीं १८७२ त कायदा होऊन स्कूलबोर्डें स्थापण्यांत आलीं, व १८९० त आणखी कायदा होऊन स्कॉटलंडांतील प्राथमिक शिक्षण मोफत करण्यांत आलें. आयर्लंडांतील प्राथमिक शिक्षण वीस कमिशनरांच्या देखरेखीखालीं असून त्यांतील दहा प्रॉटेस्टंट व दहा क्याथॉलिक असतात. तेथें स्कूलबोर्डांची पद्धति सुरू करण्यांत आली नाहीं. १९०२ सालीं इंग्लंडांतील प्राथमिक शाळांप्रमाणें दुय्यम शिक्षणसंस्थाही सरकारनें

प्रत्यक्ष आपल्या खर्चानें चालवावयाच्या किंवा सरकारी ग्रँट देऊन चालवावयाच्या अशा प्रकारचा शिक्षणाभिवृद्धीसाठीं पार्लमेंटानें शिक्षणाचा कायदा पास केला. या कायद्यानें स्कूल–बोर्डें रद्द करण्यांत येऊन प्राथमिक व दुय्यम शिक्षण कौंटी–कौन्सिल व बरो–कौन्सिल या स्थानिक संस्थांच्या ताब्यांत देण्यांत आलें. देशांतील सर्व शिक्षणावर देखरेख करण्याचें काम प्रिव्ही कौन्सिलच्या शिक्षण–कमिटीकडे १८९९ पर्यंत होतें. त्या सालीं शिक्षणमंडळ ( Board of Education ) स्थापिलें जाऊन त्याच्याकडे सर्व प्राथमिक व दुय्यम शिक्षणावर देखरेख ठेवावयाची व पार्लमेंटनें मंजूर केलेल्या पैशाचा शिक्षण–प्रसारार्थ योग्य खर्च करावयाचा हीं कामें आलीं. या मंडळाचा अध्यक्ष ( President ) सर्व शिक्षणाचा नियामक असून त्याचा बहुतकरून प्रधानमंडळांत अन्तर्भाव होतो.

**७ स्थानिक स्वराज्य**—१८८८ सालीं कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ ( १८८६–१८९२ ) असून लॉर्ड सॅलिस्बरी हा मुख्य प्रधान होता. त्यानें स्थानिक स्वराज्याचा कायदा पास केला. त्यामुळें कौन्टींच्या कारभाराची पद्धति पालटून ती लोकसत्ताक करण्यांत आली. तोंपर्यंत सरकारनें नेमिलेल्या लॉर्ड–लेफ्टनंट, शेरीफ, जस्टिस ऑफ दी पीस वगैरे अधिकाऱ्यांकडेच कौन्टींचा कारभार असे. या कायद्यानें इंग्लंडमध्यें बासष्ट कौन्टी, व साठ कौन्टी–बॅरो निर्माण करण्यांत येऊन कौन्टी–कौन्सिलें निर्माण करण्यांत आलीं व आल्डरमेन व कौन्सिलर ही अधिकार गाजविणारी मंडळी लोकांकडून निवडून यावयाचें ठरलें. सर्व स्थानिक गोष्टींवर या कौन्सिलची सत्ता असून स्थानिक करांची आकारणी व वसूल करणें, रस्ते व पूल बांधणें व व्यवस्थित ठेवणें, तुरुंगांची व्यवस्था करणें, पार्लमेंटच्या निवडणुकी करणें, इत्यादि सर्व महत्त्वाचीं कामें त्यांच्याच हातीं देण्यांत आलीं. लंडन शहराचे कितीतरी बरो व परगणे पाडण्यांत येऊन त्याची व्यवस्था अतिशय गुंतागुंतीची झाली होती. आतां लंडनची एक

---

१ ५०,००० हून अधिक लोकसंख्या असलेल्या शहरांस हें नांव देण्यांत आलें. १९१० सालीं इंग्लंडांत ७४ कौन्टी–बरो होतीं.

जादा कौन्टी करण्यांत आली, व तिची व्यवस्था बरीच सुलभ झाली. १८८९ त हीच पद्धति स्कॉटलंडांत सुरू करण्यांत येऊन १८९८ त आयर्लंडांतही तिचा अम्मल सुरू झाला. या प्रकरणांत सांगितलेल्या सुधारणांनीं स्थानिक बाबतींत व तसेंच सर्व राष्ट्राची संस्था जी पार्लमेंट तिच्याही बाबतींत लोकसत्तेचे पाऊल अत्यंत झपाट्यानें पुढें पडून इंग्लंड-देश नांवानें राजसत्ताक (Monarchy) असला तरी वस्तुतः लोकसत्ताक राज्यपद्धतीनें मांडित (Democracy) बनला !

---

# ६३ आयर्लंडच्या दुःखांचें निवारण.



**१ तीन प्रश्न**—१८२९ त रोमन क्याथॉलिक लोकांस ब्रिटिश पार्लमेंटाचे सभासद होण्याची परवानगी मिळून आयर्लंडचा रोमन क्याथॉलिक पुढारी डॅनिअल ओकॉनेल हा ब्रिटिश पार्लमेंटांत निवडून आला. हा आयर्लंडास मोठाच लाभ झाला. आयर्लंडची जनता रोमन क्याथॉलिक असून तिचीं तीन तऱ्हेचीं गाऱ्हाणीं होतीं. एक धर्मविषयक, दुसरें जमीनविषयक व तिसरें राजकीयसंबंधीं. या तिन्हींपैकीं पहिलीं दोन गाऱ्हाणीं आतां बहुतेक दूर झालीं असून तिसऱ्याचाही निकाल लागण्याचा रंग आहे. तेव्हां त्या तक्रारी कोणत्या व त्यांचा कसकसा निकाल लागला हें पाहूं.

**२ क्याथॉलिकांना जांच**—आयर्लंडची जनता क्याथॉलिक पंथाची होती. टयूडर राजे, स्टुअर्ट राजे–पहिला जेम्स व पहिला चार्लस, क्रॉम्वेल व शेवटीं तिसरा वुइल्यम यांच्या कारकीर्दींत इंग्लिश प्रॉटेस्टंटांच्या वसाहती करून आयर्लंडच्या क्याथॉलिक प्रजेचें निर्मूलन करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. परंतु त्यांत फारसें यश न येऊन उत्तरेकडचा अल्स्टर परगणा सोडला तर बाकी बहुतेक सर्व प्रजा क्याथॉलिकच राहिली. असें असतां आयर्लंडांत सरकारी धर्मखातें सुरू करण्यांत

येऊन त्यांत प्रॉटेस्टंट धर्मगुरूंची नेमणूक होई. हें प्रॉटेस्टंट धर्मखातें चालविण्यासाठीं आयर्लंडांतील रोमन क्याथॉलिक प्रजेवर टाइथ कर बसविण्यांत आला असून प्रॉटेस्टंट धर्मगुरू तो[1] शेतकऱ्यापासून मक्तेदारातर्फे वसूल करीत. हा कर आयर्लंडांतील रोमन क्याथॉलिक लोकांस अत्यंत अन्यायाचा वाटून त्यांनीं धर्मगुरूंना तो कर वसूल करणेंच अशक्य करून टाकण्याची चळवळ सुरू केली (१८२९). ती चळवळ शिथिल पाडण्यासाठीं पुष्कळ कडक कायदे करण्यांत आले. सार्वजनिक सभा भरविण्याची मनाई झाली. राजकीय गुन्हे केल्याच्या आरोपावरून पकडलेल्या लोकांस चौकशीसाठीं इंग्लंडांत आणण्यांत येऊं लागलें. व हेबिअस कॉर्पस ॲक्ट ( व्यक्तिस्वातंत्र्याचा कायदा ) पुनः पुनः तहकूब करण्यांत येऊन वाटेल त्या इसमास पकडावें व वाटतील तितके दिवस त्याला कोर्टापुढें न आणतां कैदेंत ठेवावें, असा निष्प्रतिबंध अधिकार पोलिसांस मिळाला. परंतु या सर्व कडक कायद्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. १८३२ सालीं एकंदर ९००० गुन्हे घडले; त्यांत २४२ खुनाचे होते. टाइथ कर वसूल करणें अशक्य होऊन प्रॉटेस्टंट धर्मगुरूंस उपास पडण्याची पाळी आली. शेवटीं ब्रिटिश पार्लमेंटनें आयरिश लोकांस उदारपणानें वागविण्याचें ठरविलें. १८३३ त आयर्लंडांतील धर्मखातें बरेंच कमी करण्यांत आलें व १८३७ सालीं टाइथ करच अजीबात रद्द करण्यांत आला. त्याच्याऐवजीं जमिनीवर आणखी कर बसवून तो सरकारनें जमीनदारापासून वसूल करावयाचा व धर्मगुरूंचा खर्च सरकारांतून चालावयाचा अशी पद्धति अमलांत आली.

**३ सरकारी धर्मखातें रद्द झालें**—या सुधारणेनें व्यक्तीच्या खिशांतून प्रत्यक्ष धर्मगुरूंच्या खर्चाकरितां पैसे जात ते बंद होऊन रयतेचे पैसे सरकारच्या मध्यस्थीनें त्यांस मिळूं लागले. तेव्हां या सुधारणेनें आयरिश लोकांचें पूर्ण समाधान झालें नाहीं; परंतु तात्पुरती शांतता झाली. या बाबतींत पूर्ण न्याय १८६८ सालीं मिळाला. त्या सालीं ग्लॅडस्टन

---

१ हा जमिनीच्या उत्पन्नाच्या एक दशांश असे.

मुख्य प्रधान झाल्यावर पार्लमेंटांत एक बिल पास झालें. त्यांत आयर्लंडांतील सरकारी धर्मखातेंच मोडून टाकण्याचा ठराव झाला. खासगी प्रॉटेस्टंट धर्ममंडळ शिल्लक राहिलें; परंतु त्यास सरकारी तिजोरींतून पैसा देऊं नये असें ठरलें. लॉर्ड्स सभेंत आयरिश प्रॉटेस्टंट बिशप बसत, त्यांचा तो हक्क नष्ट झाला. आयर्लंडांतील धर्माधिकाऱ्यांकडे न्यायकोर्टाप्रमाणें इनसाफाच्या कांहीं बाबी असत त्याही काढून घेण्यांत आल्या, व प्रॉटेस्टंट लोकांनीं खासगी रीतीनें जर धर्म-मंडळ स्थापिलें तर त्यास प्रॉटेस्टंट लोकांपुरत्या अधिकाराची सनद द्यावी परंतु त्याचा क्याथॉलिक लोकांवर कोणत्याही प्रकारचा बोजा पडूं नये असें ठरलें.

**४ शेतकऱ्यांच्या तक्रारी**—दुसरी तक्रारीची बाब म्हटली म्हणजे जमिनीची. हा प्रश्न टयूडर राजे, स्टुअर्ट राजे, व क्रॉम्वेल यांच्या वेळीं इंग्लंडांतील प्रॉटेस्टंट जमीनदारांस आयर्लंडांतील जमिनी दिल्यानें उत्पन्न झाला. आयरिश क्याथॉलिक लोक हे केवळ खंडकरी बनले. आयर्लंडांतील कारखान्यांविरुद्ध इंग्रज सरकारचे कायदे असल्यामुळें शेतकी हाच लोकांचा मुख्य धंदा होता. केवळ जमिनी खंडकऱ्यांस खंडानें दिल्या जात. शेतांचीं कुंपणें व इमारती खंडकऱ्यांस आपल्या स्वतःच्या खर्चानें करून घ्याव्या लागत. शिवाय खंड जबर असून खंडाच्या जमिनीचे तुकडे लहान असत. हिंदुस्थानांतल्याप्रमाणें पाऊस अनिश्चित असल्यामुळें नेहमीं पिकें बुडत. वाईट हंगामाचे वेळीं जमीनदारांचे गुमास्ते चालू खंडकऱ्याकडून खंड न आल्यास त्याची जमीन काढून घेत; व त्यानें केलेल्या शेतांतील कायमच्या सुधारणांबद्दल त्याला कांहीं एक मोबदला न देतां दुसऱ्या खंडकऱ्यास ते जमीन लावून देत. १८४६ पासून १८५० पर्यंत आयर्लंडांत इतका भयंकर दुष्काळ पडला कीं, लोकसंख्या वीस लक्षांनीं कमी झाली. आयरिश जमीनदारांपैकीं बरेच कर्जबाजारी होऊन त्यांनीं इंग्रज व स्कॉच जमीनदारांस आपल्या जमिनी विकून टाकिल्या; हे जमीनदार नेहमीं इंग्लंडांत रहात. त्यामुळें कुळांची निकृष्ट स्थिति त्यांच्या प्रत्यक्ष नजरेस येत नसे, व गुमास्त्यांच्या अरेरावीनें आयरिश शेतकऱ्यांचे अत्यंत हाल होत. अतिशय कडक अटींवर वहिवाटावयास घेतलेली जमी-

नही केव्हां हातांतून जाईल याचा नेम न राहून शेतकऱ्यांचें जीवित दुःसह झालें.

**५ शेतकऱ्यांच्या दुःखाचें परिमार्जन**—१८७० सालीं ब्रिटिश पार्लमेंटांत एक 'जमिनीचा कायदा' पास झाला. कुळास जमीनदारानें काढून लावावयाचें तर त्यानें केलेल्या कायमच्या सुधारणांबद्दल त्याची भरपाई करून दिली पाहिजे, व लायक कुळास सरकारी कर्ज घेऊन जमीनदारापासून जमीन विकत घेण्याचीही परवानगी असावी अशी त्याचीं कलमें होतीं. १८८१ सालीं जमिनीबाबद एक नवा कायदा झाला. या कायद्याचें मुख्य तत्त्व असें होतें कीं, जमिनीसंबंधीं कुळाला आपला हक्क विकतां यावा. जमीनदाराला केवळ आपल्या लहरीप्रमाणें कुळास काढून टाकतां येऊं नये व त्याजकडून खंड घ्यावयाचा तो जमिनीच्या मगदुराप्रमाणें घ्यावा, व तक्रार होईल तेव्हां योग्य खंड ठरविण्यास एक लँड-कोर्ट नेमावें. या कोर्टानें खंड पुष्कळ कमी केले. परंतु या कायद्यानें आयरिश लोकांचें समाधान झालें नाहीं. त्यांचा पुढारी पार्नेल याच्या अध्यक्षतेखालीं एक 'लँड–लीग' ( शेतकरी–संघ ) स्थापण्यांत आला होता ( १८७९ ऑक्टोबर ), त्या संघातर्फे खंड न देण्याचा जाहीरनामा काढण्यांत आला व आयर्लंडांत दंगेधोपे होऊं लागले. तेव्हां सरकारनें दडपशाहीचे कायदे केले आणि पार्नेल आदिकरून पुढाऱ्यांस कैदेंत घातलें ( १८८१ आक्टोबर ), व लँड–लीग बेकायदेशीर ठरविली. आयरिश लोकांचें असें म्हणणें होतें कीं, कुळाचा जमिनीवर मालकी हक्क आहे, असें उघड ठरवावें, व हें म्हणणें सरकार ऐकेपर्यंत जमीनदारास अडविण्याचा आयरिश लोकांनीं उद्योग चालू ठेविला. शेवटीं सरकारनें कुळांना मालकी–हक्क देण्याचें धोरण अमलांत आणिलें. १८९१ सालीं कॉन्झर्व्हेटिव्ह प्रधानमंडळ अधिकारारूढ असून बाल्फोर हा आयरिश सेक्रेटरी होता. त्यानें एक बिल पास करून घेतलें. या बिलाअन्वयें कुळास जमीनदाराकडून जमिनी विकत घेऊन स्वतः मालक बनविण्याचे कामीं मदत करण्याकरितां सुरवातीस तीन कोट रुपयांचा फंड काढण्याचें ठरलें. १९०३ सालीं याच धोरणावर आणखी पुढें पाऊल टाकण्यांत आलें.

त्या सालीं पास झालेल्या कायद्यानें जमीनदार लोकांकडून जमिनी विकत घेऊन कुळांस देण्याकरितां दहा कोट रुपये सरकारी खजिन्यांतून खर्च करण्यांत आले. मात्र हे रुपये कर्जादाखल असून कालांतरानें त्यांची फेड करून घेण्याचें धोरण अंगीकारण्यांत आलें. या कृत्यांनीं आयरिश लोकांस बऱ्याच सवलती मिळाल्या असून आज शेतकरी वर्गांत कांहींशीं शांतता नांदत आहे.

**६ राजकीय असंतोष**—आयर्लंडचें तिसरें मागणें म्हणजे १८०० सालीं पिटनें ज्या दोन्ही पार्लमेंट एक केल्या ती स्थिति बदलून आयर्लंडास स्वतंत्र पार्लमेंट मिळविण्यासंबंधींचें होय. याला पहिल्यानें 'रिपील'-ची ( Repeal ) चळवळ म्हणत; पण अलीकडे होमरूलची चळवळ हेंच नांव जास्त रूढ झालें आहे. १८२९ सालीं ब्रिटिश पार्लमेंटचा सभासद झाल्यावर ओकॉनेल यानें टाइथ कर रद्द करण्याच्या चळवळीबरोबर स्वतंत्र पार्लमेंटकरितां पहिल्यानें चळवळ सुरू केली. टोलेजंग सभा भरविण्यांत येऊन 'स्वतंत्र पार्लमेंट'चें ध्येय जाहीर करण्यांत येऊं लागलें. परंतु तें अधिकाऱ्यांस न रुचून १८४४ त ओकॉनेल वगैरे पुढाऱ्यांवर खटले करण्यांत आले व त्यांस तुरुंगांत टाकण्यांत आलें. १८४६ व १८४७ या सालांत भयंकर दुष्काळ पडला. १८४८ त सर्व युरोपखंडभर राजकीय हक्कासाठीं क्रान्तिकारक चळवळीचा धुमाकूळ माजला. तेव्हां आयर्लंडांतही स्मिथ ओब्रायन, डिलन, डफी वगैरे पुढाऱ्यांनीं बंड उभारलें. परंतु तें लहान प्रमाणावर असल्यामुळें तेव्हांच मोडण्यांत आलें. १८६५त अमेरिकन युद्ध संपल्यावर परत आलेल्या फिनियन लोकांनीं आयर्लंड स्वतंत्र करण्यासाठीं बंडें उभारलीं (१८७६). परंतु तीं तेव्हांच मोडण्यांत आलीं. पुढील सालीं इंग्लंडांत लिबरल पक्ष अधिकारारूढ झाला व मुख्य प्रधान ग्लॅडस्टन यानें आयर्लंडच्या तक्रारी दूर करण्याचें ठरविलें. १८७० त आयर्लंड देशाचा स्थानिक कारभार पाहण्यासाठीं एक स्वतंत्र पार्लमेंट डब्लिन येथें उघडावें अशी मागणी करण्याची होमरूलची सनदशीर चळवळ सुरू करण्यासाठीं एक संघ स्थापण्यांत आला. १८७९ सालीं जमीनदारांवर बहिष्काराचें शस्त्र सोडून आयरिश शेतकऱ्यांचीं दुःखें निवारण

करण्याकरितां लँड—लीग निघाली व त्याच्या पुढील सालीं "होमरूल"चा प्रश्न जोरानें पुढें आणण्याकरितां 'नॅशनल लीग' स्थापिली गेली.

**७ होमरूल बिलें**—याच सुमारास होमरूल पक्षाचा पुढारी पार्नेल यानें आयर्लंडच्या शंभर सभासदांपैकीं सुमारें ८० सभासदांचा संघ बनवून पार्लमेंटमध्यें नेहमीं विरुद्ध पक्षास मिळून अडवणुकीच्या मार्गानें प्रधानमंडळास भंडावून सोडण्याचें धोरण स्वीकारलें. इकडे आयर्लंडांत लँड—लीगच्या प्रोत्साहनानें हजारों गुन्हे होऊं लागले. तेव्हां सरकारनें ती लीग बेकायदेशीर ठरवून पार्नेल वगैरे पुढाऱ्यांस तुरुंगांत पाठविलें ( १८८१ आक्टोबर ). १८८२ सालीं ग्लॅडस्टननें उदार धोरण स्वीकारून पार्नेल व त्याचे अनुयायी यांस किल्मनहॅम तुरुंगांतून सोडिलें व त्यांनीं आयर्लंडची स्थिति सुधारण्यासाठीं कोणते उपाय योजावेत हा प्रश्न सोडविण्यांत प्रधानमंडळास मदत करण्याचें ठरविलें. फॉर्स्टर यानें राजीनामा दिल्यामुळें क्याव्हेंडिश यास आयर्लंडचा मुख्य मंत्री (Chief Secretary) नेमून त्याची त्या बेटांत रवानगी झाली. परंतु लवकरच क्याव्हेंडिश व आयर्लंडचा अंडर—सेक्रेटरी बर्क यांचे डब्लिन येथें फिनिक्स पार्कमध्यें दिवसाढवळ्या खून झाले ( ६ मे १८८२ ). त्यामुळें सुधारणांचें काम मागें पडून दडपशाहीचे कायदेच पास झाले. पार्नेलनें पार्लमेंटांत विरोध करून अडवणूक करण्याचें धोरण इतकें जोरानें अंमलांत आणिलें कीं, आयर्लंडचीं दुःखें निवारण करण्यापूर्वीं कोणताच कायदा प्रधानमंडळास पास करतां येऊं नये. विरोध करून लिबरल मुख्य प्रधान ग्लॅडस्टन यास राजीनामा द्यावयास लावण्याचें श्रेय "होमरूल"च्या पक्षानें घेतलें ( १८८५ जून ). त्याचप्रमाणें सात महिन्यांच्या आंतच कॉन्झर्व्हेटिव्ह सॅलिस्बरीस त्यानें राजीनामा द्यावयास लाविलें ( १८८६ फेब्रुवारी ). नंतर ग्लॅडस्टन होमरूल बिल पास करण्याचें कबूल करून मुख्य प्रधान झाला. ग्लॅडस्टननें होमरूलचा अंगीकार केला, तेव्हां लिबरल पक्षांच्या दोन फळ्या झाल्या. एक फळी ग्लॅडस्टनच्या हाताखालीं कायम राहिली व दुसरीस चेंबर्लेन हा पुढारी मिळून तिनें आयर्लंडचा संबंध ( Union ) कायम राखण्याचें धोरण स्वीकारल्यामुळें तीस लिबरल—यूनियनिस्ट असें नांव पडलें.

अशा रीतीनें लिबरल पक्षांत फूट पडली तरी ग्लॅडस्टननें न कचरतां आपलें पहिलें होमरूल बिल पार्लमेंटपुढें मांडिलें. परंतु लिबरल-यूनियनिस्ट कॉन्झर्व्हेटिव्हांना मिळाल्यानें कॉमन्स सभेंतच विरुद्ध पक्षाचें बहुमत झालें व बिल नापास झालें ( १८८६ ). या बिलानें आयर्लंडास वेगळें पार्लमेंट मिळावयाचें होतें. त्यामध्यें एकंदर ३०९ सभासद बसावयाचे असून त्याच्या बैठकी डब्लिनमध्यें व्हावयाच्या व लंडनमधील पार्लमेंटांत आयर्लंडनें सभासद पाठवावयाचे नाहींत अशी योजना होती. होमरूल बिल नापास झाल्यावर लोकमत अजमावण्यासाठीं पार्लमेंट बरखास्त करण्यांत आली. नव्या निवडणुकींत कॉन्झर्व्हेटिव्हांचें मताधिक्य झालें; तेव्हां ग्लॅडस्टननें राजीनामा दिला व कॉन्झर्व्हेटिव्ह प्रधानमंडळ अधिकारारूढ होऊन लॉर्ड सॅलिस्बरी मुख्य प्रधान झाला ( आगष्ट १८८६–१८९२) १८९२ च्या आगष्टांत ग्लॅडस्टन फिरून मुख्य प्रधान झाला; तेव्हां त्यानें आपलें दुसरें होमरूल बिल पार्लमेंटपुढें मांडलें. पहिल्या बिलांतील लोकांस नापसंत असलेलीं कलमें यांतून काढिलीं होतीं. यांतील नवीन योजना अशी होती कीं, आजपर्यंत ब्रिटिश पार्लमेंटांत आयरिश सभासद बसत तसे पुढेंही बसावेत; मात्र त्यांची संख्या १०३ च्या ऐवजीं ८० असावी; व केवळ ग्रेट ब्रिटनच्या ( इंग्लंड व स्कॉटलंड ) हितसंबंधाचे जे प्रश्न चर्चेस निघतील त्यांच्या चर्चेत त्यांनीं बोलूं नये. आयर्लंडला पूर्वीप्रमाणें नवीन पार्लमेंट द्यावें. कॉमन्ससभेंत हें बिल ३४ मतांनीं पास झालें; पण लॉर्डांच्या सभेनें ४१९ विरुद्ध ४१ मतांनीं तें बिल नामंजूर केलें व अशा तऱ्हेनें ग्लॅडस्टनचे आठ वर्षांचे श्रम व आयरिश लोकांनीं सुमारें वीस वर्षें चालविलेली चळवळ बहुतेक फुकट गेली. मध्यंतरीं आयरिश होमरूल पक्षाचा कर्तबगार पुंढारी पार्नेल हा मृत्यु पावला ( १८९१ आक्टोबर ). फिनिक्सपार्कमधील खुनास त्याची संमति होती असा आरोप टाइम्समध्यें त्याच्यावर करण्यांत आला ( १८८७ ). परंतु कमिशनपुढील चौकशींत पार्नेल निर्दोषी ठरला व त्याला नुकसान भरपाईबद्दल २५००० पौंड मिळाले ( १८९० ). यापुढें पार्नेलचा 'मिसेस ओशी' शीं असलेला प्रेमसंबंध उघडकीस आला. 'ओशी' या बाईच्या

नवऱ्यानें काडामोडे मागितली व कोर्टानें त्याचा अर्ज न्याय्य ठरविला पुढें पार्नेलनें 'मिसेस ओशी' हिजशीं विवाह लावला. मस्तानीच्या संबंधामुळें बाजीरावाच्या कार्यांत बिघाड झाला त्याप्रमाणें या 'ओशी' प्रकरणामुळें पार्नेलची अगदीं नाचक्की झाली व पुढें लवकरच झालेल्या त्याच्या मृत्यूमुळें तर आयरिश होमरूलचें अत्यंत नुकसान झालें.

---

# ६४ इजिप्त व सुदान साम्राज्यांत कशीं आलीं ?



**१ इजिप्तांत इंग्रजांचा शिरकाव**—व्हास्को डी गामा यानें १४९८ सालीं हिंदुस्थानास जलमार्ग शोधून काढला तेव्हांपासून युरोपियन लोकांना सर्व आफ्रिका खंडास वळसा घालून हिंदुस्थानांत यावें लागे. १८४५ सालीं 'पी अँड ओ' कंपनीनें तांबडा समुद्र व भूमध्यसमुद्र यांतून जहाजें नेण्यास सुरवात केली. या मार्गानें सुएझ गांवापासून अॅलेक्झॅन्ड्रियापर्यंत खुष्कीवरून प्रवास करावा लागे. पूर्वीं हिंदुस्थानांतून इंग्लंडला जाण्यास सहा महिने लागत, त्याऐवजीं या व्यवस्थेनें सहा आठवडे लागूं लागले. पुढें फर्डिनंड डी लेसेप्स या धाडसी फ्रेंच एन्जिनिअरनें सुएझचा कालवा खणून तांबडा समुद्र व भूमध्य समुद्र यांना जोडून टाकिले ( १८५९-१८६९ ). तेव्हांपासून इंग्लंड व हिंदुस्थान यांजमधील प्रवासास तीन आठवड्यांहून कमी वेळ लागूं लागला. सुएझचा कालवा इजिप्तच्या हद्दींत असल्यामुळें हा जलमार्ग सुरक्षित राहण्यास तो देश शांत स्थितींत असणें अवश्य झालें. मुख्यतः इंग्लंडास तर या मार्गाचा उपयोग करावयाचा असल्यामुळें इंग्लंडचा इजिप्तच्या सरकारशीं संबंध येऊं लागला. इजिप्त हा देश तुर्कस्थानच्या साम्राज्यांतील एक प्रांत असून इजिप्तचा राज्यकर्ता "खेदिव" हा कॉन्स्टान्टिनोपलच्या सुलतानाचा मांडलिक होता. या सुमारास इस्मायल हा खेदिव असून तो उधळ्या व चैनी असल्यामुळें कर्जबाजारी झाला होता. १८७५ सालीं इंग्लंडचा मुख्य प्रधान डिझरायली यानें या

कर्जबाजारी खेदिवपासून सुएझ कंपनीचे एक तृतीयांशाहून अधिक शेअर ४० लक्ष पौंडांस विकत घेतले. फ्रेंचांचेही बरेच शेअर होते. शिवाय पुष्कळ फ्रेंच व इंग्रज गृहस्थांनीं इस्मायलला कर्ज दिलें होतें. इजिप्तच्या सरकारचें दिवाळें निघण्याची वेळ आली, तेव्हां इंग्रज-फ्रेंचांनीं इस्मायलला गादीवरून काढून त्याच्या मुलाला खेदिव केलें व सांपत्तिक बाबतींत या दोन्ही सरकारांची इजिप्त देशाला घट्ट मगरमिठी बसली ( १८७९ ).

**२ इजिप्त अंकित झालें**—इंग्रज व फ्रेंच सरकारांनीं इजिप्तची सांपत्तिक बाबतींत सुस्थिति राखण्यासाठीं व राज्यांत व्यवस्था राखण्यासाठीं युरोपियन कामगार नेमण्यास इजिप्शियन सरकारास भाग पाडलें. हें इजिप्तमधील पुष्कळ लोकांस न आवडून इजिप्शियन सरकारचा युद्धमंत्री अरबी पाशा यानें परकीयांचें वाढत असलेलें प्रस्थ मोडून टाकण्याकरितां बंड उभारलें व युरोपियन कामगारांस कामावरून दूर केलें ( १८८२ ). यावर आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा उद्योग करण्यास फ्रान्स तयार होईना, व इजिप्तच्या दरबारांत आपलें वजन बसविण्याचें काम एकटया इंग्रजांवर येऊन पडलें. अरबी पाशानें इजिप्तच्या उत्तरेकडच्या ॲलेक्झांड्रिया बंदरास तटबंदी करण्याचें काम जोरांत चालविलें होतें. ११ जुलई १८८२ रोजीं इंग्लिश आरमारानें ॲलेक्झांड्रियावर दारूगोळ्याचा भडिमार करून बंदराची तटबंदी जमीनदोस्त केली. इकडे मुख्य प्रधान ग्लॅडस्टन यानें जनरल वूल्झ्ली याची इजिप्तवर रवानगी केली. तो सुएझ कालव्यावरील इस्मायल या ठाण्याहून इजिप्तची राजधानी जें केरो शहर त्यावर चाल करून जाऊं लागला. वाटेंत तेलेलकाबीर येथें अरबी पाशाच्या सैन्याशीं इंग्रजांची गांठ पडली. युद्ध झालें, त्यांत इजिप्शियन सैन्याचा पुरा मोड होऊन अरबी कैद झाला. अरबीस पहिल्यानें फांशीची शिक्षा फर्माविण्यांत आली होती. परंतु शेवटीं सीलोनमध्यें त्याला काळ्या पाण्यावर पाठवि-

१ हल्लीं या इंग्रज सरकारच्या मालकीच्या १७६,६०२ शेअरांची किंमत सुमारें तीन कोट पौंड असून त्यावरील दरसालच्या व्याजाचें दहा लक्ष पौंडांहून अधिक उत्पन्न इंग्रज सरकारास येतें.

ण्यांत आलें; ब्रिटिश सैन्य इजिप्तांत शांतता व व्यवस्था राखण्यासाठीं राहिलें व त्यानें लवकरच दंग्याचीं पाळेंमुळें खणून काढिलीं. तथापि त्या-नंतरही तें परत नेण्यांत आलें नाहीं. फ्रान्सला आपल्या साथीदाराच्या या कृत्याचा मत्सर वाटून त्यानें ब्रिटिश सैन्य इजिप्तमध्यें तसेंच ठेवण्या-विरुद्ध तक्रार केली; त्यावर ग्लॅडस्टननें उत्तर केलें "सुरक्षितता व शांतता इजिप्तमध्यें पूर्णपणें प्रस्थापित झाली म्हणजे आमचें सैन्य तेथें कशाला राहतें आहे ? आम्ही तें तेव्हांच परत नेऊं." परंतु त्या बंडास ३८ वर्षें होऊन गेलीं तरी इंग्रज सैन्य अजून इजिप्तांत आहेच !

**३ सुदान प्रांत**—इजिप्तच्या दक्षिणेस सुदान प्रांत आहे. त्यांतून इजिप्तांत नाईल नदी वहात गेली आहे. इजिप्शियन सरकारनें या प्रांताशीं व्यापार सुरू करून तेथील गुलामांचा व्यापार बंद करण्याचाही उद्योग आरंभिला होता. व्यापाऱ्यांचें रक्षण करण्यासाठीं सुदानमध्यें इजिप्शियन सरकारनें लष्करी ठाणीं बसविलीं होतीं. तेथील मूळच्या लोकांस हें पसंत न पडून त्यांच्या पुढाऱ्यानें महदी ( देवदूत ) हें नांव घेऊन बंडाचें निशाण उभारिलें. त्याच्या हाताखालीं ४०,००० लोक जमले व कांहीं तटबंदीच्या ठाण्यांखेरीज सर्व सुदान प्रांत त्याच्या हस्तगत झाला. तेव्हां जनरल हिक्स याच्या हाताखालीं कांहीं सैन्य इजिप्शियन सरकारनें आपल्या लोकांच्या बचावाकरितां पाठविलें. त्या सैन्याचा महदीनें चक्काचूर उड-विला ( १८८३ आक्टोबर ३ ). ग्लॅडस्टननें सुदान देश सोडून देण्या-विषयीं इजिप्शियन सरकारास कळविलें. त्या सरकारनें ही गोष्ट कबूल केली. व ठाण्यांतील लोकांस बचावून परत आणण्यासाठीं जनरल गॉर्डन याची रवानगी केली. आपण हें काम स्वतःच्या वजनानें करूं अशी गॉर्डनला खात्री वाटत असल्यामुळें बरोबर सैन्य न घेतां तो नाईल नदीं-तून तसाच सुदानमध्यें गेला. परंतु लवकरच त्याला 'खार्टूम'मध्यें महदीच्या लोकांनीं कोंडिलें व त्याला बाहेर निघणें शक्यच राहिलें नाहीं. त्यानें इंग्लंडांत नवें सैन्य पाठविण्याविषयीं लिहिलें व पांच महिनेपर्यंत मोठ्या शौर्यानें त्या ठाण्यांत आपला बचाव केला. इंग्लिश प्रधानमंडळांत तंटा पडल्यामुळें त्याच्या मदतीस सैन्य जरा उशिराच निघालें. लॉर्ड वूल्झ्ली

इजिप्तमध्यें उतरून क्यानडांतील हुशार बोटवाल्यांच्या साहाय्यानें नाईल नदींतून मार्ग काढीत गॉर्डनच्या सोडवणुकीला चालला. परंतु तो खार्टूमपासून शंभर मैलांच्या आंत जातो न जातो तोंच त्याला अशी बातमी लागली कीं, एक दोन दिवसांपूर्वी खार्टूम महदीच्या लोकांच्या हातीं पडलें व सर्व शिबंदीची कत्तल उडाली असून खुद्द जनरल गॉर्डन यासही ठार करण्यांत आलें आहे ( २५ जानेवारी १८८५ ). मग इंग्रज फौज इजिप्त व सुदान यांच्या सरहद्दीवरील वाडीहाफा या गांवीं परत आली व सुदान प्रांत सोडून दिला असल्याचें इजिप्शियन सरकारनें जाहीर केलें. परंतु ही व्यवस्था तात्पुरती आहे असें जाहीर करण्यांत आलें.

**४ खार्टूमचा लॉर्ड किचनेर**—पुढें १८९५ पर्यंत सुदानप्रांताशीं इंग्रजांचा संबंध आला नाहीं. त्यावेळीं सुदानमधील लोकांचा पुढारी महदी हा वारला होता व त्याच्या जागीं खलिफा हा पुढारी झाला होता. तो इजिप्तवर स्वारी करून येणार अशी बातमी इंग्रजांस समजली. तेव्हां इजिप्शियन लोकांचें सैन्य युरोपियन कवाईत शिकवून तयार करण्यांत आलें होतें, त्याच्या मदतीस इंग्रज सोल्जर घेऊन जनरल किचनेर सुदान प्रांत जिंकण्याकरितां निघाला ( १८९६ ). दोन वर्षेपर्यंत नाईल नदींतून व तिच्या भोंवतालच्या भयंकर जंगलांतून तो आपला मार्ग काढीत होता. अशा रीतीनें मुलूख पादाक्रांत करीत असतां त्यानें रेल्वे बांधण्याचें काम आपल्या कुचाबरोबरच चालविलें होतें. इजिप्तची राजधानी केरो याशीं आपला संबंध तुटूं नये हा त्याचा त्यांत उद्देश होता. 'खलिफा'च्या सैन्याची व किचनेरची खार्टूमच्या समोर ऑम्डुर्मान येथें गांठ पडली. लढाई मोठ्या निकराची झाली ( १८९८ ). शेवटीं खलिफाचें सैन्य जेर होऊन पळून गेलें. मग विजयी इंग्लिश सैन्यानें खार्टूममध्यें जयोत्साहानें प्रवेश केला. ज्या जागीं गॉर्डनला ठार मारण्यांत आलें होतें तेथें सर्व इंग्रज सैन्यासमक्ष दफनाची प्रार्थना झाली, आणि जनरल किचनेर यास 'लॉर्ड किचनेर ऑफ खार्टूम' असा किताब मिळाला.

**५ इंग्रज-फ्रेंचांमध्यें वांटणी**—याच सुमारास फ्रेंच सरकारनें

कांगो संस्थानांतून वर सुदानमध्यें प्रवेश करण्यासाठीं मेजर मार्चंड यास हाताखालीं कांहीं सैन्य देऊन पाठविलें. इजिप्शियन सरकारनें सुदान सोडिलें तेव्हां आतां त्यांत वसाहत करण्यास हरकत नाहीं ही समजूत यास कारण होती. शेवटीं असा योगायोग झाला कीं, ज्या दिवशीं लॉर्ड किचनेर विजय मिळवून खार्टूममध्यें शिरला, त्याच दिवशीं मार्चंडनेंही दक्षिणेकडे चारशें मैलांवर नाईल नदीच्या तीरच्याच फाशोडा या ठाण्यांत प्रवेश केला. तथापि इंग्रज व फ्रेंच हे दोघेही पक्के स्वार्थदक्ष असल्यामुळें त्यांनीं आपसांत ठराव करून आपआपली 'लूट' ठरवून टाकिली. नाईल नदीच्या उगमाजवळील पश्चिम भाग फ्रेंचांच्या छायेखालीं राखण्याचें ठरवून नाईल खोऱ्यावरचा सर्व हक्क फ्रेंचांनीं सोडावा असें ठरलें (१८९९). याच सालीं खलिफा यास ठार मारण्यांत येऊन सर्व इजिप्शियन सुदान कागदोपत्रीं इजिप्तच्या परंतु वस्तुतः इंग्रजांच्या कायमचें ताब्यांत आलें. लॉर्ड क्रोमर हा ब्रिटिश एजंट म्हणून इजिप्तमध्यें राहिला. इजिप्तमध्यें नाईलच्या तीरीं असुआन या नांवाचें एक ठिकाण आहे. क्रोमरनें तेथें एक मोठा तलाव बांधून नाईलला पूर आला कीं त्यांत पाणी सांठविण्याची व्यवस्था केली. या कामास ४ वर्षे लागलीं. त्यामुळें इजिप्तचा सांपत्तिक दृष्ट्या फार फायदा झाला. १९०७ सालीं लॉर्ड क्रोमर इजिप्तमधील काम सोडून परत गेला. नंतर त्याच्या जागीं १९११ सालीं लॉर्ड किचनेर याची नेमणूक झाली.

**६ आफ्रिका खंड**—आफ्रिका खंडांत एकंदरीनें वस्ती थोडी, आणि तीही रानवट लोकांची होती. तेव्हां लवकरच त्या खंडांत युरोपमधील जोरदार लोक शिरून आफ्रिकेचे तुकडे पाडून युरोपांतील निरनिराळ्या प्रबळ प्रसरणशील राष्ट्रांनीं तें खंड व्यापून टाकिलें. त्यांपैकीं दक्षिण आफ्रिकेंत इंग्रजांची कशी वसाहत झाली व तिचा पुढें कसकसा वृत्तांत झाला, याची माहिती पुढील प्रकरणांत येईल. या खंडाच्या अगदीं उत्तरेकडचे इजिप्त व सुदान हे देश इंग्रजांच्या कसे ताब्यांत गेले हें नुक्तें सांगितलेंच. आतां पूर्व आफ्रिका व पश्चिम आफ्रिका यांत इंग्लिशांनीं कसा मुलूख मिळविला तें पाहूं.

**७ आफ्रिकेंतील इतर वसाहती**—एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात आफ्रिका खंडाचा अन्तर्भाग अज्ञात होता. १८४१ नंतर डेव्हिड लिव्हिंग्स्टन व त्याचा मित्र स्टॅन्ले या दोन मिशनऱ्यांनीं आफ्रिकेंत प्रवास करून मध्य आफ्रिकेंत असलेलीं नियासा व टांगानिका हीं दोन सरोवरें शोधून काढलीं. पुढें स्टॅन्लेनें आणखी उत्तरेकडे जाऊन व्हिक्टोरिया नियांझा व आल्बर्ट नियांझा हीं नाईल नदीवरील सरोवरें शोधिलीं. यापुढें आफ्रिकेकडे इतर युरोपियन लोकांचें लक्ष वेधून १८८४ सालीं आफ्रिकेंत मुलूख मिळविण्यासाठीं युरोपियन राष्ट्रांत जोराची चढाओढ सुरू झाली. या झगड्यांत इंग्लंड मोठ्या उत्साहानें शिरलें व दहा वर्षांच्या आंत एक तृतियांश युरोपयेवढा भाग त्यानें कमाविला ! हल्लीं ज्याला युगांडा म्हणतात त्या पूर्व आफ्रिकेच्या भागांत युरोपियन मिशनरींनीं वसति केली. परंतु नेटिव्हांशीं त्यांचीं भांडणें होऊं लागलीं. पूर्व आफ्रिकेशीं व्यापार करण्यासाठीं ' ब्रिटिश ईस्ट आफ्रिका ' कंपनी स्थापिली होती. तिचा नोकर क्याप्टन लुगार्ड याची ( १८९० ) नेटिव्ह राजांशीं तह करण्याकरितां रवानगी करण्यांत आली. पुष्कळ खलबत होऊन शेवटीं १८९१ त युगांडा व ब्रिटिश ईस्ट आफ्रिका हे दोन प्रांत ब्रिटिश साम्राज्याचे संरक्षित प्रदेश बनले. पश्चिम आफ्रिकेंतही इंग्रजांचे उद्योग सुरू होते. ग्यांबिया, व सिएरा लिओने या प्रांतांत व्यापारी कंपन्या स्थापिल्या गेल्या. पुढें थोड्याच काळांत हे प्रांत ब्रिटिश साम्राज्यांत सामील झाले. गोल्ड कोस्ट या प्रांताची हकीकत मनोरंजक आहे. इंग्रजांची वस्ती किनाऱ्याला असून आंत अशांटी लोक रहात. ते इंग्रजी मुलुखावर स्वाऱ्या करीत. १८७४ त जनरल वूल्झ्ली हा त्यांची राजधानी कुमासी हिजवर चालून गेला. शहराजवळच युद्ध चालू असतां अशांटींचा राजा सोन्याच्या खुर्चीवर बसून युद्ध पहात होता. युद्धांत अशांटींचा पराभव झाला. आणखी कांहीं वर्षांनीं अशांटी फिरून गडबड करूं लागले. तेव्हां बंड मोडून अशांटींचा मुलूख गोल्ड कोस्टला जोडण्यांत आला. नायजर नदीजवळील मुलूख अलीकडे ब्रिटिश साम्राज्यांत सामील झाला आहे. नायजर नदीच्या मुखाजवळ लागोस हें ठाणें इंग्रजांचे

ताब्यांत होतें. ' आफ्रिकेसाठीं धडपड ' सुरू झाल्यावर फ्रेंचांनीं आपल्या सेनिगाल व आयव्हरी कोस्ट या ठाण्यांपासून निघून पश्चिम आफ्रिकेंतील अन्तर्प्रदेश व्यापून ग्याम्बिया व सिएरा लिओने या ब्रिटिश ठाण्यांचा विस्तार बंद करून टाकिला! तेव्हां इंग्रज जागे झाले व लागोस ठाण्यावर तसा प्रसंग येऊं नये म्हणून नायजर नदींतून वर जाऊन त्यांनीं तिचें खोरें व्यापिलें. तेव्हां फ्रेंचांची कुरबुर सुरू झाली; पुढें बऱ्याच वाटाघाटीनंतर से ठाण्यापासून दक्षिणेचा प्रदेश इंग्रजांच्या मालकीचा ठरला (१८९८). हाच नायजीरियाचा संरक्षित प्रदेश होय.

---

# ६५ दक्षिण आफ्रिकेंतील वसाहती.

## बोअर-युद्ध १८९९-१९०२.



**१ बोअरांचें स्थलांतर**— आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास केप ऑफ गुड होप आहे. त्या प्रांतांत डचांची 'केप कॉलनी' ही वसाहत होती. नेपोलियनशीं युद्ध चाललें असतां १८०६ सालीं इंग्रजांनीं ही वसाहत आपल्या ताब्यांत घेतली. त्या वेळीं तींत सुमारें २७००० गोरे लोक रहात असून त्यांच्यापैकीं बहुतेक डच वंशाचे होते. ते आपल्याला बोअर ( शेतकरी ) म्हणवीत. त्यांचा धंदा शेतकीचा असल्यानें त्यांची वस्ती विस्कळित होती, व ते अडाणी होते. ते युरोपपासून दूरवर असल्यामुळें आपल्यावर युरोपियन राष्ट्रांचा ताबा असावा हें त्यांना मुळींच आवडत नव्हतें. आफ्रिकेतील रानटी लोक व हिंस्र पशु यांच्याशीं नेहमीं प्रसंग पडल्यामुळें ते युद्धांत तरबेज रहात. शेतावर 'गुलाम' ठेवून धंदा करण्याची त्यांची वहिवाट होती. इंग्लिशांनीं १८०६ त ती वसाहत घेतली तेव्हां इंग्लिश मिशनरी तेथें जाऊन राहूं लागले. त्यांच्याशीं व वसाहतींत इंग्रजांनीं ठेविलेल्या अधिकाऱ्यांशीं या बोअरांचें पटेना. १८३३

व ३४ सालीं ब्रिटिश साम्राज्यांतील गुलामगिरी जेव्हां बंद करण्यांत आली तेव्हां बोअरांचे ३९००० गुलाम स्वतंत्र झाले. त्याचा मोबदला म्हणून आपल्याला जी रक्कम मिळावयास पाहिजे असा बोअरांचा अंदाज होता त्याच्या निम्मीच रक्कम त्यांना मिळाली. या कारणानें तर बोअर लोकांचीं मनें इंग्रजांविरुद्ध जास्तच कलुषित झाली. याच वर्षीं काफीर लोकांशीं युद्ध सुरू करून त्यांचा मुलूख केप कॉलनीस वसाहतवाल्यांनीं जोडला. हें युद्ध गोऱ्या लोकांनींच आपण होऊन उकरून काढिलें असें साम्राज्य सरकारचें मत होऊन त्यानें जोडिलेला मुलूख काफिरांस परत देवविला. यानें बोअरांच्या रागांत अधिकच भर पडली. शेवटीं बोअरांनीं इंग्लिशांच्या ताब्यांतून मोकळे होण्यासाठीं स्थलांतर करण्याचें ठरविलें. १८३६ त ३८००० बोअर लोकांनीं आपलें सर्व सामान बैलगाड्यांत भरून उत्तरेकडे प्रयाण केलें. कांहींनीं ऑरेंज नदी व व्हाल नदी यांच्यामधील प्रदेशांत वसाहत केली. व कांहीं जणांनीं त्याच्याही पुढें जाऊन व्हाल नदीच्या उत्तरेस लिंपो नदीपर्यंत वसाहती केल्या. यांपैकीं व्हाल नदीच्या उत्तरेकडील वसाहतीस ट्रान्सवाल नांव पडलें, व ऑरेंज व व्हाल यांजमधील वसाहतीस 'ऑरेंज फ्री स्टेट' हें नांव पडलें. १८३८ ते १८४२ पर्यंत बरेच लोक पूर्व बाजूस नाताळांत वस्ती करावयास गेले; पण तो प्रदेश इंग्रजसरकारच्या ताब्यांतील आहे हें पाहून ते परत ट्रान्सवॉलांत व ऑरेंज फ्री स्टेटमध्यें परत गेले. या वसाहती बोअरांनीं केल्या तेव्हां ते वस्तुतः स्वतंत्र झाले व केप कॉलनींतील वसाहतसरकारनें कोणत्याही प्रकारें त्यांच्या कामांत हात घातला नाहीं. परंतु त्या वेळच्या इंग्लिश कायद्याप्रमाणें मनुष्यास आपलें राष्ट्रीयत्व बदलतां येत नाहीं, या नियमास धरून साम्राज्य सरकारनें ते ब्रिटिश प्रजाजन आहेत हा आपला हेका कायम ठेविला, व त्यांच्या देशावर ब्रिटिश साम्राज्याचा हक्क असल्याचें बोलणें सुरू केलें. १८५२ त केप कॉलनीचें काफीर लोकांशीं युद्ध सुरू झालें. त्या वेळीं ट्रान्सवालांतील बोअर लोकांशीं ब्रिटिश सरकारचा 'सँड रिव्हर कन्व्हेन्शन' हा तह होऊन त्यांत ट्रान्सवालांत गुलामगिरी चालू ठेवूं नये या अटीवर ट्रान्सवालचें स्वातंत्र्य इंग्रज-

सरकारनें कबूल केलें. १८५४ त 'ब्लूमफाँटाइन कन्व्हेन्शन' हा तहनामा होऊन ऑरेंज फ्री स्टेटचेंही स्वातंत्र्य इंग्रज सरकारनें मान्य केलें.

**२ बोअर स्वतंत्र झाले**—इंग्रजांनीं ट्रान्सवालचें स्वातंत्र्य कबूल केलें खरें. परंतु तेथील लोकांना स्वतंत्रतेनें आपलें राज्य मुळींच चालवितां येईना. प्रजा विस्कळित असून एका ठिकाणीं स्थायिक नसे. सरकारास गोरे लोक व नेटिव्ह प्रजा या दोघांवरही दाब ठेवितां येईना. आपले कायदे अंमलांत आणण्याचें काम सरकारच्या हातून होईना, व कर वसूल करण्याचें कामही नीट चालेना. लगतच्या प्रांतांतील प्रबळ झुलू राजा केटेवायो हा ट्रान्सवालवर हल्ला करण्यास केव्हां संधि मिळते यासाठीं टपला होता. तेव्हां ट्रान्सवालांतील पुष्कळ नागरिकांच्या विनंतीवरून साम्राज्यवादी कॉन्झर्व्हेटिव्ह प्रधानमंडळानें १८७७ च्या एप्रिलांत तो देश फिरून ब्रिटिश साम्राज्यास जोडिला; तरी नव्या अधिकारी-मंडळांत पूर्वीच्या अधिकाऱ्यांपैकीं एक सोडून बाकी सर्वांनीं जागा पत्करिली. पॉल क्रूगर व त्याचे अनुयायी यांस मात्र ही घडामोड पसंत न पडून त्यांनीं १८८० च्या डिसेंबरांत ट्रॉन्सवालचें स्वातंत्र्य जाहीर केलें. त्यावर दोन्ही पक्षांत लढाई झाली. माजुबा टेंकडीवर इंग्रजांच्या फौजेस अचानक गांठून बोअर लोकांनीं तिचा पुरा मोड केला ( १८८१ मार्च ). या वेळीं उदारमतवादी ग्लॅडस्टन हा मुख्य प्रधान होता. त्यानें बोअर लोकांची नाखुषी लक्षांत घेऊन त्यांना बहुतेक स्वतंत्र करण्याचें ठरविलें. ऑगष्टांत प्रिटोरिया कन्व्हेन्शनचा तहनामा झाला. त्यांत 'बादशहाच्या अधिराज्याखालीं' बोअरांस पूर्ण स्वराज्य देण्याचा ठराव झाला. यावरही बोअरांची थोडथोडी कुरकुर होतीच. तेव्हां १८८४ सालीं 'लंडन कन्व्हेन्शन' हा नवा तहनामा झाला; त्यांत "बादशहाच्या सत्तेखालीं" हेही शब्द काढून टाकण्यांत आले! बोअरांनीं ऑरेंज फ्री स्टेटखेरीज इतर कोणाही राष्ट्राशीं तह केला तो ब्रिटिश सरकारची मान्यता मिळण्यापूर्वीं कायम करूं नये एवढीच अट बोअर लोकांस ठेविली. ट्रान्सवालची राजधानी प्रिटोरिया ही असून तेथें बोअरांचें लोकसत्ताक राज्य झालें, व त्याचा पॉल क्रूगर हा अध्यक्ष झाला.

**३ नूतनागत** ( Outlanders )—ऑरेंज फ्री स्टेटमधील बोअर लोक १८५४ पासून स्वतंत्र लोकसत्ताक राज्याचा उपभोग घेत होते. १८६७ पर्यंत त्या प्रांतांत स्वस्थता होती. परंतु त्या सालीं आरेंज नदीच्या वाळवंटांत हिरे सांपडूं लागले. तेव्हांपासून ब्रिटिश लोक भराभर येऊन तेथें वसाहत करूं लागले. लवकरच मोठमोठाल्या खाणी चालू झाल्या. किंबर्ले हें नवें शहर वसलें गेलें, व्यापार वाढला, आगगाडीचे रस्ते झाले व पुष्कळच लोकवस्ती वाढली. शेवटीं 'ग्रीक लँड ' जिल्हा ब्रिटिश सरकारचा असें ठरवून केप कॉलनींत सामील करण्यांत आला. १८८५ त ट्रान्सवालांत सोन्याच्या खाणी सांपडल्या. तेव्हांपासून लोकसंख्या इतकी वाढली कीं, थोड्याच काळांत परकीय लोकांची संख्या मूळ बोअर वसाहतवाल्यांच्या सहापट झाली. तथापि बोअर लोकांनीं या नवीन लोकांस नागरिकत्वाचे हक्क देण्याचें साफ नाकारिलें. त्यांच्या उद्योगधंद्यांवर जबर कर बसविले, व खाणींतील जिनसांवर सरकारचे मक्ते ठराविले. राज्यकारभारांत शिरून आपलीं दुःखें दूर करावीं असें मनांत आणून या नूतनागत लोकांनीं देशांतील नागरिक बनण्याच्या अटींत दुरुस्ती करण्यास सरकारास आग्रह केला. परंतु अध्यक्ष क्रूगर यानें या लोकांचें म्हणणें मुळींच ऐकिलें नाहीं. सोन्याच्या खाणी प्रिटोरिया राजधानीजवळज दक्षिणेस असून त्यांतील काम करणाऱ्या लोकांचें जोहान्सबर्ग म्हणून शहर लवकरच भरभराटलें. बोअर सरकार ऐकत नाहीं हें पाहून आपले हक्क सरकारास सक्तीनें कबूल करण्यास भाग पाडावयाचा जोहान्सबर्गमधील नूतनागत इंग्लिशांनीं बेत केला ( १८९५ ).

**४ जेम्सनचा हल्ला**——त्या वेळीं सेसिल ऱ्होड्स हा केप कॉलनीचा मुख्य प्रधान असून तो मोठा कर्तबगार व हुशार होता. साऊथ आफ्रिका कंपनी या नांवाची ट्रान्सवालच्या उत्तरेकडील प्रदेशांशीं (हल्लींचा ऱ्होडेशिया) व्यापार करण्यासाठीं एक कंपनी निघाली होती. तिचा ऱ्होड्स हा अध्यक्ष होता. ऱ्होड्सनें एकदां तर फारच साहसाचें कृत्य केलें. मॅटबेल नांवाच्या रानटी लोकांनीं ऱ्होडेशियांत बंड केलें. व त्यांनीं मॅटोपो टेकडीवर तळ

दिला. या वेळीं ऱ्होड्स थोडकेसे लोक बरोबर घेऊन विनशस्त्र शत्रु-सैन्यांत गेला व म्हणाला " तुमचीं गाऱ्हाणीं मजजवळ सांगा, मी शांतता करण्याचें मनांत आणून तुमच्यांत निःशस्त्र आलों आहें " त्यांच्या तक्रारी ऐकल्यावर ऱ्होड्सनें त्यांना विचारिलें, ' तुम्हांस लढाई करावयाची आहे कां शांततेनें वागावयाचें आहे ?' त्यांच्या नायकांनीं ऱ्होड्सच्या पायावर शस्त्रें ठेविलीं व लढाई थांबली. असें ऱ्होडसचें विलक्षण साहस होतें. जोहान्सबर्गमधील लोकांनीं ऱ्होड्सची मदत मागितली व त्यानें साऊथ आफ्रिकन कंपनीचे पंधराशें घोडेस्वार क्याप्टन जेम्सन ह्याच्या हाताखालीं त्यांच्या मदतीस पाठविण्याचें ठरविलें. दक्षिण आफ्रिकेंतील वसाहती एक करून दक्षिण आफ्रिकेचें एकच राज्य करून टाकावें अशी ऱ्होड्सची महत्त्वाकांक्षा होती; व या जोहान्सबर्गमधील लोकांस मदत केली तर त्याचा शेवट ट्रान्सवाल ब्रिटिश साम्राज्यांत फिरून अन्तर्भूत होण्यांत होईल असें ऱ्होड्सला वाटत होतें. परंतु जेम्सननें ठरलेल्या मुदतीच्या अगोदर घाई करून थोड्या लोकांनिशीं ट्रान्सवालवर स्वारी केली. त्यामुळें तो जोहान्सबर्गला पोंचण्यापूर्वींच बोअर सरकारनें त्याला सर्व लोकांसह पकडिलें. अध्यक्ष क्रूगर यानें जेम्सनला शिक्षा करण्यासाठीं ब्रिटिश सरकारच्या हवालीं केलें व या स्वारीस असलेली ऱ्होड्सची मदत उघडकीस आली. साम्राज्य–सरकारनें हीं कृत्यें आपणांस मुळींच पसंत नसल्याचें जाहीर केलें. तेव्हां ट्रान्सवालमधील नूतनागतांची स्थिति ज्यास्तच वाईट झाली.

**५ युद्धाची तयारी**—१८९९ च्या मार्च महिन्यांत वीस हजार नूतनागतांनीं इंग्लंडांतील ब्रिटिश सरकाराकडे आपलीं दुःखें दूर करण्याविषयीं अर्ज केला. नंतर त्यावेळचा वसाहतींचा प्रधान जोसेफ चेंबर्लेन याचा, अध्यक्ष क्रूगर याशीं, त्या प्रश्नासंबंधीं पत्रव्यवहार सुरू झाला. पुष्कळ वेळ बोलणीं सुरू होतीं. परंतु तंटा मिटण्याचें चिन्ह कांहींच दिसेना. तेव्हां बोलणें चालू असतांच दोन्ही बाजूंनीं युद्धाची तयारी चालविली. बोअरांनीं युरोपांतून उत्तम तोफा व बंदुका आणविण्याचा सपाटा चालविला होता; युद्धांत आपल्या बाजूनें लढण्याविषयीं ऑरेंज

फ्री स्टेटशीं तह करून केप कॉलनी व नाताळ या दोन्ही ब्रिटिश वसाहतींतील आपल्या डच जातभाईस चेतविण्याचीही खटपट त्यांनीं चालविली. साम्राज्यसरकारनेंही बोअरांची तयारी पाहून उन्हाळ्यांत केप कॉलनी व नाताळ या दोन्ही ठिकणच्या फौजेस मदत म्हणून आणखी सैन्य उतरविलें. या कृत्यानें बोअर लोक क्षुब्ध झाले, व अध्यक्ष क्रूगर यानें साम्राज्यसरकारास अठ्ठेचाळीस तासांची मुदत देऊन निर्वाणीचा खलिता (Ultimatum ) पाठविला ( १८९९ आक्टोबर ९ ). त्यांत युद्धाची तयारी एकदम बंद करून तंट्याच्या मुद्यांचा निकाल करण्याची मागणी केली होती. यावर चेंबर्लेननें उत्तर पाठविलें कीं, 'या अटी अशा आहेत कीं, साम्राज्य सरकार त्या विचारांत घेऊं इच्छित नाहीं.' त्याबरोबर बोअर लोकांनीं नाताळावर स्वारी केली. या युद्धांत ऑरेंज फ्री स्टेट बोअरांस मिळाली, व तिनेंही इंग्रजांशीं युद्ध जाहीर केलें.

६ **इंग्रजांचा पराभव**--संयुक्त पक्षानें-ट्रान्सवाल व ऑरेंज फ्री स्टेट-युद्ध इंग्रजांच्या मुलखांत व्हावें अशी व्यवस्था केली. सैन्याची एक तुकडी नाताळांत पाठवून दुसऱ्या तुकड्यांनीं पश्चिमेकडे किंबर्ले व मॅफेकिंग या दोन ब्रिटिश ठाण्यांस वेढा दिला. पहिल्यानें इंग्लिशांची चांगली तयारी नव्हती. तेव्हां लवकरच नाताळचा उत्तर भाग पादाक्रांत करून जनरल व्हाइट यास बोअरांनीं लेडिस्मिथ येथें कोंडिलें. किंबर्लेमध्यें खुद्द ऱ्होड्सच सांपडला होता. व मॅफेकिंगमध्यें बेडेन पॉवेल हा शत्रूच्या मोठ्या सैन्यासही दाद न देतां त्या लहानशा ठाण्याचा बचाव करीत होता. या सर्व मोहिमेवर बुलर हा सेनापती नेमण्यांत आला होता. त्यानें लेडिस्मिथचा वेढा उठविण्याचा उद्योग आरंभिला. परंतु त्याचा कोलेन्सो व स्पिऑन कॉप या दोन ठिकाणीं पराभव झाला. व त्याचा उद्योग मुळींच सिद्धीस गेला नाहीं. तसाच मागर्सफॅण्टेन येथें इंग्रजांचा पराभव होऊन किंबर्लेचा वेढा उठविण्याचा प्रयत्नही निष्फळ झाला.

७ **इंग्रजांचा विजय**—शेवटीं या पराभवाच्या बातम्यांनीं इंग्लंडांत स्वाभिमान जागृत होऊन इंग्लिश लोक वाटेल ती मदत करण्यास

तयार झाले. लवकरच लॉर्ड रॉबर्टस् याचीदक्षिण आफ्रिकेंत रवानगी होऊन त्याचा दुय्यम म्हणून किचनेर यासही पाठविण्यांत आलें. ऑस्ट्रेलिया, क्यानडा, न्यू झीलंड या वसाहतींनीं साम्राज्य–सरकारास मदत करण्यास सैन्यें पाठविलीं. मग मात्र इंग्रजांस चोहोंकडे जय मिळून लेडिस्मिथ, किम्बर्ले, व मॅफेकिंग यांचे वेढे उठले. थोडयाच अवकाशांत ऑरेंज फ्री स्टेटची राजधानी ब्लूमफॉन्टाइन व ट्रान्सवालची राजधानी प्रिटोरिया या दोन्ही ठिकाणीं इंग्लिश सैन्यानें प्रवेश केला, व ते दोन्ही देश ब्रिटिश साम्राज्यांत सामील केल्याचें जाहीर झालें! अध्यक्ष क्रूगर युरोपला पळून गेला. तथापि बोअर लोकांनीं लहान लहान टोळ्या करून गनिमी युद्धपद्धतीचा अंगीकार करून १९०२ च्या मे महिन्यापर्यंत जनरल किचनेर यास खूप त्रास दिला. या गनिमी युद्धांत बोअरांचे तीन प्रसिद्ध सेनापती होते. बोथा, डीवेट, व डिलारी हे ते होत. बोथा पूर्व ट्रान्सवालांत झगडत होता, डिलारी यानें वायव्य भागांत गडबड उडविली होती, व डीवेट यानें ऑरेंज फ्री स्टेटच्या ईशान्येच्या भागांत धुमाकूळ मांडला होता. इंग्लिश सैन्याचा दाणागोटा तोडावयाचा, लहानसहान टोळी भेटली कीं, एक होऊन तीस जेर करावयाचें व मोठें सैन्य आपल्यावर चालून आल्यास पांगापांग करावयाची हें धोरण बोअरांनीं अंगिकारिलें होतें; व देश डोंगराळ असल्यामुळें तें बरेंच यशस्वी झालें. शेवटीं बोअरांचा नाइलाज होऊन त्यांना शस्त्रें खालीं ठेवणें भाग झालें व युद्ध संपलें (१९०२ मे).

८ **स्वराज्य–दान**—कांहीं काळपर्यंत वाटाघाटी व समेटाची बोलणीं होऊन शेवटीं प्रत्येक वसाहतीस पार्लमेंट देण्यांत आलें. ट्रान्सवालला ही देणगी १९०६ च्या डिसेंबरांत मिळाली. व ऑरेंज रिव्हर रिपब्लिकला १९०७ च्या जूनांत मिळाली. १९०५ त लिबरल पक्ष अधिकारारूढ झाल्यानंतर या सुधारणा करण्यांत आल्या हें लक्षांत ठेविण्यासारखें आहे. यानंतर १९१० सालीं केप कॉलनी, ऑरेंज फ्री स्टेट, ट्रान्सवाल, व नाताळ या चारी संस्थानांचा मिळून 'दक्षिण आफ्रिका' हा संघ निर्माण करण्यांत येऊन त्याची संयुक्त पार्लमेंट उघडण्याचा समारंभ

बादशहा पांचवे जॉर्ज यांचा चुलता ड्यूक ऑफ कनॉट याच्या हस्ते करण्यांत आला. जनरल बोथा यास सरकारचे पहिले मुख्य मंत्री नेमण्यांत आलें. आतां बोअर व इंग्रज यांजमधील भांडण बहुतेक मिटलें; पण काळ्या लोकांना या वसाहतींतून वस्ती करूं द्यावयाची कीं नाहीं हा प्रश्न यापुढें निघाला आणि हिंदी लोकांसारखे काळे वसाहतवाले व गोरे वसाहतवाले असा पक्षभेद यापुढें उत्पन्न झाला.

---

# ६६ आजकालचा वृत्तांत.



१ **व्हिक्टोरियाचीं शेवटचीं वर्षें**—१८८७ सालीं व्हिक्टोरिया राणीस गादीवर येऊन ५० वर्षें झालीं, तन्निमित्त तिची 'ज्युबिली' करण्यांत आली. त्याचप्रमाणें कारकिर्दीस १८९७सालीं साठ वर्षें पुरीं झालीं यास्तव आनंद व्यक्त करण्याकरतां 'डायमंड ज्युबिली' झाली. या दोन्ही प्रसंगीं ब्रिटिश साम्राज्याचें गौरव करण्याचें काम करावयाचें होतें व कर्मधर्मसंयोगानें साम्राज्यवादी कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षच अधिकारारूढ होता. इ. स. १८८६ त मॉर्किस ऑफ सॅलिस्बरी मुख्य प्रधान होऊन कॉन्झर्व्हेटिव्हांची जी सरशी झाली ती पुढें ग्लॅडस्टनच्या मुख्य प्रधानगिरीच्या वेळीं कांहीं महिने लिबरल पक्ष अधिकारारूढ झाला असला तरी एकंदरीनें इ. स. १९०५ पर्यंत टिकली असें म्हणण्यास हरकत नाहीं. आयर्लंडास स्वतंत्र पार्लमेंट देण्याचें व्रत ग्लॅडस्टननें अंगिकारिलें होतें. त्यांत लिबरल पक्षास पूर्ण अपयश आलें; इतकेंच नव्हे तर त्या पक्षांत फूट पडून जोसेफ चेंबर्लेन हा यूनियनचा ( दोन्ही देशांना एक पार्लमेंट हवी म्हणणाऱ्यांचें मत ) कैवारी झाला, व कॉन्झर्व्हेटिव्हांस जाऊन मिळाला (१८८६). इ. स. १८९३ त मुख्य प्रधान असतां ग्लॅडस्टननें पार्लमेंटपुढें मांडलेलें आयरिश होमरूल बिल लॉर्डांच्या सभेनें नामंजूर केलें; व नंतर म्हातारपणामुळें ग्लॅडस्टननें काम सोडल्यावर लिबरल पुढाऱ्यांत

ऐक्य न राहिल्यामुळें कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष जो एकदां अधिकारारूढ झाला ( १८९४ ), तो खंड न पडतां एकसारखा १९०५ पर्यंत अधिकारावर होता. या कारकीर्दींत 'बोअर युद्ध' झालें ( १८९९–१९०२ ) व तें चालू असतां दीर्घकाल राज्य करणारी सत्त्वशील व्हिक्टोरिया राणी मरण पावली ( १९०१ ). तिच्यामागून तिचा वडील मुलगा 'सातवा एडवर्ड' ही पदवी घेऊन गादीवर आला.

२ **कॉन्झर्व्हेटिव्हांत फूट**—या सुमारास जोसेफ चेंबर्लेन हा प्रधानमंडळांत असून वसाहतींच्या प्रधानाची जागा त्याजकडे होती. तो दक्षिण आफ्रिकेंतील वसाहतींची स्थिति कशी आहे हें प्रत्यक्ष अवलोकन करण्यासाठीं गेला होता; तो इ. स. १९०३ च्या उन्हाळ्यांत इंग्लंडला परत आला. लवकरच त्यानें एक भाषण केलें; त्यांत बोअर युद्धांत ऑस्ट्रेलिया वगैरे वसाहतींनीं इंग्लंडला जें साहाय्य केलें त्याबद्दल त्यांची त्यानें प्रशंसा केली आणि वसाहती व इंग्लंड या दोघांस जोडणारी सांखळी दृढ करून साम्राज्यास विशेष बळकटी आणावयाची असेल तर इंग्लंड व वसाहती यांचे हितसंबंध परस्परांत गुंतवून टाकिले पाहिजेत असें मत प्रतिपादन केलें. यापुढें खुल्या व्यापाराच्या तत्त्वास रजा देऊन इंग्लंडांत परदेशांतून येणाऱ्या मालावर जकाती बसवाव्या व वसाहतींतून येणाऱ्या मालास मात्र पूर्वींप्रमाणें खुले दरवाजे ठेवावे, म्हणजे इंग्लंडवरील निष्ठा अचल राखण्यास वसाहतींना इंग्लंडही आपली आद्य मातृभूमि आहे येवढीच मनोवृत्ति कारण आहे अशी स्थिति न राहून आपले व्यावहारिक फायदेही त्या निष्ठेस कारण आहेत अशी वसाहतींची समजूत होईल, व त्यामुळें साहजीकच ब्रिटिश साम्राज्यास अधिक बळकटी व स्थैर्य येईल, असा चेंबर्लेनचा अभिप्राय होता. परंतु हें मत कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षांतील बऱ्याच लोकांस पसंत पडलें नाहीं व चेंबर्लेनला प्रधानमंडळांतील आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला ( सप्टेंबर १९०३ ). त्यामुळें कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षांत फूट पडली. तो पक्ष लोकांच्या मनांतून उतरण्यास याच सुमारास आणखीही एक कारण घडलें. इंग्लंडांत दारू विकणाऱ्या मक्तेदारांची संख्या अतिशय होती. ती कमी करण्याकरितां कॉन्झर्व्हेटिव्ह प्रधानमंडळानें इ.

स. १९०४ त एक मक्तयांचा कायदा पास केला. या कायद्यानें मक्तेदारांची संख्या कमी झाली खरी; तथापि शिल्लक ठेविलेल्या मक्तेदारांस अधिक सवलती दिल्यामुळें त्यांचा हक्क जास्तच दृढ झाला. या कारणांनीं हा कायदा लोकांस मुळींच पसंत पडला नाहीं. चेंबर्लेननंतर आणखी तीन प्रधानांनीं प्रधानमंडळांतील आपल्या जागांचे राजीनामे दिले. शेवटीं मुख्य प्रधान बाल्फोर यानें राजीनामा दिला व कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारावरून दूर झाला ( १९०५ डिसेंबर ).

**३ निरनिराळ्या पक्षांचें बलाबल**—नंतर क्याम्पबेल बॅनरमन हा लिबरल पुढारी मुख्य प्रधान झाला. १९०६ च्या आरंभीं जी पार्लमेंटची निवडणूक झाली तींत लिबरल पक्षाची १८३२ नंतर कधींही झाली नव्हती इतकी सरशी झाली. कॉमन्ससभेंतील लिबरल सोडून बाकीचे सर्व सभासद एक केले तरी त्या सर्वांच्या मिळून झालेल्या संख्येपेक्षां एकट्या लिबरल पक्षाचे सभासद चौऱ्याऐंशींनीं अधिक होते. शिवाय इतर पक्षांपैकीं आयरिश राष्ट्रीय पक्षाचे ८० सभासद व नवीनच संघटना करून पार्लमेंटांत प्रवेश करून घेतलेल्या मजूर पक्षाचे सुमारें ५० सभासद सामान्यतः लिबरल पक्षाच्या बाजूनें मतें देणार हें उघड होतें. प्रत्यक्ष कॉन्झर्व्हेटिव्हांची संख्या एकशेंसाठाच्या आंत होती. तथापि यां अतिशय मताधिक्याचा उपयोग 'आयरिश होमरूल बिल' पास करण्याकडे आम्ही करणार नाहीं अशी लिबरल पुढाऱ्यांनीं निवडणुकीच्या वेळीं मतदारांना आश्वासनें दिलीं होतीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. १९०६ त लिबरल पक्षानें मजूरसंघांसंबंधीं ( Trade Unions ) कायदा केला व त्या संस्थांस सुरक्षितता आणिली. १९०८ त क्याम्पबेल बॅनरमन वारला; तेव्हां मुख्य प्रधानगिरीच्या जागेवर आस्किथ आला, व फडणिसाची जागा लॉइड जॉर्ज यास देण्यांत आली.

**४ बजेटवरील वाद**—लॉइड जॉर्ज हा मजूर-वर्गाचा पक्षपाती असल्यामुळें त्यानें फडणिसाच्या जागीं येतांच म्हातारपणीं मजुरांना पेन्शन देण्यासाठीं सरकार व कारखानदार यांनीं मिळून कांहीं फंड उभारावा व

त्यांतून म्हाताऱ्या गरिबांस पेन्शन देण्यांत यावें अशा आशयाचें बिल पास करून घेतलें. याच सुमारास युरोपमधील इंग्लंडचा बलाढ्य प्रतिस्पर्धी जर्मनी हा आपलें आरमार अत्यंत जोरानें वाढवूं लागला, व नव्या तऱ्हेची ड्रेडनॉट जहाजें त्यानें बांधण्यास सुरवात केली. तेव्हां ब्रिटिश आरमार वाढवून जर्मनीपेक्षां अधिक प्रबल ठेवणें हें आत्मसंरक्षणाच्या दृष्टीनें अत्यंत अवश्यक असल्यामुळें इंग्लंडचें सरकार त्या दिशेनें प्रयत्न करूं लागलें. ही गोष्ट करावयाची म्हटली कीं पैसा पाण्यासारखा ओतणें प्राप्त, व तो कसा उभा करावयाचा हा फडणीस लॉइड जॉर्ज याजपुढें प्रश्न उपस्थित झाला. त्यानें शहरांतील श्रीमंतांच्या मालमत्तेवर, खाणीवाल्यांच्या जमीनीवर व गर्भश्रीमंत जमिनदारांच्या मिळकतींवर नवे कर बसवून आरमारास लागणारा पैसा उभा करावा असें मनांत आणून आपलें अंदाजपत्रक पार्लमेंटपुढें मांडिलें. कॉमन्ससभेंत तें पास झालें ( १९०९ ); पण बड्या श्रीमंतांचें आगर जी लॉर्ड्स सभा ती बजेट ( अंदाजपत्रक ) पास करीना. या बजेटानें श्रीमंतीचें उच्चाटन करून सर्व लोक सारखेच कंगाल करूं पाहणाऱ्या सोशिॲलिस्ट ( Socialist ) पक्षाचें चांगलें फावणार असें म्हणून लॉर्डांनीं बजेट फेटाळून लाविलें.

५ **मतवादी स्त्रिया**—याच वेळेस इंग्लंडांत पार्लमेंटांत सभासद निवडून देण्याचा हक्क स्त्रियांस पाहिजे, असें म्हणणारा एक स्त्रियांचा पंथ निघाला. या पंथांतील स्त्रियांस मतवादी स्त्रिया ( Suffragettes ) असें नांव आहे. या मतवादी बायांपैकीं पुष्कळांनीं याच सुमारास जलाल चळवळीचे मार्ग स्वीकारण्यास आरंभ केला. सार्वजनिक सभा मोडाव्या, खिडक्या तोडाव्या, प्रधानांवर व्यक्तिशः हल्ले करावे, निवडणुकीच्या वेळीं मतें गोळा करण्याच्या पेट्याच मुळीं पळवून न्याव्या, असा हा मार्ग होता. परंतु प्रधानमंडळानें न डगमगतां या 'पुरुषी बायकांना' तुरुंगांत घाडिलें, व त्यांचे दंगे थांबविले.

६ **व्हेटो-बिल**—लॉर्डांनीं बजेट फेटाळून लाविलें; तेव्हां नवी निवडणूक करणें जरूर झालें. या निवडणुकीच्या वेळीं आपण अधिकारा-

रूढ झाल्यास काय करूं या संबंधानें पुढील कार्यक्रम दोन्ही पक्षांनीं मतदारांपुढें मांडिले. लिबरल पक्षानें बजेट पास करून घ्यावयाचें व वेळोवेळीं लिबरल पक्षाच्या आड येणाऱ्या लॉर्डांचे अधिकार अगदीं कमी करून टाकावयाचे हा आपला कार्यक्रम राहील असें जाहीर केलें. कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें, चेंबर्लेननें सुचविलेली खुल्या व्यापाराच्या तत्त्वांत सुधारणा आपण घडवून आणूं असें प्रसिद्ध केलें. शेवटीं जी निवडणूक झाली ( १९१० जानेवारी ), तींत लिबरल पक्षाचें मताधिक्य कायम राहिलें. येवढें खरें कीं, दोन पक्षांच्या मतसंख्येंत मागें १९०६ त जें अतिशय अंतर पडलें होतें तें आतां बरेंच कमी झालें. तथापि मजूर पक्ष व आतां चांगला जोमदार झालेला आयरिश राष्ट्रीय पक्ष यांचें लिबरल प्रधानमंडळास पूर्ण पाठबळ असल्यानें सरकारची बाजू अजूनही चांगली भक्कम होती. आतां लॉर्ड जर बजेट पास करणार नाहींत तर राजाकडून आपण नवे लॉर्ड बनवूं अगर नवी निवडणूक करून फिरून लोकमत मागवूं अशा लिबरल पक्षाकडून लॉर्डांस सारख्या धमक्या देण्यांत येऊं लागल्या. शेवटीं लॉर्डांनीं बजेट पास केलें ( १९१० ). इकडे अशा आणीबाणीच्या प्रसंगीं १९१० च्या मे महिन्यांत सातवा एडवर्ड वारला व त्याचा मुलगा जॉर्ज हा 'पांचवा जॉर्ज' असा किताब घेऊन इंग्लंडच्या गादीवर आला. बजेट पास झाल्यानंतर लॉर्ड्स सभेचे अधिकार कमी करण्याच्या उद्योगास आस्किथ लागला. या प्रश्नावर राष्ट्रमत कळवून घेण्यासाठीं त्यानें पार्लमेंट बरखास्त केली ( १९१० नोव्हेंबर ). नव्या निवडणुकींत प्रधानमंडळाच्या बाजूस मताधिक्य कायम राहून कॉमन्स सभेंत 'व्हेटो बिल' पास झालें. मग १८३२ सालचें सुधारणांचें बिल पास करून घेतांना अर्ल ग्रेनें लॉर्डांस जी धमकी दिली होती तिचाच उपयोग करून आस्किथनें १९११ च्या उन्हाळ्यांत 'व्हेटो बिल'ला लॉर्ड्स सभेचीही संमति मिळविली व १९११ चा पार्लमेंट ॲक्ट पास झाला. पैशाची मंजुरी करण्याच्या बिलांत फेरफार करण्याचा अधिकार लॉर्डांस नव्हताच. या कायद्यानें तसलें बिल नापास करण्याचाही त्यांचा अधिकार काढून घेण्यांत आला. शिवाय दोन वर्षांपेक्षां जास्त मुदतींत कॉमन्सनीं एकादें

बिल लागोपाठच्या तीन बैठकांत जर पास केलें तर लॉर्डांच्या संमतीशिवाय तें कायदा म्हणून समजण्यास हरकत नाहीं, असें ठरलें.

**७ संप**—१९११-१९१२ सालीं इंग्लंडांत मजुरांनीं फारच मोठ्या प्रमाणावर संप केले. यांतील तीन मुख्य होत. पहिला रेल्वेवरील मजुरांचा, दुसरा कोळशाच्या खाणींतील कामकऱ्यांचा व तिसरा गोदामांतील उद्योगवाल्यांचा. हीं भांडणें मजूर व त्यांचे मालक कारखानदार यांजमधील असल्यामुळें त्या दोघांनीं आपसांत निकाल करून घ्यावा हें मत सकृद्दर्शनीं खरें भासतें. परंतु यांचीं कामें बंद पडलीं म्हणजे जनतेची गैरसोय होत असल्यामुळें सरकारास यांत हात घालून निकाल लावणें प्राप्त होतें. या तिन्ही संपांचा सरकारनें मध्यस्थी केल्यावर फारसा दंगाधोपा न होतां निकालही लागला. तथापि तेवढ्यानें कारखानदार व मजूर यांजमधील तंट्याचें मूळ तुटलें असें होत नाहीं; व यापुढें हा प्रश्न जास्तच जोरानें पुढें येणार असा रंग दिसतो.

**८ आयरिश होमरूल–बिल**—लॉर्डांस निस्तेज केल्यानंतर लिबरल पक्षाचें फार दिवसांचें जें काम आयर्लंडास होमरूल देणें तें आस्किथनें हातीं घेतलें. व होमरूल–बिल १९१२ सालीं कॉमन्समध्यें पास झालें, पण लॉर्डांनीं तें फेंटाळून लाविलें. ' देव देतो पण कर्म नेतें ' या न्यायानें आयर्लंडला अतिशय प्रयासानंतर मिळालेलें होमरूल आयर्लंडपैकीं घरभेद्या अल्स्टर प्रांतास कबूल न होऊन लढाई करून देखील होमरूलचा प्रतिकार करण्याची अल्स्टरवाल्यांनीं तयारी केली व ते चंग बांधून युद्धास उभे ठाकले ( १९१४ ) ! इकडे मतवादी बायांचा धिंगाणा इंग्लंडांत चालूच होता. अल्स्टरवाल्यांच्या हट्टानें तर इंग्लंडांत यादवी माजते कीं काय अशी भीति वाटूं लागली ! शेवटीं १९११ च्या पार्लमेंट ॲक्टप्रमाणें दोन वर्षांनीं ( सप्टेंबर १९१४ ) कॉमन्सनीं होमरूल बिल तिसऱ्यानें पास केलें व तें कायदा बनलें; तथापि त्याचा अंमल महायुद्धानंतर दुरुस्ती–बिलांचा विचार केल्यानंतर करण्याचें ठरविण्यांत आलें. शिवाय पार्लमेंटची कमाल मुदत सात वर्षें होती, ती बदलून पांच वर्षें करण्यांत आली.

**९ इंग्लंड, फ्रान्स व रशिया**—विसाव्या शतकाच्या आरंभीं राष्ट्रा-राष्ट्रांमधील संबंधाची नवी घडी बसून युरोप खंडांत सुधारलेल्या प्रबल राष्ट्रांचे दोन तट झाले. या दोन तटांपैकीं एका तटांत इंग्लंड फ्रान्स व रशिया हें त्रिकूट असून दुसरा तट जर्मनी, ऑस्ट्रिया व इटली यांचा बनला. इंग्लंडचा फ्रान्सशीं स्नेह १९०४ त झाला, व रशियाशीं १९०७ त घडून आला. १८७० सालीं जर्मनीनें फ्रान्सचा भयंकर पराभव केला, तेव्हांपासून त्या राष्ट्रांत जर्मनीविषयीं पक्का द्वेष बाणला असून जर्मनीपासून आपलें स्वसंरक्षण करण्याकरितां कोणाच्या तरी आश्रयानें रहाणें अवश्य आहे हें फ्रेंचांनीं ओळखिलें. पहिल्यानें रशियाशीं दोस्तीचा तह करून नंतर इजिप्तांत इंग्रजांनीं पक्कें ठाणें दिलें याबद्दल वैषम्य वाटत असतांही निदान मोरक्कोंत—ज्यांत फ्रान्सनें हातपाय पसरण्यास सुरवात केली होती—तरी फ्रेंचांनीं यथेच्छ कारभार करावा, त्यांत इंग्रजांनीं आड येऊं नये, या अटीवर १९०४ त इंग्लंडशीं फ्रान्सनें दोस्तीचा तह केला. रुसोजपानी युद्धानंतर रशियाही थकला भागला होता व त्याच्या निस्तेज स्थितींत त्याच्यापासून हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्यास भीति बाळगण्याचें कारण राहिलें नव्हतें; तेव्हां १९०७ त तूर्त इराण देशापैकीं उत्तरेकडचा भाग रशियाच्या रक्षण-कक्षेंतील ( Sphere of influence ) समजण्यांत यावा व दक्षिण इराणांत इंग्लंडचें वर्चस्व रहावें अशी वांटणी करून या प्रबल राष्ट्रांनीं आपसांत मैत्रीचा तह केला व तेव्हांपासून इंग्लंड-फ्रान्स-राशीया हें त्रिकूट निर्माण झालें.

**१० जर्मनीची महत्त्वाकांक्षा**—जर्मनी, ऑस्ट्रिया व इटली हें त्रिकूट गेल्या शतकाच्या शेवटीं स्थापण्यांत आलें होतें. यांत जर्मनी अग्रेसर असून त्या देशांतील लोकांत साम्राज्यवाद अतिशय बळावला. तो इतका कीं लष्करी शिक्षण सक्तीचें करून १९०५ पासून आपलें आरमारी सामर्थ्य अतोनात वाढवून जर्मन राष्ट्रीय बल अत्यंत प्रखर करण्याकडे जर्मनीचें लक्ष वेधलें. साहाजिकपणेंच इंग्लिश लोकांचें मन जर्मनीच्या या धोरणाबद्दल साशंक झालें व इंग्लंडनें आपलें आरमार वाढविण्याचे

प्रयत्न चालविले. १९१४ च्या जून महिन्यांत ऑस्ट्रियाचा युवराज बॉस्निया प्रांतांत फिरतीवर गेला असतां बॉस्नियाची राजधानी सॅरॅजेव्हो येथें एका बॉस्नियन तरुणानें त्याचा खून केला. या कृत्यास सार्व्हियाची मदत आहे असें दृष्टोत्पत्तीस आलें; त्यामुळें सार्व्हियास कडक शासन करण्याचा ऑस्ट्रियानें निश्चय केला, व सार्व्हियास एक खलिता पाठविला. सार्व्हियास तो न पटून ऑस्ट्रिया व सर्व्हिया या दोन राष्ट्रांत युद्ध सुरू झालें. लगेच सर्व्हियांतील लोक स्लाव्ह वंशाचे असल्यामुळें सर्व्हियास मदत करण्यासाठीं ज्ञातिप्रेमानें रशिया पुढें सरसावला. रशिया सार्व्हियास मिळाल्याबरोबर जर्मनी हा ऑस्ट्रियास मिळाला आणि रशिया व त्याचा दोस्त फ्रान्स यांजवर त्यानें स्वारी केली. ही स्वारी करतांना बेल्जम हें राष्ट्र तटस्थ राखावयाचें असा सर्व राष्ट्रांचा तह झाला असल्यामुळें जर्मनीनें बेल्जममधून सैन्य नेणें न्याय्य नव्हतें. तथापि दुसरा मार्ग नाहीं या सबबीवर त्यानें आपलें सैन्य बेल्जममध्यें घुसविलें. त्याबरोबर लहानग्या राष्ट्रांचे हक्क कायम राखण्याकरतां व आपल्या स्नेह्यांचें रक्षण करण्याकरतां ऑगस्ट महिन्याच्या आरंभीं इंग्लंड युद्धांत पडलें व अशा विलक्षण रीतीनें नुक्तेंच संपलेलें महायुद्ध सुरू झालें !

---

## ६७ सामाजिक प्रगति.



१ **तीन काळ**—इंग्लंडच्या इतिहासाचे एकंदर तीन ठळक भाग पडतात; पहिला स्वाऱ्यांचा काळ, दुसरा सरदारांच्या प्राबल्याचा काळ, व तिसरा आधुनिक काळ. इ. स. १०६६ पर्यंतचा काळ म्हणजे प्राचीन काळ होय. या काळांत इंग्लिश राष्ट्र ज्या ब्रिटन, सॅक्सन, डेन व नॉर्मन या चार वंशांतील रक्ताच्या मिश्रणानें बनलेलें आहे त्या लोकांच्या स्वाऱ्या इंग्लंडवर होऊन त्यांच्या वसाहती इंग्लंडांत झाल्या. यापुढें एकाद्या वंशांतील लोकांनीं इंग्लंडवर स्वारी केली व रक्तसंबंध होऊन ते

इंग्लिश लोकांत मिसळून गेले असें आढळून येत नाहीं. त्याचप्रमाणें इ. स. १०६६ त गादीवर आलेला नॉर्मन राजा वुइल्यम हा कर्तबगार निघाला व सबंध इंग्लंड या वेळीं एका राजाच्या अंमलाखालीं येऊन त्याचे फिरून निरनिराळे तुकडे पडले नाहींत. हा दुसरा काळ इंग्लंडला फारसा सुखावह गेला, असें म्हणवत नाहीं. राजे व सरदार या राष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं स्कॉटलंड व फ्रान्स हे दोन देश जिंकण्याचें अशक्य ध्येय पुढें ठेवून इंग्लिश राष्ट्राची लष्करी शक्ति व पैसा अतोनात खर्चीं घातला. सामान्य जनसमूह कंगाल व परावलंबी असून अज्ञानांधःकारांत खितपत पडला होता. ही स्थिति आधुनिक युगांत पालटली व हिंदुस्थान आणि अमेरिका यांचा संबंध व मुद्रणकला या जोडशक्तीनें इंग्लिश राष्ट्र आज वैभवास चढलें आहे. या काळांत प्रजासत्ताक राज्यपद्धतीची जोरानें अभिवृद्धि झाली व ब्रिटिश साम्राज्य अस्तित्वांत आलें.

२ **धर्मस्थिति**—इंग्लिश राष्ट्राची सामाजिक प्रगति कशी झाली हें निरनिराळ्या बाबी घेऊन त्यांत ती कशी झाली हें या प्रकरणांत दाखवावयाचें आहे. धर्मसंबंधीं पाहिलें तर लोकांचे धर्मविधि पार पाडण्याची जबाबदारी व धार्मिक उपदेश करण्याचें काम हीं दोन्ही युरोपांतील पद्धतीप्रमाणें धर्मखात्याकडे सोपविलेलीं आहेत. आधुनिक युगाच्या आरंभीं जी धर्मसुधारणा झाली तिच्या पूर्वी या धर्मखात्याचा मुख्य रोम शहरांत राहणारा पोप हा होता. पण धर्म-सुधारणेच्या काळीं इंग्लंडनें प्रॉटेस्टंट पंथ स्वीकारल्यामुळें तेव्हांपासून इंग्लंडचें धर्मखातें इंग्लंडच्या राजाच्याच नेतृत्वाखालीं चालतें. मध्ययुगांत सामान्य लोकांचा कल विचारापेक्षां श्रद्धेकडेच अधिक असे, व त्यामुळें धर्मगुरू सांगतील ती पूर्वदिशा अशी स्थिति असे. धर्मगुरू व मठवासी या दोघांनाही जमीनीचीं उत्पन्नें असत. या जमिनी खेडयांतून असावयाच्या; तेव्हां हीं उत्पन्नें खाऊन खेडयांत सुखासमाधानानें रहावें अशी त्यांची पुष्कळ वेळां प्रवृत्ति असे. उद्योगधंदे थोडथोडे सुरू झाल्यामुळें शहरें वसलीं व त्यांतून मजुरी करणाऱ्या पुष्कळ लोकांची वस्ती झाली, व त्यांना धार्मिक व नैतिक उपदेश करण्यास धर्मगुरूंची अवश्यकता उत्पन्न झाली. पण धर्मगुरूंची मिळकत

लांब खेड्यांत असल्यामुळें ते या नव्या शहरांतून येईनात. अशा वेळीं गरिबीचें व्रत पत्करून शहरांतील लोकांना धार्मिक उपदेश व औषधोपचार करण्याच्या कामास स्वार्थत्यागी फ्रायर्स ( Friars ) नांवाच्या स्वयंसेवकांचा वर्ग निघाला होता. आधुनिक युगांत पहिला जेम्स व पहिला चार्लस या स्टुअर्ट राजांशीं पार्लमेंटचा जो झगडा झाला(१६०३–१६४९) त्या वेळीं पार्लमेंट पक्षांतील लोक प्यूरिटन व इंडिपेंडन्ट या पंथांचे असून त्यांचा धर्माभिमान उत्कट स्वरूपाचा होता व त्यांची नीतिमत्ताही फार उच्च दर्जाची होती.

**३ धार्मिक अवनति**—पुढें इ. स. १६६० त दुसऱ्या चार्लसचें पुनरागमन झालें तेव्हांपासून वॉल्पोलचा राज्यकारभार संपला ( १७४२ ) तोंपर्यंत इंग्लिश राष्ट्रांत धार्मिक औदासिन्याचा कळस झाला व नीति झुगारून भ्रष्टाकार अत्यंत बोकळला ! पशुवृत्ति स्वीकारून व धर्महीन बनून स्वार्थसाधुपणाचा लोक टेंभा मिरवूं लागले. दारुबाजीस तर सुमारच राहिला नाहीं. लंडनमधील गुत्त्यांत रात्रंदिवस केव्हांही पहा, गर्दीही आहेच. गरीब लोकांस दारू विकणाऱ्या गुत्त्यांत खालील जाहिराती फडकत. 'नुसती गुंगी येण्याइतकी दारू येथें एका पेनीला मिळेल; अगदीं मृतप्राय होण्याइतकी पाहिजे असेल तर दोन पेन्स पडतील; व गवतावर पडून ( गुंगी न आल्यामुळें ) दुःख भोगावयाचें असेल तर कांहीं पडावयाचें नाहीं.' वरिष्ठ वर्गांतही दारूबाजी कमी नव्हती. सार्वजनिक भोजनप्रसंगीं दारू वापरण्यांत येत असून तिचें प्रमाण इतकें मोठें असे कीं गुंगी येऊन मोठमोठे खानदानीचे लोकही खुर्चीवरून घरंगळून मेजाखालीं पडलेले आढळून येत ! लोकसमाजाची नीतिमत्ता व धर्मश्रद्धा नाहींशी झाली व धर्मखात्याच्या नोकर धर्मगुरूंकडून ही स्थिति सुधारण्याची आशा दिसेना.

**४ पद्धतशीर पंथ**—अशा वेळीं जॉन वेस्ली व त्याचा भाऊ चार्लस वेस्ली यांनीं देशांत धर्म–जागृति करण्याचा उद्योग मोठ्या उत्साहानें आरंभिला. जॉन वेस्ली ऑक्सफर्डमध्यें शिकविण्याचें काम करीत

असे, त्या वेळेपासूनच ईश्वराच्या प्रार्थनेसंबंधीं 'सभा' भरविण्याचा त्याचा परिपाठ होता. या सभा इतक्या नियमित होत व वेस्लीचें एकंदर वर्तनच इतकें पद्धतशीर असे कीं, आपली इच्छा नसतांही प्रस्थापित धर्मपंथाहून निराळा पंथ त्याला जो काढावा लागला त्याला पद्धतशीर पंथ ( Methodist, मेथॉडिस्ट ) हें नांव प्राप्त झालें. जेथें हजारों लोक व्यापारधंद्यांत गुंतले असतील तेथें जावयाचें व टोलेजंग सभा भरवून धर्मजागृति करावयाची हा असा क्रम वेस्लीबंधूंनीं चालविला. त्यांना व्हिट्फील्ड हा उत्कृष्ट वक्ता येऊन मिळाला व या नवीन पंथानें धर्मजागृतीचें काम केवळ इंग्लंडांतच नव्हे तर अमेरिकेंतही केलें. एकोणिसाव्या शतकांत धर्मजागृतीचें काम 'ऑक्सफर्ड चळवळी'नें केलें. १८३४ त न्यूमन, केबल इत्यादि ऑक्सफर्डमधील तरुणांनीं चळवळ आरंभिली. इंग्लिश प्रस्थापित पंथाचा आरंभ आठव्या हेन्रीपासून झाला नसून ऑगस्टिनपासून त्याची परंपरा अस्खलित चालत आहे असें त्यांचें म्हणणें होतें. त्यांचीं बरींच मतें क्याथॉलिकांशीं जमत. शेवटीं तर न्यूमन क्याथॉलिक बनला व १८७९ त पोपनें त्याला कार्डिनल केलें. तथापि या चळवळीचे इतर पुढारी प्रस्थापित पंथास चिकटून राहिले व त्यांच्या उद्योगाचा, उत्साहाचा व एकीनें काम करण्याच्या प्रवृत्तीचा धर्मगुरूंवर व सामान्य जनतेवर परिणाम होऊन धर्मप्रवृत्तीला बरीच चेतना मिळाली.

५ **धर्माचें गौणत्व**—अलीकडच्या काळांत समाज-चरित्राकडे पाहिलें तर सामाजिक हालचाली ज्या होत आहेत त्यांचें धर्मभक्ति हें केंद्रस्थान नसून उद्योगधंदा अगर पोटापाण्याची व्यवस्था हें केंद्रस्थान आहे. व्यक्तीच्या धार्मिक गरजा असतात व त्या व्यक्तीला हल्लींच्या काळींही भागवाव्या लागतात ही गोष्ट खरी; पण समाजदृष्ट्या लोकांपुढें कोणतीं ध्येयें आहेत याचा विचार केला तर 'धर्म' मागें पडून जडवादास अनुसरूनच इंग्लिश समाजाची इतर युरोपियन समाजांप्रमाणें कृति होत आहे हें कबूल करणें भाग आहे.

६ **मध्यकालीन शिक्षण**—मध्ययुगांत शिक्षणाचा प्रसार फार

नव्हता. एक तर छापण्याची कला माहीत नव्हती व पुस्तकें हातानें लिहून घेणें भाग पडे. शिवाय ज्ञानाचा विषय म्हटला म्हणजे बायबल ग्रंथ व तो तर ग्रीक व लॅटीन या भाषांतच लिहिला होता. धर्मगुरू व मठवासी या भाषांत निष्णात असत, व विद्वत्ता अशी त्यांच्याच ठिकाणीं असे. सरदार व सुखवस्तु लोक विद्येची फारशी फिकीर करीत नसत. त्या वेळच्या सरदार लोकांत 'शिलेदारी बाणा' ( Chivalry ) विशेष प्रचलित होता लष्करी सामर्थ्य संपादन करून धीरोदात्त चरित्रास साजेल असा विनय व औपचारिक विधि पाळणें व उच्च कुलांतील स्त्रियांचें आणि दुःखितांचें दुःख दूर करण्यास नेहमीं तयार असणें या गोष्टी आपल्या आचरणांत आणण्याकडे प्रत्येक शिलेदाराचें लक्ष असे. या शिलेदारांची मुख्य करमणूक म्हटली म्हणजे चिलखतासह सर्व पोषाख घालून घोड्यावर आरूढ व्हावयाचें आणि मग एक 'लुटुपुटीचें झुंज' ( Tournament ) खेळावयाचें. या लुटुपुटीच्या झुंजाचा शेवट कधीं कधीं खरोखरीच्या युद्धांत होई! झुंज चाललें असतां एकाद्या कुलीन स्त्रीस 'राणी' ही संज्ञा देऊन तिच्या अनुज्ञेनें तें झुंज चालविण्यांत येई आणि झुंज संपल्यावर विजयी पुरुषास तिच्या हस्तेंच बक्षिसें वाटण्यांत येत. अशा तऱ्हेनें सरदार व सुखवस्तु जमीनदार युद्धकलेंत गुंग झाले असल्यानें शिक्षणाकडे त्यांचें मुळींच लक्ष नसे; या वर्गांपैकीं पुष्कळशा लोकांस लिहावयास सुद्धां येत नसे. त्या कारणानें महत्त्वाच्या कागदपत्रांवर कांहीं खुणेचीं अक्षरें कोरून शिक्कामोर्तब करण्याची चाल पडली. विद्या शिकविणें, व शिकणें या दोन्ही गोष्टींची जबाबदारी धर्मगुरू व मठवासी या लोकांवरच पडे.

**७ शिक्षणाची प्रगति**—परंतु आधुनिक युगाच्या आरंभीं मुद्रणकला उदयास आली, त्याच्या पूर्वीपासून लॅटीन व ग्रीक भाषांचा अभ्यास करण्याची लाट सर्व युरोपखंडभर पसरली होती. तिचा इंग्लंडांतहीं फैलाव होऊन जॉन वुइक्लिफ हा लोलर्ड पंथाचा स्थापक उदयास आला. त्यानें ज्या त्या बाबतींत धर्मगुरूंवर अवलंबून राहणाऱ्या लोकांच्या प्रवृत्तीचा निषेध केला, व स्वतंत्र विचार करून काय तें करावें असा उप-

देश केला. यानंतर सोळाव्या शतकाच्या आरंभीं जॉन कॉलिट नांवाच्या एका धर्मगुरूनें शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला. आपणा स्वतःला बायबलाचा खरा आशय कळावा या हेतूनें कॉलिट ग्रीक भाषा शिकला. व शाळा स्थापून आपल्याला झालेलें ज्ञान आपल्या देशबांधवांना करून देण्याच्या खटपटीस तो लागला. वुइल्यम विक्हॅम या गृहस्थानें विन्चेस्टर येथें एक शाळा काढली होती, व राजा सहावा हेन्री यानें ईटनचें विद्यालय स्थापिलें होतें. पुष्कळ विद्यार्थी या शाळांतून शिकत व मठवाशांपासून कित्येक ज्ञानार्जन करीत. पण येवढ्यानें आणखी शिक्षण–संस्थांची गरज नव्हती असें नाहीं. कॉलिटनें हें ओळखून 'सेंट पॉल्स स्कूल' नांवाची शाळा इ. स. १५०८ त काढली. हींत कोणत्याही वर्गाचीं व देशाचीं मुलें घेतलीं जातील असें त्यानें जाहीर केलें. त्याच्या शाळेंत एकशेंत्रेपन्न मुलें होतीं. पुढें टयूडर घराण्यांतील आठवा हेन्री या राजानें मठविध्वंस केला. तेव्हां मठवाशांजवळ जी शिक्षणाची सोय असे ती नाहींशी झाली. आठव्या हेन्रीच्या कारकिर्दीच्या उत्तरार्धांत व सहावा एडवर्ड आणि एलिझबेथ यांच्या कारकिर्दींत ( १५३६–१६०३ ) इंग्लंडांत निरनिराळ्या गांवीं शाळा उघडण्यांत आल्या. त्याचप्रमाणें या कारकिर्दींत ऑक्सफर्ड व केंब्रिज या दोन शहरीं पुष्कळ नवीन कॉलेजें उघडण्यांत आलीं. अलीकडे तर प्राथमिक शिक्षण **सक्तीचें** व **मोफत** करण्यांत आलें असून उच्च शिक्षणांत शब्दपांडित्याबरोबर उद्योग–धंद्याच्या अभिवृद्धीस अत्यंत अवश्यक म्हणून भौतिक शास्त्रांचें शिक्षण मोठ्या उत्साहानें देण्यांत येत आहे. १८७० च्या शिक्षण–कायद्यानें प्राथमिक शिक्षणांत क्रान्ति करून सोडिली. १८७० सालीं दहा लक्ष मुलें शिकत होतीं, तीं १८८५ त तीस लाख शिकूं लागलीं, व हल्लीं सत्तर लाख मुलांची शिकण्याची सोय केली असून साठ लक्ष प्रत्यक्ष पटावर दाखल आहेत. इंग्लंडांत दुय्यम शिक्षणाच्या सुमारें एक हजार शाळा असून त्यांत अडीच लक्ष विद्यार्थी ज्ञान संपादन करीत आहेत. याशिवाय सुमारें दीडशें उद्योग–धंद्याच्या शाळा व अडीचशें कलाभवनें असून त्यांत हजारों विद्यार्थी शिकत आहेत. एकंदर शिक्षणाची व्यवस्था शिक्षणमंडळाकडे ( Board of Education )

दिली असून शिक्षणाचें धोरण, प्रसार व खर्च यांची व्यवस्था हें मंडळ पहातें. या मंडळाचा अध्यक्षच प्रधानमंडळांतील शिक्षण–मंत्री होय. हल्लीं या जागीं फिशर हा विद्वान् गृहस्थ असून त्यानें शिक्षण–प्रसाराचें जोरदार धोरण स्वीकारलें आहे. १९२० त पार्लमेंटनें ४ कोटी पौंड शिक्षणावर खर्च करण्याचें ठरविलें. त्याशिवाय स्थानिक कर, विद्यार्थ्यांची फी, देणग्या या सदरांतून करावयाचा खर्च निराळाच.

८ **वाङ्मय**—इंग्लिश वाङ्मयांत अगदीं आरंभींच्या पुस्तकांपैकीं महत्त्वाचें एक पुस्तक म्हटलें म्हणजे अँग्लो–सॅक्सन क्रॉनिकल हें होय. यांत खिस्ती शकाच्या आरंभापासून इ. स. ११५४ पर्यंतचा इंग्लंडचा इतिहास वर्णिला असून या पुस्तकाची रचना क्यांटरबरीमध्यें व इतर ठिकाणीं राहणाऱ्या मठवाशांनीं केली असावी. इंग्लिश भाषेंतील मोठा आद्य ग्रंथकार चौदाव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं होऊन गेला. त्याचें नांव चॉसर हें असून त्यानें लंडनमधून क्यांटरबरीमधील थॉमस् ए बेकेटच्या समाधीचें दर्शन घेण्यास जाणाऱ्या यात्रेकरूंचें संभाषण कल्पून 'क्यांटरबरी टेल्स' नांवाचा आपला काव्यग्रंथ निर्माण केला ( सुमारें १३९० ). आधुनिक युगास आरंभ होऊन एक शतक लोटतें न लोटतें तोंच एलिझबेथच्या काळांत वुइल्यम शेक्सपियर ( १५६४–१६१६ ) हा प्रसिद्ध नाटककार होऊन गेला. याच सुमारास आपलें शब्दपांडित्य सोडून भौतिकशास्त्रांचा अभ्यास करण्याची स्फूर्ति उत्पन्न करणारा 'नोव्हम ऑर्ग्यानम्' हा ग्रंथ बेकननें लिहिला. तदनंतर राजा व पार्लमेंट यांचा झगडा चालला असतांना 'पॅरॅडाइझ लॉस्ट' हें प्रसिद्ध इंग्लिश महाकाव्य लिहिणारा मिल्टन होऊन गेला. ॲन राणीच्या वेळीं ( १७०२–१७१५ ) बरेच ग्रंथकार होते. ड्रायडन व पोप हे कवि गाजत असून ॲडिसन् व स्विफ्ट हे गद्य लेखकही याच काळचे होत. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत डॉक्टर जॉन्सन हा बडा ग्रंथकार प्रसिद्धीस आला. हा वेळ पावेतों एकाद्या श्रीमंत मनुष्याच्या आश्रयानें ग्रंथकारांची उपजीविका चालत असे. पण डॉक्टर जॉन्सनच्या वेळेपासून ही स्थिति पालटली. केवळ लोकाश्रयावर अवलंबून ग्रंथरचना करणें आतां शक्य झालें. ' रोमन साम्राज्याची अवनति व नाश'

हा प्रसिद्ध इतिहास-ग्रंथ लिहिणारा गिबन हा याच काळांत झाला. एकोणिसाव्या शतकांत तर काय ग्रंथकारांची फारच गर्दी दिसून येते. मुद्रणकलेमुळें व सामान्य जनांतही ज्ञानप्रसार झाल्यामुळें ज्या त्या विषयाचें शास्त्र बनत आहे. व निरनिराळ्या विषयावर मुद्देसूद आणि तेजस्वी ग्रंथ निर्माण झाले आहेत. अलीकडच्या काळांत दैनिक वर्तमानपत्रें, मासिक-पुस्तकें, व त्रैमासिक पुस्तकें हजारों निघत असून लोकांना ज्ञान देण्याचा उद्योग करून शिवाय तीं सरकारावर टीका करण्याचें काम करितात, व त्यायोगें अधिकाऱ्यांवर वचक ठेवून लोकमताचा दाब सरकारवर पाडण्याचीं तीं साधनें होऊन बसलीं आहेत.

९ **उद्योगधंदे**—इंग्लंडांत अँग्लो-सॅक्सन लोकांच्या वसाहती झाल्या त्यावेळीं शेती हाच जनतेचा मुख्य धंदा असून व्यापार फारसा नव्हताच म्हटलें तरी चालेल. या शेतीवर गुलाम राबत. नॉर्मन राजे राज्य करूं लागल्यावर ( १०६६ ) शेतकीची स्थिति फारशी सुधारली नाहीं, पण व्यापाराची वाढ पुष्कळ झाली. व निरनिराळ्या शहरांतून व्यापारी संघ निर्माण झाले. त्याचप्रमाणें ज्यू लोकांची देशांत वस्ती होऊन ते सावकारीचा धंदा या काळांत करूं लागले. पुढें प्लॅन्टॅजिनेट घराण्याच्या वेळीं ( ११५४-१३०९ ) इंग्लंडचे उद्योगधंदे व व्यापार यांत बराच फरक पडला. राजाच्या परवानगीनें जत्रा भरवून त्यांत मालाची खरेदी विक्री होऊं लागली. ज्याप्रमाणें व्यापारवृद्धीसाठीं व परस्पराच्या संरक्षणार्थ व्यापारी संघ ( Merchant guilds ) काढले होते तसे कारागिरांनीं कामकरी संघ ( Craft guilds ) काढिले. या दोन संघांत लवकरच चुरस उत्पन्न होऊन शहरांतील म्युनिसिपालिट्यांतून व्यापारी-संघांतील मंडळी कामकऱ्यांना घेतनाशीं झालीं. त्यांचे हात घाणेरडे असून ते हलक्या दर्जाचे असतात असें व्यापाऱ्यांचें म्हणणें असे. तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दींत इंग्लंड व फ्लँडर्स या दोन देशांमध्यें लोकरीचा पुष्कळ व्यापार सुरू झाला. लोकर इंग्लंडमधून फ्लँडर्समध्यें जावयाची व तेथें तिचे कपडे बनावयाचे अशी स्थिति असे. एलिझबेथच्या कारकिर्दींत लोकरीच्या व्यापारास निराळेंच वळण मिळालें. नेदर्लॅंड्स ( बेल्जम ) हा

देश स्पेनच्या अंमलाखालीं होता. स्पेनचा राजा फिलिप क्याथॉलिक असल्यामुळें तो प्रॉटेस्टंट लोकांवर अत्यंत जुलूम करीत असे. त्याच्या जुलमास कंटाळून १५६६ सालापर्यंत ३०,००० फ्लेमिंग्ज विणकरी इंग्लंडांत वसाहत करण्यास आले. एलिझबेथनें त्यांना इंग्लंडांत राहण्याची परवानगी दिली व सँड्विच, नॉर्विच वगैरे पूर्वेकडील शहरांतून त्यांची वस्ती करविली; पण एलिझबेथनें या वसाहतवाल्या लोकांस एक मात्र अट घातली. ती ही कीं प्रत्येक विणकऱ्यानें आपल्या कुटुंबांत एका इंग्लिश मनुष्यास ठेवून घेऊन त्याला लोकरीचे कपडे करण्याची व रंगविण्याची कला शिकविली पाहिजे! सतराव्या शतकांत रेशमाचा धंदाही देशांत रुजला. इ. स. १६६१ त रेशीम तयार करणाऱ्यांची एक कंपनी काढण्यांत आली; इ. स. १६६१ त तर ४०,००० लोक या धंद्यांत होते. पुढें दुसऱ्या जेम्सच्या कारकिर्दींत फ्रेंच राजा चौदावा लुई यानें आपल्या राज्यांतील प्रॉटेस्टंटांना दिलेल्या सवलती काढून घेतल्या. त्यावरून सुमारें पांच लाख प्रॉटेस्टंटांनीं फ्रान्स देशाचा त्याग केला. त्यांतील बरेच लोक इंग्लंडांत येऊन राहिले. ते या रेशमाच्या धंद्यांत वाकबगार असल्यामुळें या धंद्याचा अधिकच उत्कर्ष झाला.

१० **व्यापार**—सतराव्या शतकांत आफ्रिका, अमेरिका व हिंदुस्थान या देशांशीं समुद्रावरून व्यापार सुरू झाला होता. इ. स. १५९९ त हिंदुस्थानशीं व्यापार करण्यास ईस्ट इंडिया कंपनी स्थापली गेली व अमेरिकेंत हळूहळू इंग्लिश वसाहती करण्यांत आल्या. अमेरिकेंत वसाहती करण्याचें धोरण पहिल्यानें सर वॉल्टर रॅले यानें सुचविलें. जॉन हॉकिन्स नांवाच्या दुसऱ्या एका धाडशी नाविकानें आफ्रिकेंतील गियाना प्रांतांत 'निग्रो लोक' पकडावे व गुलाम म्हणून अमेरिकेच्या लगतच्या बेटांत वसाहत करून राहिलेल्या गोऱ्या स्पॅनिश लोकांस ते नेऊन विकावे हा धंदा सुरू केला व या धंद्यावर तो चांगलाच गब्बर बनला. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत दगडी कोळसा खाणींतून काढण्यांत येऊं लागला असून लोखंडही निघूं लागलें होतें. तथापि अजून एकंदर लोकसंख्येच्या मानानें पाहतां सुमारें शेंकडा ८० लोक शेतकीच्या उद्योगांत गुंतले होते.

**११ लोकसंख्या**—नॉर्मन वुइल्यमनें डूम्सडेबुक म्हणून एक राष्ट्रांतील माहितीचें रजिष्टर केलें होतें. त्यावरून त्या काळीं ( १०८६ ) एकंदर इंग्लंडची लोकसंख्या जास्तीत जास्ती म्हणजे २० लाख असावी असें अनुमान निघतें; तीच लोकसंख्या उद्योगाच्या प्रगतीमुळें इ. स. १७०० त ५५ लाख असावी असा अंदाज आहे. तीच १८०१ सालीं म्हणजे बरोबर शंभर वर्षांनीं ८८ लाख झाली. एकोणिसाव्या शतकांत उद्योगधंद्याची वाढ इतक्या झपाट्यानें झाली कीं, १८७१ सालीं म्हणजे अवघ्या पाऊण शतकांत ८८ लाखावरून लोकसंख्येचा आंकडा सव्वा दोन कोटींवर आला, व १९०१ त म्हणजे पुढील तीसच वर्षांत हा आंकडा ३ कोटींच्या[1] वर गेला ! याशिवाय अलीकडे वसाहतींत इंग्लंडांतून हजारों लोक जात असतातच. तेव्हां ही वाढ या आकड्यांत धरलेलीच नाहीं. ही इतकी वाढ झाली ती खरोखरच आश्चर्यकारक आहे. परंतु एकोणिसाव्या शतकांत उद्योगधंद्यांची जी अवाढव्य प्रगति झाली आहे व दळणवळणाच्या साधनांत जो प्रचंड फरक पडला आहे, तिकडे लक्ष दिलें म्हणजे या वाढीची उपपत्ति लागते. वाफेवर चालणारे माग निघून लँक्याशायरमध्यें कापसापासून सूत काढण्याचे व कापड बनविण्याचे टोलेजंग कारखाने उभारिले गेले. नानाप्रकारचीं लोखंडाचीं यंत्रें लागत असल्यामुळें तीं बनविण्यासाठीं बर्मिंगहॅम वगैरे ठिकाणीं तसेच प्रचंड लोखंडी सामानाचे कारखाने निघाले. त्याचप्रमाणें रेल्वे व आगबोटी यांचे शोध होऊन जगांतील कोणत्याही भागांत प्रवास करणें व व्यापारधंदा करणें सुकर झालें. या कारणांनीं उद्योगधंदे अतिशय वाढले. आतां इंग्लंडच्या लोकसंख्येपैकीं शेंकडा दहाच लोक काय ते शेतकीवर निर्वाह करणारे असून शेंकडा नव्वदांचा जीवनक्रम व्यापार व उद्योगधंदा यावर चालत आहे.

**१२ घरें व दळणवळणाचीं साधनें**—नॉर्मन राजांच्या काळीं

---

[1] १९११ सालीं इंग्लंडची लोकसंख्या ३ कोटी ४० लक्ष होती.

लोकांचीं घरें सामान्यतः लाकडी असत; यामुळें आगीची भीति फार असे. तेव्हां अग्नीपासून संरक्षण व्हावें या उद्देशानें व जित इंग्लिश लोकांस आपल्याविरुद्ध खलबतें करण्यास संधि मिळूं नये हाही हेतु साधण्याकरितां पहिल्या वुइल्यमनें सूर्य अस्तास जातांच घांट ( Curfew Bell ) वाजविली कीं, लोकांनीं घरांतील दिवे मालवावे असा कायदा केला होता. मध्ययुगांत शहरांतील रस्ते अगदीं अरुंद–फक्त दहा बारा फूट रुंद–असून त्यांच्यावर खडी टाकून ते तयार करण्याची अगर रात्रीं दिवाबत्तीची मुळींच तजवीज नसे. ट्यूडर राजांच्या वेळींही एका गांवाहून दुसऱ्या गांवीं जाण्याचे रस्ते अगदीं गचाळ असत; त्यामुळें घोड्याच्या गाड्या प्रवासास वापरणें शक्य नव्हतें व प्रवास घोड्यावर स्वार होऊन करावा लागे. मालाची ने–आण करावयाची ती सुद्धां घोड्याच्या पाठीवर गोण्या लादून करण्यांत येई. मध्ययुगांत व ट्यूडर राजांचे वेळीं लोकांची करमणुकीचीं साधनें म्हटलीं म्हणजे शिकार, तिरंदाजी, कोंबड्यांची झुंज, बैल अगर अस्वल यावर कुत्रे सोडून त्यांचें युद्ध, किंवा लोकांनीं सोंगें घेऊन नांचणें, हीं होतीं. स्टुअर्टांचे काळींही इंग्लंडांतील रस्ते चांगल्या स्थितींत नसत व माल अजूनही घोड्याच्या पाठीवर गोण्या लादून नेण्यांत येई; किंवा एकाद्या वेळीं अतिशय अवजड खटाऱ्यांतून नेत. या नेण्या आणण्याचा खर्च इतका जबर असे कीं, जवळच्या ज्या गांवांत बाजार भरावयाचा तेथें माल नेण्यापेक्षां तो शेतांत कुजूं देण्यांतच पुष्कळ वेळां शेतकऱ्याचा नफा असे! उतारूंस नेण्यासाठीं गाड्या वापरण्यांत येऊं लागल्या होत्या. परंतु भाडें फार जबर असून आज पाऊण तासांत जो प्रवास करतां येतो तेवढा करण्यास त्यांस एक सबंध दिवस लागे. लंडन शहरांत जाण्या येण्यास थोडयाशा गाड्या होत्या; पण मुख्यतः खुर्चीच्या दोन्ही बाजूंस काठ्या बांधून डोल्या तयार करण्यांत येत व लोक त्यांतून जात येत. लंडनमध्यें १६६६ त अग्निप्रलय झाला त्यानंतर लाकडी घरें जाऊन त्यांच्या जागीं विटा व दगड यांचीं घरें बांधण्यांत येऊं लागलीं. तथापि रस्ते अजून अरुंद व गलिच्छच होते. रात्रीची निर्भयपणें रस्त्यांतून वावरण्याची सोय नव्हती. बदमाष लोक व संभावित भामटे रस्त्यांतून संचार

करीत व डोल्या उलथण्याचा, बायकांना पिपांत घालून उंच ठिकाणावरून तीं घरंगळत खालीं लोटण्याचा व तरवारी खोंचण्याची धमकी देऊन पुरुषांस नाच करावयास लाविण्याचा त्यांचा परिपाठ असे. मारामाऱ्या तर काय थोडक्या कारणावरून होत. पोलिसची व्यवस्था बरोबर नसल्यामुळें लोकांस फार त्रास भोगावा लागे. गांवांत व एका गांवांतून दुसऱ्या गांवास जाणाऱ्या सडकेवर चोरांचा मोठा धुमाकूळ असे, व निर्धास्त रीतीनें प्रवास अगर मालाची ने-आण करतां येत नसे.

**१३ चालीरीती**—सतराव्या शतकाच्या मध्यापर्यंत एल व बिअर या दोन प्रकारची दारू सर्व जनतेचें पेय होती. परंतु त्या सुमारास कॉफी-हाउसेस स्थापण्यांत येऊन बातम्या ऐकावयास अगर गमतींत काळ घालविण्यास कॉफी-हाऊसमध्यें जाण्याचा प्रचार पडला. ॲन राणी गादीवर असतां केस चिकटून बसावेत यासाठीं लोक एका चिकट पुडीचा उपयोग करीत व बायका आपले चेहरे काळ्या लहान लहान ठिपक्यांनीं रंगवून काढीत. यानें आपल्या स्वाभाविक सौंदर्याचा अधिक परिपोष व्हावा येवढाच त्यांचा हेतु नसून आपण कोणत्या राजकीय पक्षांतील आहों हेंही त्या ठिपक्यांच्या रचनेवरून व्यक्त व्हावें अशी त्यांत योजना असे! अलीकडे शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीमुळें लोकांच्या सुखसोयी वाढविण्याचे चहूं बाजूंनीं प्रयत्न होत आहेत. आरोग्यशास्त्राच्या नियमांस अनुसरून घरें बांधण्यांत येत आहेत. आगगाडी व तारायंत्रें यांनीं दळणवळण सुलभ झालें आहे, व आगबोटींनीं परदेशांशीं निकट संबंध आणिला आहे. नाटकें, सिनेमा इत्यादि करमणुकीचीं साधनें होत आहेत. तथापि मागील काळांत श्रीमंत जमीनदार व कंगाल शेतकरी अशी ज्याप्रमाणें दुफळी होती त्याचप्रमाणें श्रीमंत कारखानदार व जमीनदार एका बाजूला व गरीब कामकरी दुसऱ्या बाजूला असे समाजाचे दोन तुकडे पडले आहेत; व करमणुकीचीं व सुखाचीं नानातऱ्हेचीं साधनें उपलब्ध असतां व ज्ञानाचा अत्यंत प्रसार झाला असतांही कामकरी वर्गाची स्थिति मागील शेतकऱ्यांपेक्षां फारशी समाधानकारक नाहीं, येवढें मात्र खरें.

---

# ६८ इंग्लंडचा राज्यकारभार कसा चालतो ?



**१ तीन कामें**—देशाची सुस्थिति राखण्यासाठीं कायदे करणें, प्रत्यक्ष व्यवहारांत त्यांचा अर्थ करून उपयोग करणें व त्यांचा अंमल करणें हीं तीन कामें कोणाही सरकारास करावीं लागतात. इंग्लंडांत कायदे करण्याचें काम पार्लमेंटकडे असून त्यांचा अर्थ करण्यास न्यायमंदिरें आहेत व त्यांचा अंमल प्रधानमंडळाच्या हुकमतीनें होतो. यांपैकीं पहिलें व तिसरें हीं कामेंच राज्यकारभाराच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचीं असल्यानें तीं कामें इंग्लंडांत कशीं होतात, याचा खुलासा या प्रकरणांत करावयाचा.

**२ लॉर्डांची सभा**—पार्लमेंटसभेचे दोन भाग आहेत. (१) लॉर्डांची सभा व (२) कॉमन्सची सभा. लॉर्डांच्या सभेंत ६१८ सभासद आहेत. इंग्लंडांतील सर्व लॉर्ड या सभेंत असून बिशपपैकीं बरेच लोक या सभेचे सभासद आहेत. परंतु इंग्लंडप्रमाणें स्कॉटलंड व आयर्लंड येथील सर्व उमरावांस या सभेंत बसण्याचा अधिकार नाहीं. पार्लमेंटच्या निवडणुकीच्या वेळीं स्कॉटलंडांतील उमराव आपल्यापैकीं सोळा जणांस प्रतिनिधी म्हणून निवडून देतात. आयर्लंडांतील एकंदर उमरावांपैकीं अठ्ठावीस उमरावांची हयातीपर्यंत लॉर्डांच्या सभेचे सभासद होण्याकरितां निवडणूक होते. या सभेंत पिढीजाद श्रीमंत आहेतच; पण त्यांच्याबरोबरच नांवलौकिक मिळवून आपल्या कर्तबगारीवर श्रीमंत झालेल्या लोकांसही राजाकडून उमराव करण्यांत येतें व ते लॉर्डांच्या सभेचे सभासद होतात. उमरावांचे एकंदर पांच दर्जे आहेत. ड्यूक हे सर्वांत श्रेष्ठ दर्जाचे असून त्यांच्याखालीं मार्कीस, अर्ल, व्हायकाउन्ट व बॅरन असा अनुक्रम आहे. लॉर्ड चॅन्सेलर हा लॉर्डांच्या सभेचा अध्यक्ष असून प्रधानमंडळांतील एक प्रधान म्हणूनही त्याची गणना होते. निदान तीन सभासद हजर असले म्हणजे सभेचें काम चालण्यास हरकत नाहीं

असा नियम आहे. या सभेचे कायदे करण्याचे हक्क बरेच मर्यादित केले आहेत. लॉर्डांना पैशासंबंधीं बिल पहिल्यानें विचारासाठीं घेतां येत नाहीं; आणि कॉमन्ससभेनें पास करून मंजुरीसाठीं पाठविलेल्या असल्या बिलांत त्यांना बदलही करतां येत नाहीं. पैशांचें बिल नामंजूर करण्याचा हक्कही कॉमन्सचा आग्रह दिसल्यास लॉर्डांना बजाविणें अशक्य झालें आहे. १९११ सालीं लिबरल मुख्य प्रधान आस्किथ यानें 'व्हेटो ॲक्ट' पास करून घेतला. त्याअन्वयें तिन्ही मिळून दोन वर्षांपेक्षां अधिक काळ व्यापणाऱ्या लागोपाठच्या तीन बैठकींत जर कॉमन्स सभेनें एकादें बिल पास केलें, तर लॉर्डांनीं त्या बिलाला समति दिली काय अगर न दिली काय, त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होतें. यावरून जिव्हाळ्याच्या प्रश्नासंबंधीं वाद निघाल्यास कॉमन्स सभेचें म्हणणें कबूल करणें लॉर्डांना कसें भाग झालें आहे हें दिसून येतें. तथापि कॉमन्ससभेची गति फाजील होऊं नये म्हणून लॉर्डांची सभा ब्रेकप्रमाणें वेळोवेळीं उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. तेव्हां कायदे करण्याच्या कामीं कॉमन्स व राजा यांशीं सहकार करावयाचा व सर्व सार्वजनिक प्रश्नांचा खल करावयाचा हीं लॉर्ड्स सभेचीं दोन कार्यें आहेत. शिवाय ही सभा सर्व कोर्टांमधील वरिष्ठ कोर्ट असून इंग्लंडमधील खालच्या कोर्टांतील निकालावर लॉर्डांच्या सभेकडे अपील करतां येतें.

**३ कॉमन्स सभा**—कॉमन्स सभेंत एकंदर ६७० सभासद[१] आहेत. हे सभासद परगणे, शहरें, व ऑक्सफर्ड, केंब्रिज व लंडन यांतील विश्वविद्यालयें यांतून निवडून आलेले प्रतिनिधी होत. इंग्लंड व वेल्स यांच्या वांट्याला ४९५ सभासद, स्कॉटलंडच्या वांट्याला ७२ सभासद व आयर्लंडच्या वांट्याला १०३ सभासद, अशी एकंदर सभासदांची वांटणी आहे.

---

१ १९१८ सालच्या कायद्यानें मतदारसंघांची पुनर्रचना झाली. ती-प्रमाणें ग्रेटब्रिटनमधील लोकसंख्येच्या ७०,००० च्या प्रत्येक गटास एक सभासद व आयर्लंडच्या ४३००० च्या गटास एक सभासद अशी व्यवस्था झाल्यामुळें कॉमन्स सभेच्या सभासदांची संख्या ७०७ झाली आहे.

कॉमन्ससभेनें रकमा मंजूर केल्याशिवाय सरकारास खर्च करतां यावयाच्या नाहींत अशी व्यवस्था असल्यामुळें कॉमन्सचा सरकारवर ( प्रधानमंडळ ) चांगलाच दाब रहातो. कॉमन्स–सभेच्या अध्यक्षस्थानीं 'स्पीकर' असून निरनिराळ्या पक्षांच्या संगनमतानें एकाद्या विश्वासार्ह व वजनदार माणसाची या जागीं नेमणूक करण्यांत येते, व निरनिराळे पक्ष जरी अधिकारारूढ झाले तरी त्याच त्या माणसाची स्पीकरच्या जागीं नेमणूक होते. सामान्यतः ही जागा सुटली म्हणजे स्पीकरला लॉर्ड बनविण्यांत येतें. राष्ट्रीय जमाखर्चास मंजुरी देणें, राजा व लॉर्ड्स यांच्या अनुमतीनें कायदे करणें, कोणत्याही सार्वजनिक प्रश्नाचा खल करणें व सरकारी अंमलदारांवर हुकमत चालविणें, हीं महत्त्वाचीं चार कार्यें कॉमन्स-सभेकडे आहेत. कॉमन्ससभेची सरकारवरील हुकमत इतकी खरीखुरी व महत्त्वाची आहे कीं, सर जॉन सीली या प्रसिद्ध ग्रंथकारानें 'सरकार निर्माण करणारी सभा' ( Government making organ ) असें नांव तिला दिलें आहे. कॉमन्सचे सभासद सामान्य जनतेमधून येत असल्यामुळें उदर–निर्वाहाचा कांच मागें न राहतां त्यांस राजकारणांत उत्साहानें पडतां यावें यासाठीं सभासदांना सरकारी पगार मिळावा म्हणून चार्टिस्ट लोकांच्या वेळेपासून ( १८४० ) ओरड होती. अलीकडे ज्यांतून पार्लमेंटचे सभासद निवडून यावयाचें तें क्षेत्र पुष्कळच विस्तृत[१] झालें असून मजूर पक्षाचीही संघटना झाली आहे. तेव्हां मुख्य प्रधान आस्किथ यानें पगाराचें बिल पास करून घेतलें व हल्लीं कॉमन्स सभेच्या सभासदास सरकारांतून सालीना ४०० पौंडांचें वेतन मिळण्याची व्यवस्था झालेली आहे ( १९११ ). कॉमन्स सभेचें काम चालण्यास निदान चाळीस सभासद हजर पाहिजेत असा नियम आहे.

---

१ १९१८ पूर्वीं मतदारांची संख्या ८३,५०,००० होती. त्या सालीं स्त्रिया, लष्करांतील शिपायी वगैरेस निवडणुकीचा हक्क मिळाला व मतदारांची संख्या २,१३,७०,००० झाली. ही संख्या एकंदर लोकसंख्येच्या जवळ जवळ निम्मी असून तींपैकीं ८० लक्ष स्त्रिया आहेत.

**४ निवडणूक**—कॉमन्स सभेच्या सभासदांची निवड पुढीलप्रमाणें होते. नवीन पार्लमेंट भरावयाची असली म्हणजे पहिल्यानें राजाकडून निवडणूक ज्याच्या देखरेखीखालीं व्हावयाची त्या मतदारसंघांतील कामगाराकडे सूचना ( Writ ) पाठविण्यांत येते. मग तो कामगार पार्लमेंटांतील सभासदाच्या जागेकरितां मतदार होऊं इच्छिणारांनीं अमक्या दिवशीं आपलीं नांवें कळवावींत म्हणून ठरवितो. त्या दिवशीं जर एकाच उमेदवारानें आपलें नांव दाखल केलें तर तो उमेदवार एकदम पार्लमेंटचा सभासद निवडला जातो. जर दोन किंवा अधिक उमेदवार आले तर निवडणुकीचा दिवस ठरविण्यांत येतो. मतदारांचीं मतें गुप्त पद्धतीनें (Ballot) घेण्यांत येतात. शेवटीं मतें मोजण्यांत येऊन ज्याला सर्वांत जास्त मतें मिळालीं असतील तो निवडून आला असें समजतात. इ. स. १७१७ त पार्लमेंटची ज्यास्तींत ज्यास्ती मुदत म्हणजे सात वर्षें ठरविण्यांत आली होती, म्हणजे एकदां निवडून आलेले सभासद जास्तींत जास्त म्हणजे सात वर्षें सत्ताधारी असत. परंतु ही मुदत अलीकडे पांच वर्षांची करण्यांत आली आहे ( १९११ ). त्याचप्रमाणें नवा राजा गादीवर आल्यानंतर सहा महिन्यांच्या आंत नवी पार्लमेंट बोलाविलीच पाहिजे असा प्रघात आहे.

**५ बिलांचे संस्कार**—कोणत्याही बिलाला कायद्याचें स्वरूप यावयाचें म्हटलें म्हणजे त्याला कॉमन्स व लॉर्ड्स या दोन्ही सभांतून कांहीं विशिष्ट संस्कारांतून जावें लागतें. ( १ ) पहिल्यानें तें बिल कोणीं तरी सभेपुढें मांडावयाचें व मग त्याचें पहिलें वाचन व्हावयाचें. ( २ ) फिरून त्याचें दुसरें वाचन व्हावयाचें. या वेळीं बिलांतील तत्त्व म्हणजे त्याचें प्रयोजन आणि सामान्य स्वरूप यांसंबंधीं वादविवाद होऊन या मुद्यांची पूर्ण छाननी होते. होमरूलसारख्या महत्त्वाच्या विषयावरील बिल असल्यास हें दुसरें वाचन आठवडेच्या आठवडे चालू राहतें. ( ३ ) या दुसऱ्या वाचनांतून बिल जर निभावलें तर [1]सर्व सभा कमिटी

१ सर्वच बिलांचा विचार करण्यास सर्व सभा कमिटी या नात्यानें

( पुढील पानावर चालू. )

या नात्यानें बसावयाची व तिजकडून प्रकरणवार त्या बिलाची छाननी व्हावयाची. कमिटीपुढें बिल असतांना त्यांत कोणास दुरुस्त्या सुचवावयाच्या असल्यास त्या सुचवितां येतात व त्या पसंत झाल्यास बिलांत समाविष्ट करण्यांत येतात. (४) कमिटींतून पार पडल्यानंतर सर्व सभेस त्या बिलाचा रिपोर्ट करण्यांत येतो. कमिटीनें बिलांत फेरफार केले असल्यास या रिपोर्टाच्या संस्काराच्या वेळींही आणखी वादविवाद होऊन नवे फेरफार होण्याचा संभव असतो. कमिटी या नात्यानें ज्याचा खल केलेला असतो अशा बिलांत त्यावेळीं फेरफार झाले नसल्यास त्या बिलापुरता हा रिपोर्टाचा संस्कार अजिबात वगळण्यांत येतो. (५) त्यानंतर बिलाचें तिसरें वाचन होऊन त्यावर सभेचीं मतें घेण्यांत येतात. या तिसऱ्या वाचनाचे वेळीं दुसऱ्या वाचनाप्रमाणें तपशील सोडून केवळ सामान्य दृष्टीनेंच बिलाचा खल होतो. या सर्व सोहळ्यांतून दोन्ही सभांमध्यें जेव्हां एकादें बिल यशस्वीपणें बाहेर पडेल तेव्हां त्याला पार्लमेंटची संमति मिळाली असें समजण्यास हरकत नाहीं. त्यानंतर एकदां त्यावर राजाची सही झाली म्हणजे त्या बिलाला पूर्णपणें कायद्याचें स्वरूप येतें. सभेपुढें बिल मांडण्याचा अधिकार (Right of Initiation) तत्त्वतः सभेच्या कोणाही सभासदास आहे. तथापि व्यवहारदृष्ट्या हा अधिकार सामान्य सभासदांकडून सहसा बजाविण्यांत येत नाहीं. बहुतेक सर्व बिलें प्रधान-

---

बसत नाहीं. सर्वसाधारण बिलांचा खल पार्लमेंटची निवडणूक झाल्याबरोबर चार कायमच्या कामिट्या नेमिलेल्या असतात त्यांजपुढें होतो. या कमिट्यांत ८०।९० सभासद असून एकंदर सभेंत निरनिराळ्या पक्षांच्या बलाचें जें प्रमाण असतें तेंच या कमिट्यांतून राखलें असतें. मात्र पैशासंबंधीं व इतर महत्त्वाच्या बिलांचा खल सर्व सभेच्या कमिटींत होतो.

२ कांहीं प्रसंगीं दुसरें वाचन झाल्यानंतर कमिटीपुढें जाण्यापूर्वी बिल एका निवडक कमिटीकडे पाठविण्यांत येतें. ही कमिटी बहुधा बिलांतील मुद्यांसंबंधीं चौकशी करण्याकरितां नेमिलेली असून पुरावा गोळा करण्याचें काम ती करते. अशा बिलास एकंदर सहा संस्कारांतून जावें लागतें.

मंडळाच्या प्रतिनिधींकडून सभेपुढें मांडण्यांत येतात. अशा बिलांस सरकारी बिलें म्हणतात; व अलीकडे सरकारी बिलांचाच विशेष सुळसुळाट असून सामान्य सभासदांचा बिलें पुढें मांडण्याचा हक्क जवळ जवळ लुप्तप्राय झाला आहे. यावरून प्रधानमंडळाची सत्ता कायद्याची अंमलबजावणी करावयाची येवढ्यापुरतीच नसून कायदे करण्याच्या कामांतील बिलें पहिल्यानें पुढें मांडण्याचा महत्त्वाचा हक्कही जवळ जवळ त्याच्या हातीं गेला असल्यानें त्याचें प्राबल्य कसें वाढलें आहे हें दिसून येईल.

**६ प्रधानमंडळ कसें बनतें**––कायद्याची अंमलबजावणी करण्याचा अधिकार राजा व त्याचें प्रिव्ही कौन्सिल यांजकडे असतो. जे जे सरकारचे जाहिरनामे अगर हुकूम निघतात यांच्यावर 'कौन्सिलच्या सल्ल्यावरून राजाकडून' (by the King in Council) असे शब्द असतात. परंतु वस्तुतः पाहतां प्रिव्ही कौन्सिल व राजा या दोघांकडेही खरे अधिकार नसून प्रिव्ही कौन्सिलची कमिटी म्हणून जें प्रधानमंडळ असतें त्याच्या हातीं सर्व सूत्रें असतात. प्रधानमंडळाची रचना कशी असते यासंबंधीं मागें ठिकठिकाणीं उल्लेख आले आहेतच. पण संगतवार माहिती एके ठिकाणीं असणें इष्ट म्हणून ती येथें देण्यांत येत आहे. इंग्लंडांत राजकीय दृष्ट्या दोन प्रमुख पक्ष आहेत. एक लिबरल व दुसरा कॉन्झर्व्हेटिव्ह. मजूर–पक्ष, सोशिॲलिस्ट, आयरिश नॅशनॅलिस्ट वगैरे इतरही पक्ष आहेत; पण मुख्य मुख्य प्रश्नासंबंधीं लिबरल व कॉन्झर्व्हेटिव्ह या दोन पक्षांचीं जीं कांहीं मतें असतील त्यांपैकीं एका पक्षाच्या मताचा स्वीकार करून त्यास हे पक्ष जाऊन मिळतात, व मुख्य गोष्टींसंबंधीं पार्लमेंटांत दोनच पक्ष निर्माण होतात. आतां असे दोन पक्ष तयार झाल्यावर कॉमन्ससभेंत ज्या पक्षाचें मताधिक्य असेल त्या पक्षाच्या पुढाऱ्यास राजा मुख्य प्रधान नेमितो. मग तो मुख्य प्रधान आपल्या पक्षांतील लोक निवडून प्रधानमंडळ तयार करतो. कॉमन्ससभेंत लिबरल पक्षाची सरशी असली म्हणजे लिबरल प्रधानमंडळ अधिकारारूढ होतें; व कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष विरोधी पक्ष ( Opposition ) या नात्यानें पार्लमेंटांत वागतो. प्रधानमंडळाची कांहीं तरी दिशा ठरलेली असते, व कॉमन्स सभेंत त्याच्या बाजूचें मताधिक्य

असेपर्यंत त्याला आपल्या दिशेनें राज्यकारभार चालविणें सोईचें पडतें. जेव्हां कॉमन्स सभेंत प्रधानमंडळाची बाजू खालावते व विरुद्ध पक्षाचा जोर होऊन सरकारी बिलें नापास होऊं लागतात तेव्हां प्रधानमंडळ राजीनामा देतें, अगर एकंदर देशांतील लोकमत आपणास अनुकूल आहे असें त्यास वाटत असल्यास पार्लमेंट बरखास्त करुन राजास नवी निवडणूक करण्याविषयीं विनंति करतें. जर नव्या पार्लमेंटांत प्रधानमंडळास अनुकूल मंडळीचें मताधिक्य झालें तर तेंच प्रधानमंडळ कायम राहतें. नाहीं तर विरुद्ध पक्षाच्या प्रधानमंडळाचे हातीं राज्यकारभार जातो. प्रधानमंडळाला 'क्याबिनेट' असेंही एक नांव आहे. क्याबिनेटचा मूळ अर्थ खाजगी खोली. हें नांव पडण्याचें कारण असें कीं, प्रिव्ही कौन्सिलच्या कांहीं निवडक सभासदांचे हातीं राज्यकारभार देऊन त्यांची भेट राजे खाजगी खोलींत घेत व तेथें वाटाघाट करण्याची वहिवाट असे. पहिला जॉर्ज व दुसरा जॉर्ज हे हॅनोव्हेरियन राजे इंग्लिश राज्यकारभारांत मुळींच लक्ष घालीत नसत, व प्रधानमंडळाच्या बैठकीस हजर राहून वाटाघाट करण्याची वहिवाट त्यांनीं बंद पाडिली. तेव्हांपासून मुख्य मुख्य प्रश्नांचा खल करण्यास प्रधानमंडळाच्या ज्या सभा भरतात त्यांस हजर राहण्याचें राजांनीं सोडून दिलें आहे, व त्यामुळें सर्व खल मुख्य प्रधानाच्या नेतृत्वाखालीं चालतो.

**७ प्रधानमंडळाची रचना व कार्य**—प्रधानमंडळांतील प्रधानांची संख्या अनियमित असते. तथापि त्यांतील महत्त्वाचे अधिकारी खालीलप्रमाणें असतात. १ मुख्य प्रधान ( खजिन्याकडील पहिले लॉर्ड ). २ लॉर्ड चॅन्सेलर ( लॉर्ड्स सभेचे अध्यक्ष ). ३ चन्सेलर ऑफ दी एक्सचेकर ( फडणीस ). ४ लॉर्ड प्रेसिडेंट ऑफ दी कौन्सिल. ५ होम सेक्रेटरी ( अन्तर्राष्ट्रीय मंत्री ). ६ परराष्ट्रीय मंत्री. ७ भारतमंत्री. ८ वसाहतींचा मंत्री. ९ युद्धमंत्री. १० लॉर्ड प्रिव्ही सील ( शिक्कामोर्तब बाळगणारा प्रधान ). ११ फर्स्ट लॉर्ड ऑफ दी ॲडमिरॅल्टी ( आरमाराचे प्रधान ). १२–१५ व्यापार, शिक्षण, शेतकी व स्थानिक स्वराज्य यांच्या मंडळांचे अध्यक्ष. आणखी ही कित्येक अधिकारी प्रधानमंडळांत असतात व एकं-

दर संख्या सुमारें वीसपर्यंत असते. या प्रधानमंडळाच्या पद्धतीला काय-
द्याचा आधार नसून केवळ आजपर्यंत चालत आलेल्या वहिवाटीस अनु-
सरूनच तिचा अंमल होत असतो. प्रधानांचीं नांवें सरकारी रीत्या केव्हांच
जाहीर करण्यांत येत नाहींत व त्यांच्या सभाही गुप्तच असतात. सर्वच
प्रधान एकाच पक्षाचे असावयाचे, सर्व प्रधानांचें काम मुख्य प्रधानाच्या
अनुमतानेंच चालावयाचे, कॉमन्स सभेंतील आपल्या पक्षाच्या सभासदांचें
आनुकूल्य कायम राहील याची जबाबदारी ओळखून एकंदर प्रधानमंडळाचें
काम चालावयाचें व कोणाही प्रधानाचे कृत्याबद्दल सर्व प्रधानमंडळ जबाब-
दार असावयाचें हे हल्लींच्या प्रधानमंडळाच्या पद्धतीचे विशेष आहेत.

८ **राजपद**—इंग्लंडचा राजा प्रॉटेस्टंटच असला पाहिजे असा
१७०१ त कायदा झाला. राजाचे हक्क १६८९ त क्रान्तीचे वेळीं
'हक्कांची मंजुरी' ( Bill of Rights ) नांवाचा जो कायदा झाला त्यानें
बरेच मर्यादित करण्यांत आले. पण तत्त्वतः कांहीं अधिकार अजूनही
राजाचे म्हणून समजले जातात. नवे उमराव करणें, पार्लमेंट बोलाविणें,
ती तहकूब अगर बरखास्त करणें, पार्लमेंटनें केलेल्या कायद्याला संमति देणें
अगर न देणें, धर्मखात्यांतील व इतर जागांवर माणसें नेमणें, शिक्षा
दिलेल्या आरोपीस माफी करणें, युद्ध करणें किंवा तह करून शांति करणें
या राजाच्या हक्काच्या बाबी म्हणून अजून कबूल केल्या जातात. यांपैकीं
पार्लमेंटचा कायदा नामंजूर करण्याचा हक्क १७०७ नंतर केव्हांच राजानें
उपयोगांत आणिला नाहीं, व इतर हक्कांचीही वहिवाट प्रधानमंडळाचे
सल्ल्यानेंच करण्यांत येते. तेव्हां दिसावयाला राज्यकारभाराचा मुख्य राजा
दिसला तरी वस्तुतः प्रधानमंडळाच्या तंत्रानें सर्व राज्यकारभार चालतो;
आणि त्याचें अस्तित्व कॉमन्स सभेंतील बहुमतावर अवलं-
बून असते. अर्थात् राज्याधिकारी लोकसभेला जबाबदार असतात
व त्यामुळें त्यांचें वर्तन लोकमतास अनुसरून घडतें. एकोणिसाव्या शत-
कांत राजाचा कांहीं उपयोग नाहीं, व तो केवळ सरकारला भारभूत
आहे अशी समजूत झाली होती. परंतु परराष्ट्रांसंबंधीं व्यवहारांत व
एकंदर राज्यकारभार सुसंगत राखण्यास राजपदाचा किती उपयोग आहे

हें अलीकडे लोकांच्या मनावर ठसूं लागलें आहे. शिवाय सर्व साम्राज्यभर राजनिष्ठा दृढ राहण्यास वंशपरंपरा राजपदासारखी दुसरी तोडच नाहीं असें मुत्सद्दी लोक म्हणूं लागले आहेत.

९ **वसाहती**—इंग्रज सरकारला–प्रधानमंडळ व पार्लमेंट–केवळ ग्रेट ब्रिटन व आयर्लंड येवढ्याच देशांचा राज्यकारभार करावयाचा असतो असें नाहीं. वर जी प्रधानमंडळांतील प्रधानांची याद दिली आहे तींत वसाहतींचा प्रधान व हिंदुस्थानचा प्रधान या दोन स्वतंत्र प्रधानांची गणना करण्यांत आली आहे. वसाहती सर्व पृथ्वीवर पसरल्या असून व्यापाराच्या दृष्टीनें व फाजील प्रजेला वसाहत करण्यास उपयोगी या दोन तऱ्हांनीं वसाहतींचा इंग्लंडास उपयोग आहे. एकंदर वसाहतींचे तीन प्रकार करण्यांत आले आहेत. क्यानडा, ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका या तीन वसाहती पूर्ण स्वराज्याचा उपभोग घेत आहेत. हा स्वराज्याचा पूर्ण उपभोग घेणाऱ्या वसाहतींचा वर्ग झाला. दुसरा वर्ग सीलोन व जमेका इत्यादि लहान लहान वसाहतींचा होय. या वर्गांतील वसाहतींचा राज्यकारभार पुष्कळ अंशानें इंग्लंडांतून नेमिलेल्या गव्हर्नरच्या हातीं असतो. यांना क्राउन कॉलनीज ( राजाच्या वसाहती ) असें म्हणतात. तिसरा वर्ग म्हटला म्हणजे नवीन सामील केलेल्या नायजीरिया, ब्रिटिश ईस्ट आफ्रिका ( पूर्व आफ्रिका ) यांचा होय. या देशांत अजून पुरतीशी वसति नसते व मूळ रहिवाशांपासून रक्षण करावयाचें हाच या वसाहतीं मधून मुख्य उद्देश असल्यानें त्यांना 'संरक्षित प्रदेश' मानतात. यांतील कारभार कमिशनर अगर रेसिडेंट याच्या हातीं असून वसाहतींच्या प्रधानाच्या हुकुमानुसार तो आपला कारभार चालवितो.

१० **हिंदुस्थान**—हिंदुस्थानांत मूळची तीस कोटि वस्ती असल्यानें व हवा उष्ण असल्यानें वसाहत करणें शक्य नाहीं. परंतु व्यापार आणि येवढ्या विस्तीर्ण देशावर राज्य करावयास मिळाल्यामुळें कर्तृत्वशक्ति प्रगट करण्यास मिळालेली उत्तम संधि हे हिंदुस्थानपासून इंग्लंडला मोठे फायदे आहेत. व्हाइसरॉय हा हिंदुस्थानचा मुख्य अधिकारी असून भारतमंत्र्याच्या

सल्ल्यानें हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहतो. वसाहतीच्या प्रधानाचा खर्च ब्रिटिश तिजोरींतून व्हावयाचा; पण भारतमंत्री आणि त्याचें कौन्सिल यांचा खर्च हिंदुस्थानच्या तिजोरींतून व्हावयाचा अशी व्यवस्था आहे.

११ **आरमार**---येवढें ब्रिटिश-साम्राज्य परशत्रूपासून सुरक्षित राखावयाचें तें कशाच्या जोरावर? साम्राज्य सर्व जगभर विखुरलेलें असल्यामुळें तें केवळ लष्करी सामर्थ्याच्या जोरावर सुरक्षित राखणें शक्य नाहीं. इग्लंडचें सामर्थ्य व वैभव हीं इंग्लिश आरमाराच्या बळकटीवर अवलंबून आहेत ही गोष्ट एलिझबेथ राणीच्या वेळेपासून इंग्लिशांचे मनावर पक्की बिंबली आहे. आरमाराच्या जोरावरच स्पेन, हॉलंड, फ्रान्स या प्रतिस्पर्ध्यांशीं टक्कर देऊन इंग्रजांनीं त्यांपैकीं प्रत्येकास शरण यावयास लाविलें; व आजही जगांतील सर्व देशांचीं आरमारें एका बाजूला आणि आपलें आरमार एका बाजूला अशी स्थिति झाल्यास आपण त्या सर्व आरमारांवर वरचढ करूं असा इंग्रजांस पक्का भरंवसा आहे. ब्रिटिश आरमारांत ३१ ड्रेडनॉट, ४० ड्रेडनॉट-पूर्वकालीन लढाऊ जहाजें, ५० क्रूझरें, ७६ लाइट क्रूझरें आहेत. युद्धाच्या वेळीं शत्रूच्या जहाजांचा नाश करण्यास २४८ विनाशिका, १०० टॉर्पेडो-बोटी व ७६ पाणबुड्या ( Submarines ) आहेत. आरमारांत एकंदर सुमारें दीड लाख लोक असून या खात्याचा वार्षिक खर्च १९१३ सालीं ४ कोटी ८८ लक्ष पौंड झाला. आरमाराचा मुख्य अधिकारी पूर्वीं 'लॉर्ड हाय ॲड्मिरल' हा असून त्या जागीं बहुशः राजघराण्यांतील पुरुषाची योजना होत असे. परंतु १७०८ पासून मुख्य व्यवस्था एका बोर्डाकडे आली. हल्लीं आरमार-मंडळांत ( Board of the Admiralty ) सहा सभासद असून त्यांच्यापैकीं पहिला लॉर्ड प्रधानमंडळांत असतो, व तो आरमार-खात्याच्या सर्व कृत्यांबद्दल पार्लमेंटला जबाबदार असतो. जिब्रॉल्टर, माल्टा, एडन इत्यादि ठाण्यांची व्यवस्था राखून इंग्रजांचा समुद्रावरील व्यापार व संचार

१ १९१९ सालच्या नवीन सुधारणांप्रमाणें हा खर्च ब्रिटिश तिजोरींतून व्हावा असें ठरलें आहे.

निर्बाध चालेल अशी व्यवस्था राखणें हेंच आरमार–खात्याचें महत्त्वाचें काम आहे. युद्धाच्या काळीं तर आपला संचार व व्यापार सुरक्षित ठेवून शत्रूचा कोंडमारा करण्याचें काम त्यास करावें लागतें. ब्रिटिश आरमारास ब्रिटनचा किनाराच तेवढा सुखरूप राखावयाचा नसून सर्व वसाहती, हिंदुस्थान व साम्राज्यांतील इतर प्रदेश यांचें संरक्षण करण्याचीही जोखीम त्याजवर आहे. अलीकडे क्यानडा, ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड यांनीं स्वतःच्या मालकीचीं लढाऊ जहाजें बांधून व त्यांजवर काम करणाऱ्या लोकांचा खर्च चालवून साम्राज्य–सरकारास साहाय्य करण्याचें धोरण अंगीकारलें आहे.

१२ **सैन्य–व्यवस्था**—इतर महत्त्वाकांक्षी युरोपियन राष्ट्रांशीं गांठ असल्यामुळें खुद्द ब्रिटन व ब्रिटिश–साम्राज्य यांच्या संरक्षणासाठीं जंगी लष्कर सज्ज ठेवणें इंग्रजांस अवश्यक आहे. ब्रिटिश लष्कराचे दोन भाग आहेत; एक खास सैन्य ( Regular Army ) व दुसरा स्वयंसैनिक ( Territorial Army ) निदान बारा वर्षें नोकरी करण्याच्या अटीवर खास सैन्यांत लोकांची भरती करण्यांत येते. त्या बारा वर्षांपैकीं सात वर्षें प्रत्यक्ष नोकरी व पांच वर्षें शिलकी फौजेंत नोकरी करावयाची असते. स्वयंसैनिकांना निदान चार वर्षें नोकरी करण्याचा करार करून द्यावा लागतो. शांततेच्या वेळीं 'खास सैन्यां'तील बहुतेक सर्व लोक ब्रिटनबाहेर साम्राज्यांतील इतर भागांत नोकरी करण्यांत गुंतलेले असतात, व स्वयंसैनिकांस मात्र ब्रिटनच्या बाहेर जावें लागत नाहीं. युद्ध सुरू झालें म्हणजे खास सैन्यास 'मोहिमेवरील फौज' (Expeditionary Force) असें नामाभिधान प्राप्त होऊन युद्धभूमीकडे जावें लागतें; व देश–संरक्षणाचें काम स्वयंसैनिकांवर येतें. १९१४ सालीं महायुद्ध सुरू झालें तेव्हां खास सैन्यांत सुमारें साडेतीन लक्ष लोक असून स्वयंसैनिकांची संख्या तीन लक्ष होती. सैन्यामध्यें तोफखान्यांतील ऑफिसर होण्यास रॉयल मिलिटरी ॲक्याडेमीमध्यें शिक्षणाची सोय आहे, व रॉयल मिलिटरी कॉलेजांत घोडदळ व पायदळ यांतील ऑफिसर तयार होतात. सर्व सैन्याची मुख्य व्यवस्था सेनामंडळाकडे ( Army Council ) असून त्यांत युद्धमंत्रि ( Secretary of State For war ) व सैन्याच्या सहा शाखां-

तील मुख्य अधिकारी असतात. १९१४ सालीं सैन्यखर्चाचा वार्षिक
अंदाज २ कोटी ८८ लक्ष पौंड करण्यांत आला होता. ही सैन्यव्यवस्था
ठोकळमानानें १८५४–१८५५ त झालेल्या क्रिमिअन युद्धानंतर अंमलांत
आली. त्या युद्धांत शिलकी फौज व लष्करी अनुभव मिळालेले पुष्कळ
लोक देशांत असणें कसें जरूर आहे हें इंग्रजांच्या लक्षांत आलें. मग
१८७१–७२ त कार्डवेल या युद्धमंत्र्यानें एक सैन्य–सुधारणेचा कायदा
पार्लमेंटांत पास करून घेऊन हल्लींच्या सैन्य–व्यवस्थेचा पाया घातला.
तेथपर्यंत एकादा मनुष्य सैन्यांत शिरला कीं यावजन्म ( म्हातारपणापर्यंत )
लष्करा नोकरी करण्याच्या अटीवर तो सैन्यांत दाखल होई. यापुढें दीर्घ-
कालीन नोकरीच्या ऐवजीं बारा वर्षांची अल्प मुदतीची नोकरी ( Short
Service ) अंमलांत आली. सैन्यांतील एकाद्या तुकडींतील निम्मे
शिपायी इंग्लंडांत रहावयाचे व निम्मे साम्राज्यांतील इतर भागांत रहाव-
याचे अशी जोड–तुकडीची व्यवस्था करण्यांत आली. त्याचप्रमाणें लांच
भरून ऑफिसर बढती करून घेत, ती पद्धत बंद करण्यांत आली.
युद्धाच्या वेळीं स्वयंसैनिक–पथकें उभारण्यांत येत. तशींच नेपोलियनशीं
चाललेल्या युद्धाच्या वेळीं व बोअर युद्धाच्या वेळीं उभारलीं होतीं. परंतु
कायमचीं स्वयंसैनिक–पथकें जास्त उपयोगीं होतील असें वाटल्यावरून
१९०८ त 'टेरिटोरिअल फोर्स' ची स्थापना झाली व त्यायोगें लष्करी
बाबतींत तरबेज लोकांची संख्या देशांत सतत राहूं लागली. वयांत आलेल्या
सर्व तरुणांस सक्तीनें कांहीं काळ लष्करांत सामील करण्याची पद्धति
फ्रान्स, जर्मनी इत्यादि देशांत विसाव्या शतकांत अंमलांत आली आहे.
इंग्लंडमध्येंही सक्तीची पद्धति अंमलांत आणण्याबद्दल लॉर्ड रॉबर्ट्सच्या
नेतृत्वाखालीं चळवळ झाली; परंतु त्या चळवळीस यश आलें नाहीं व
खुषीनें लष्करांत सामील होण्याची पद्धतिच इंग्लंडांत अंमलांत आहे.



परिशिष्ट—१.

# सनावली.

## ( १ ) इंग्लिश वृत्तें.

१६६० पुनरागमन.
१६६१ पोर्तुगालच्या राजानें मुंबई आंदण दिली.
१६८९ वुइल्यम व मेरी गादीवर आलीं. क्रान्ति. बिल ऑफ राइट्स.
१७०१–१७१३ स्पॅनिश वारशाचें युद्ध.
१७०४ ब्लेन्हीमची लढाई. जिब्रॉल्टर काबीज केलें.
१७०७ इंग्लंड व स्कॉटलंड येथील पार्लमेंट एक झाल्या.
१७१३ युट्रेचचा तह.
१७१४ पहिला जॉर्ज, हॅनोव्हेरियन घराणें.
१७२०–१७४२ वॉल्पोलचा राज्यकारभार.
१७१५व१७४५ जॅकोबाइट बंडें.
१७५६–१७६३ सप्तवार्षिक युद्ध.
१७५७ प्लासीची लढाई.
१७५९ क्विबेकची लढाई. क्यानडा हातीं आला.
१७६० वांदीवाशची लढाई.
१७६०–१८२० तिसरा जॉर्ज.
१७७५–१७८३ अमेरिकन स्वातंत्र्याचें युद्ध.
१७७६ अमेरिकन स्वातंत्र्याचा जाहीरनामा.
१७८३–१८०१ धाकट्या पिटची प्रधानगिरी.
१७८८ ऑस्ट्रेलिया साम्राज्यांत आलें; तेथें हद्दपार लोकांची [वसाहत.
१७८९ फ्रेंच राज्यक्रान्ति.
१७९१ क्यानडाचे दोन प्रांत होऊन त्यांत प्रातिनिधिक राज्यपद्धति सुरू झाली.

१७९३–१८०२ फ्रेंच राज्यक्रान्तिकारकांशीं युद्ध.
१७९५–१७९६ केप कॉलनी व सिलोन इंग्रजांनीं जिंकलीं.
१७९८ नाईलची लढाई.
१८०० इंग्लंड व आयर्लंड येथील पार्लमेंटांचें ऐक्य.
१८०३–१८१५ नेपोलियनशीं युद्ध.
१८०५ ट्राफल्गारची लढाई.
१८१० मॉरिशस काबीज केलें.
१८१५ वॉटर्लूची लढाई.
१८३२ रिफॉर्म बिल.
१८३७–१९०१ व्हिक्टोरियाची कारकीर्द.
१८३७ क्यानडांत बंड.
१८४६ धान्याचा कायदा रद्द झाला.
१८४७ क्यानडांत जबाबदार स्वराज्याची स्थापना.
१८५४–१८५६ क्रिमियन युद्ध.
१८५७ हिंदुस्थानांतील शिपायांचें बंड.
१८५८ राणीचा जाहीरनामा.
१८७० सक्तीच्या शिक्षणाचा कायदा.
१८८३ इजिप्तांत इंग्रजी अंमल.
१८९० मोफत शिक्षणाचा कायदा.
१८९९–१९०२ बोअर युद्ध.
१९०४ अँग्लो–फ्रेंच सख्य.
१९०७ अँग्लो–रशियन सख्य.
१९१० पांचवा जॉर्ज गादीवर आला.
१९१४ महायुद्धास सुरुवात.

## ( २ ) परकीय वृत्तें.

१६८५ 'नँटिजच्या जाहीरनाम्यानें प्रॉटेस्टंटांस मिळालेल्या सवलती' चौदाव्या लुईनें काढून घेतल्या. त्यामुळें हजारों प्रॉटेस्टंट फ्रान्सांतून इंग्लंड, हॉलंड व प्रशिया या देशांत

गेले,त्या देशांच्या उद्योगधंद्यांना चांगलाच फायदा झाला.

१७११ सहावा चार्लस हा जर्मन बादशहा झाला.

१७१४ रॅस्टाट ( Rastadt ) चा तह फ्रान्स व ऑस्ट्रिया यांजमध्यें झाला. त्यायोगें बेल्जम, नेपल्स व सार्डिनिया हे प्रांत जर्मन साम्राज्यांत समाविष्ट करण्याचें ठरलें.

१७१८ आल्बरोनी या स्पॅनिश प्रधानानें युट्रेच व रॅस्टाट या तहांना हरताळ फासून सार्डिनिया स्पेनला परत मिळविण्याची खटपट चालविली. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी व हॉलंड या चार राष्ट्रांचा स्पेनविरुद्ध संघ झाला. तेव्हां स्पेनच्या राजानें आल्बरोनीस कामावरून दूर केलें व त्यामुळें युद्ध टळलें.

१७२० जर्मन बादशहानें सॅव्हॉयच्या ड्यूकपासून नेप्लस आणि सिसिली हे प्रांत मिळविले व त्याच्या मोबदला म्हणून त्याला सार्डिनिया व राजा ही पदवी दिली. याच सॅव्हॉयच्या ड्यूकचा वंशज व्हिक्टर इमॅन्युएल हा संयुक्त इटलीचा राजा झाला ( १८६१ ).

१७२४ जर्मन बादशहा सहावा चार्लस यानें आपली मुलगी मराया थेरिसा हिला राज्यास वारस ठरविणारें पत्रक तयार केलें व त्यास प्रमुख युरोपियन राष्ट्रांनीं संमति दिली.

१७६८ कॉर्सिका बेट फ्रान्सला जोडण्यांत आलें. यापूर्वीं तें जिनोआच्या ताब्यांत होतें.

१७७२,१७९३, १७९५ पोलंडची प्रशिया, रशिया व ऑस्ट्रिया यांचेमध्यें वांटणी.

१७८६ प्रशियाचा राजा फ्रेड्रिक याचा मृत्यु. याच्या कारकीर्दीपासून प्रशियाची युरोपांतील प्रमुख राष्ट्रांत गणना होऊं लागली.

१७८९ जॉर्ज वॉशिंग्टन हा स्वतंत्र अमेरिकेचा पहिला अध्यक्ष निवडला गेला.

१७८९ फ्रेंच राज्यक्रान्ति. स्टेट्स जनरलची बैठक. बॅस्टिलचा [ नाश.
१७९१ ट्यूलेरीज राजवाडयाचा विध्वंस.
१७९२ सप्टेंबरांतील कत्तल.
१७९३ सोळाव्या लुईचा वध ( जानेवारी )
१७९५ डिरेक्टरीच्या अंमलास सुरुवात.
१७९६ बोनापार्टचें इटलींत गमन.
१७९९ नेपोलियन पहिला कॉन्सल झाला.
१८०४ नेपोलियन बादशहा झाला.
१८०५ ऑस्टर्लिट्झच्या लढाईत नेपोलियननें ऑस्ट्रियाचा पराभव केला.
१८०६ शार्लमेननें ८०० त स्थापिलेलें 'पवित्र रोमन साम्राज्य' ऑगस्टच्या ६ तारखेस नष्ट झालें. बादशहा दुसरा फ्रॅन्सिस हा पहिला फ्रॅन्सिस या नांवानें ऑस्ट्रियाचा वंशपरंपरा बादशहा अशी द्वाही अगोदरच फिरली होती ( १८०४ ).
१८०६ जिना येथें नेपोलियननें प्रशियाचा पराभव केला, ऑक्टोबर तारीख ६.
१८०७ रशिया व फ्रान्स यांजमध्यें टिल्सिटचा तह, फ्रेंचांनीं स्पेन व पोर्तुगाल व्यापिलीं.
१८०८ राजा जोसेफ बोनापार्ट याजविरुद्ध स्पेनचें बंड.
१८०९ नेपोलियननें वॉग्राम येथें ऑस्ट्रियनांचा पराभव केला.
१८१२ नेपोलियनची रशियावर स्वारी; बोरोडिनोची लढाई व मॉस्कोचें दहन; नेपोलियनची अत्यंत नुकसानीची पिछेहाट.
१८१३ [ ऑक्टोबर ] लिप्झिग येथें ऑस्ट्रिया, प्रशिया व रशिया यांनीं मिळून नेपोलियनचा पराभव केला !
१८४८ राज्यक्रान्तिचें वर्ष, लुई नेपोलियन फ्रेंच प्रजासत्ताकाचा पहिला अध्यक्ष.

१८५२ लुई नेपोलियन, 'तिसरा नेपोलियन' ही पदवी घेऊन फ्रान्सचा बादशहा झाला.

१८६० नेपल्स व सिसिली ग्यारिबाल्डीनें जिंकले.

१८६१ संयुक्त इटलीची पहिली पार्लमेंट.

१८६१–१८६५ अमेरिकेंतील संस्थानांचे गुलामगिरीच्या प्रश्नावर दोन तट होऊन परस्परांत युद्ध.

१८६४ श्लेस्विग व हॉलस्टीन हे डेन्मार्ककडे असलेले प्रांत प्रशिया व ऑस्ट्रिया यांनीं व्यापले.

१८६६ ऑस्ट्रिया व प्रशिया यांजमध्यें युद्ध; प्रशियाचा जय. ऑस्ट्रियापासून इटलीला व्हेनिशिया मिळाला.

१८६७ उत्तर जर्मन संघ.

१८६९ सुएझचा कालवा उघडला.

१८७० फ्रान्स व जर्मनी यांजमध्यें युद्ध, जर्मनीचा जय. फ्रान्स-मध्यें तिसऱ्या लोकसत्ताकाची स्थापना, इटलीला पोप-च्या ताब्यांतील मुलूख मिळाला व इटलीची पुरी राष्ट्रीय वाढ झाली.

१८७१ जर्मन साम्राज्याची स्थापना. प्रशियाचा राजा पहिला वुइल्यम हा जर्मन साम्राज्याचा पहिला बादशहा झाला.

१८७६ बल्गेरियांत तुर्कांचे अत्याचार.

१८७९ ऑस्ट्रिया व जर्मनी यांचा संकटकाळीं परस्परांस साहाय्य करण्याविषयीं तह.

१८८७ ऑस्ट्रिया व जर्मनी यांना इटली मिळून मध्य युरोपां-तील त्रिकुटाची उत्पत्ति.

१८९० फ्रान्स व रशिया यांचा सख्याचा तहनामा.

१८९४ चीन व जपान यांजमध्यें युद्ध.

१८९८ फिलिपाइन बेटें स्पेनपासून अमेरिकेनें घेतलीं.

१८९९ हेग येथील शांतता–परिषद.

१९०४–१९०५ रूसो–जपानी युद्ध.

---

# वाचनीय पुस्तकें व उतारे.



## राजा की पार्लमेंट १६६०–१७१४

When London burned by Henty.
London Pride by F. H. Burnett.
Old St. Paul's by H. Ainsworth.
Micah Clarke by Conan Doyle.
Lorna Doone dy Blackmore.
For Faith and Freedom by Walter Basent.
Shrewsbury by Stanley Wayman.
With Marlborough to Malplaquet by Strang.
Mar.lborough by G. Saintsbury.
Henry Esmond ( Anne ) by Thackeray.
Macaulay's Essays ( War of the Spanish Succession, The Comic Dramatists of the Restoration.)

## साम्राज्याकरितां झगडा १७१४–१८१५.

Bonnie Prince Charlie by Henty.
Anson's voyage (1740-1744) by Richard Walter (Blackie's library of Famous books.)
For James or George by Adams.
Kidnapped by R. L. Stevenson.
Catriona by R. L. Stevenson.
Roger the Scout ( Reign of George II ) by Strang and Lawrence.
With Wolfe in Canada by Henty.
Cook's Voyages. (Blackie's library of Famous Books.)
Waverley by Scott (Retold for Boys and Girls.)
With Frederick The Great (Seven Years' War) by Henty.

The Romance of War by James Grant.
With Moore at Corunna by Henty.
Under Wellington's Command by Henty.
True To The Old Flag (American War of Independence) by Henty.
The Tale of Two Cities by Dickens (Retold for Boys and Girls.)
In the Reign Of Terror (French Revolution) by Henty.
Napier's Battles of the Penisular War (Blackie's Library of Famous Books.)
Life of Nelson by Southey.
Life of Napoleon I (2 Volumes) by J. H. Rose.
Napoleon by Herbert Fisher.
Macaulay's Essays (Clive, Pitt, Chatham, Walpole, Johnson, Madam D' Arblay.)

Poems:
- The Battle of the Baltic by Campbell.
- The Burial of Sir John Moore by Wolfe
- The Eve of Waterloo by Byron.

## साम्राज्याची वाढ व अन्तर्व्यवस्था १८१५–१९१४.

The Growth of the British Empire by P. H. and A. C. Kerr.
The Victorian Era by P. A. Graham.
Life and Times of Queen Victoria by Henty.
Out With Garibaldi (The Story of the Liberation of Italy) by Henty.
Australia's Story 'Romance of the World' series by Strang (4 Vol.)
Canada's Story 'Romance of the World' series by Strang (4 Vol.)
Settlers in Canada by Captain Marryat (Black-

ie's Library of Famous Books.)
Sybil (Chartists) by Beaconsfield.
Heroes of Industry by Francis Cooke.
With Buller In Natal by Henty.
With Roberts To Pretoria by Henty.
Poem: The Charge of the Light Brigade by Tennyson.

## संकीर्ण संग्रह.

English Poetry for the Young 'Blackie's Library of Famous Books'.
The Storied Past ( A Book of Selections from English Literature illustrative of English History) 'Arnold's Literary Reading Books'.
England 'Peeps at Many Lands' by John Finnnemore.
Makers of Nations 'Noble Lives' series.
Britain's Sea-Story (B. C. 55—A. D. 1805) by Spright.
High Roads of History, Volumes 1 to 6.
Brief Survey of British History by Townshend Warner.
English History From Original Sources (4 Volumes) by Morgan.
Decisive Battles of The World by Creasy ( Blackie's Library of Famous Books ).

Oxford History Readers 1 to 11. 1 Children In History, 2 Heroes In History, 3 Stories From English History, 4 Outlines of English History, 5 The Tudor Period, 6 The Stuart Period, 7 The Georgian Period, 8 The Reign of Victoria, 9 The Story of the Empire, 10 The Reign of Edward VII, 11 Citizens of the Empire.

Oxford Supplementary Histories 1 to 6, 5 Scenes of Stuart Times, 6 Scenes Of The Hanoverian Period.

---

# मराठी पुस्तकें.



## चरित्रें

आल्फ्रेड दी ग्रेट—ओक.
मार्टिन ल्यूथर—देशमुख.
लॉर्ड बेकन—काणे.
जॉर्ज वॉशिंग्टन—पंडीत.
" " —वाळवेकर.
वुइल्यम पिट—निगुडकर.
बेंजामिन फ्रँक्लिन—टिपणीस.
वॉरन हेस्टिंग्ज—ओक.
नेपोलियन—बापट.
" —भावे.
" —मुंडले.
ड्यूक ऑफ वेलिंग्टन—ओक.
जॉन ब्राइट—जोशी.
रिचर्ड कॉब्डेन—भानू.
ग्लॅडस्टन—ओक.
व्हिक्टोरिया महाराणी—गुंजीकर.

## प्रवास

विलायतचा प्रवास भाग १—२—पावगी.
माझा युरोपांतील प्रवास—गुणे.
युनायटेड स्टेट्सची लोकस्थिति, (प्रवासवृत्त)—पंडिता रमाबाई
इंग्लंडचा प्रवास—विंचूरकर.

## इतिहास

इंग्लंडचा इतिहास १७१४–१८३७—फडके.
इंग्लंड देशाचा विस्तार—सरदेसाई.
नेदर्लँडांतील बंडाचा इति.—द्रवीड
नौकानयनाचा इतिहास—बापट.
फ्रान्स देशांतील राज्यक्रान्तीचा इतिहास—ओक.

## सामान्य-विषय

इंग्लंडांतील प्रधानमंडळ—आगाशे.

---

## परिशिष्ट—३

# पारिभाषिक शब्दांचा कोश.



Adjournment — ( ॲडजर्नमेंट ); तहकुबी, पार्लमेंटची बैठक बंद करून पुनः बैठक सुरू व्हावयाच्या वेळीं बंद होत असतांना जेथवर काम झालें असेल त्याच्यापुढें तें नंतर सुरू करावयाचें अशा प्रकारची ही तहकुबी असते. ( Prorogue प्रोग ) तहकूब करणें—यांत मात्र नवीन काम पहिल्यापासून सुरू करण्यांत येतें. (Dissolve डिझॉल्व्ह) बरखास्त करणें, बरखास्ती-नंतर नवीन निवडणूक झाल्यावरच सभा भरवितां येते.

Act of Settlement (ॲक्ट ऑफ सेटल्मेंट); वारसाचा कायदा १७०१.

Addled Parliament (ॲडल्ड पार्लमेंट); वंध्या पार्लमेंट, वांझ किंवा मुकी सभा ( १६१४ ).

Anti-Corn-Law-League — ( ॲन्टी-कॉर्न-लॉ-लीग ); धान्याच्या कायद्याचा निषेध करणारा संघ.

Armed Neutrality- the — ( आर्म्ड न्यूट्रॅलिटी ); सशस्त्र तटस्थांचा संघ, पहिला १७८०, दुसरा १८०१.

Assize of Arms (असाइझ ऑफ आर्म्स); परगण्यांतील सर्व स्वतंत्र नागरिकांनीं जरूर तीं शस्त्रें बाळगण्याचा दुसऱ्या हेन्रीच्या वेळीं झालेला कायदा.

Balance of Power ( बॅलन्स ऑफ पॉवर ); निरनिराळ्या राष्ट्रांची सत्ता मर्यादित राहून कोणीही डोईजड होऊं नये हें तत्त्व, सत्तासाम्याचें तत्त्व.

Ballot-Vote by (बॅलट-व्होट बाय); गुप्तमतदान पद्धति, मतगोपन-पद्धति.

Benevolence ( बेनिव्होलन्स ); राजानें मिळविलेलें सक्तीचें कर्ज

| | |
|---|---|
| | अथवा देणगी, उकळिलेला पैका. |
| Bill | (बिल);पार्लमेंट पुढें आलेला कायद्याचा कच्चा मसुदा. |
| Bill of Attainder | ( बिल ऑफ अटेन्डर ); एकाद्या वजनदार पुरुषास राजद्रोही ठरवून फांशीची अथवा जिंदगी–जप्तीची शिक्षा फर्माविणारा पार्लमेंटचा हुकूम. [१६८९. |
| Bill of Rights | ( बिल ऑफ राइट्स ); हक्कांची मंजुरी, हक्कपत्रक |
| Billeting of Soldiers | ( बिलेटिंग ऑफ सोल्जर्स ); लष्करी शिपायांस घरीं राहूं देण्यास घरधन्यास भाग पाडण्याची पद्धति |
| Cabal | ( कबॅल ); दुसऱ्या चार्लसचें एक मंत्रिमंडळ |
| Cabinet | ( क्याबिनेट ); मंत्रिमंडळ. |
| Cavalier | ( क्याव्हेलिअर ); पहिला चार्लस आणि पार्लमेंट यांच्यामधील युद्धांत राजाच्या बाजूनें लढणारा गृहस्थ. |
| Civil List | ( सिव्हिल लिस्ट ); राजाच्या खाजगी खर्चाकरितां दिलेली नेमणूक. |
| Commonwealth | ( कॉमनवेल्थ ); पहिल्या चार्लसच्या फांशीनंतर स्थापिलें गेलेलें लोकसत्ताक राज्य. |
| Conservative | ( कॉन्झर्व्हेटिव्ह ); पुराणमतवादी. |
| Constitutions of Clarendon | ( कॉन्स्टिटयूशन्स ऑफ क्लॅरेन्डन ); क्लॅरेन्डन येथील कानू ( ११६४ ). |
| Copyholder | ( कॉपीहोल्डर ); करार–पत्रवाला शेतकरी. |
| Crusades | ( क्रूसेड्स ); धर्मयुद्धें. |
| Curia Regis | ( क्युरिआ रेजिस ); ग्रेट कौन्सिलची कमिटी. |
| Danegeld | (डेनगेल्ड); डेन लोकांपासून देशाचें रक्षण करण्यासाठीं अँग्लो–सॅक्सन राजांनीं बसविलेला कर. |
| Declaration of Right | ( डेक्लरेशन ऑफ राइट ); हक्कांचा खुलासा, अधिकार-मागणी ( १६८९ फेब्रुवारी ). |
| Dispensing Power | ( डिस्पेन्सिंग पॉवर ); एकाद्या कायद्याच्या अंमलापासून व्यक्तीस मोकळीक देण्याची सत्ता. |

Divine Right ( डिव्हाइन राइट ); राजा ईश्वरी अंश आहे हें मत, 'ना विष्णुः पृथिवीपतिः'.

Dominion ( डोमीनिअन ); स्वायत्त वसाहत, उदाहरणार्थ क्यानडा, ऑस्ट्रेलिआ.

Father of Parliament ( फादर ऑफ पार्लमेंट ); पार्लमेंटचा जनक, सायमन डी मॉन्टफर्टची पदवी.

Fifteen ( फिफ्टीन ); पहिलें जॅकोबाइट बंड, जंगी पंधरा ( १७१५ ).

Feudal System ( फ्यूडल सिस्टिम ); सरंजामपद्धति.

Forty-five ( फॉर्टी–फाइव्ह ); दुसरें जॅकोबाइट बंड, जंगी पंचेचाळीस ( १७४५ ).

Freeholder ( फ्रीहोल्डर ); स्वतंत्र शेतकरी.

Grand Remonstrance (ग्रॅण्ड रिमॉन्स्ट्रन्स);गाऱ्हाण्यांची याद १६४१.

Great Commoner ( ग्रेट कॉमनर ); थोरल्या पिटची पदवी.

Habeas Corpus Act ( हेबिअस कॉर्पस ॲक्ट ); व्यक्तिस्वातंत्र्याचा कायदा ( १६७९ ).

House of Commons ( हौस ऑफ कॉमन्स ); लोकसभा.

House of Lords ( हौस ऑफ लॉर्ड्स ); उमरावांची सभा.

Impeachment ( इम्पीचमेंट ); कॉमन्सनीं लॉर्डांपुढें एकाद्या अधिकाऱ्याची चालविलेली चौकशी. गुन्हा–चौकशी.

Indulgences (इन्डल्जन्सेस); पापमुक्ततेचे पास, हे विकत घेऊन एकाद्यानें पापापासून आपली मुक्तता करून घ्यावी असा धर्मगुरूंचा उपदेश असे.

Instrument of Government ( इन्स्ट्रुमेंट ऑफ गव्हमेंट ); १६५४ त सैन्यानें बनविलेलें राज्यघटनापत्रक.

Invincible Armada ( इन्व्हिन्सिबल आर्मेडा ); अजिंक्य आरमार.

Ironsides (आयर्नसाइड्स);क्रॉम्वेलचें स्वारांचें पोलादी पलटण.

Knight of the Shire (नाइट ऑफ दी शायर); परगण्यांतील छोटा

Liberal (लिबरल); उदारमतवादी. [जमीनदार.
Livery (लिव्हरी); मध्ययुगांत सरदारांनीं बाळगिलेले भपकेदार पोशाख केलेले गुंड.
Magna Charta (मॅग्ना चार्टा); मोठी सनद, महाशासन.
Maintenance (मेन्टेनन्स); एकाद्या गरीबास वजनदार सरदार खटल्यांत मदत करीत, व त्यानें खटला जिंकला कीं जिंकलेल्या मिळकतीचा बराच भाग उपटीत, या मदतीस मेन्टेनन्स हें नांव आहे. सातव्या हेन्रीनें लिव्हरी व मेन्टेनन्स हीं दोन्ही बेकायदेशीर ठरविलीं.
Middle Ages (मिडल एजेस); मध्ययुग, Dark Ages डार्क एजेस–अज्ञानयुग.
Militia Bill (मिलिशिया बिल); सैन्यावर आपला ताबा चालावा म्हणून कॉमन्सनीं पास केलेली याद (१६४२).
Model Parliament (मॉडेल पार्लमेंट); नमुनेदार पार्लमेंट (१२९५).
Ordinance (ऑर्डिनन्स); पार्लमेंटच्या संमतीशिवाय कौन्सिलच्या विचारें राजानें काढलेला हुकूम, राजाचा वट हुकूम.
Parliament (पार्लमेंट); कायदेकारी सभा.
Petition of Right (पिटिशन ऑफ राइट); हक्क संरक्षणाचा अर्ज.
Pilgrimage of Grace (पिलग्रिमेज ऑफ ग्रेस); धार्मिक यात्रा १६३६.
Pride's Purge (प्राइड्स पर्ज); प्राइडनें केलेली हकालपट्टी, प्राइडचा 'हकाला'.
Proclamation (प्रॉक्लमेशन); राजानें काढिलेला हुकूम, जाहीरनामा.
Protectorate (प्रॉटेक्टरेट); संरक्षक शासनपद्धति १६५३–५८.
Provisions of Oxford (प्रोव्हिजन्स ऑफ ऑक्सफर्ड); ऑक्सफर्डचे नियम १२५८.
Radical (रॅडिकल); मूलस्पर्शी, मूलगामी.
Reformstion (रेफमेशन); धर्मसुधारणा.

Reform Bill (रिफॉर्म बिल); सुधारणेचा कायदा १८३२.
Renaissance (रिनेसन्स); विद्येचें पुनरुज्जीवन. (यशस्वी.
Revolution the Glorious (रेव्होल्यूशन–दी ग्लोरिअस); क्रान्ति–
Royal Prerogative (रॉयल प्रेरॉगेटिव्ह); राजाचे खास हक्क.
Rump Parliament (रम्प पार्लमेंट); प्राइडनें केलेल्या हकालपट्टीनंतरच्या पार्लमेंटचें नांव. ही लांडी पार्लमेंट क्रॉम्वेलनें १६५३ त बरखास्त केली.
Scutage (स्कुटेज); लष्करी नोकरीऐवजीं पैसे देण्याची पद्धति.
Self-denying Ordinance (सेल्फ–डिनाइंग ऑर्डिनन्स); पार्लमेंटच्या सभासदांस लष्करी जागा सोडून द्यावयास लावणारा १६४५ चा पार्लमेंटचा कायदा.
Sheriff (शेरिफ); परगण्यावरील राजाचा अधिकारी.
Ship-money (शिप–मनी); नौका–कर.
Solemn League and Covenant (सॉलेम लीग ॲण्ड कॉव्हीनण्ट); इंग्लंडांत प्रेस्बिटीरियन पंथाचा स्वीकार करण्याच्या अटीवर इंग्लिश पार्लमेंटनें स्कॉटिश लोकांशीं केलेलें सख्य १६४३.
Speaker (स्पीकर); कॉमन्ससभेचा अध्यक्ष.
Suspending Power (सस्पेन्डिंग पॉवर); एकादा कायदा अंमलांत न आणतां तो तहकूब ठेविण्याचा अधिकार, अंमलतहकुबीचा अधिकार.
Tory (टोरी); राजपक्षीय, शॅफ्ट्स्बरी व त्याचे अनुयायी दुसऱ्या जेम्सची वारसा–रद्दी घडवून आणण्याची खटपट करीत असतां राजाच्या हक्कांचें स्तोम माजविणारा पक्ष; पुढेंही राजाचे खास हक्क व प्रस्थापित धर्म या दोन्ही बाबींबद्दल आदर बाळगणारा पक्ष.
Wars of the Roses (वार्स ऑफ दी रोझेस); गुलाबी झुंज.
Whig (व्हिग); क्रान्तिपक्षीय, मुख्यत १६८८ ची क्रान्ति घडवून आणणारा पक्ष.

# स्मरणीय वचनें.



१ Had I but served my God as diligently as I have served my king he would not have given me over in my grey hairs. मीं आपल्या राजाची जितक्या तत्परतेनें चाकरी केली तितक्या तत्परतेनें जर मीं देवाची भक्ति केली असती तर त्यानें मला म्हातारपणीं अंतर दिलें नसतें–वूल्सीचे शेवटचे शब्द.

२ Let judges be lions, but lions under the throne. न्यायाधीश सिंहांसारखे निर्भय असावेत, परंतु या सिंहांनीं सिंहासनास आधारभूत व्हावें––बेकन.

३ May it please, Your Majesty, I have neither eyes to see nor tongue to speak in this place except as this House is pleased to direct me. महाराज ही सभा सांगेल त्याहून इतर गोष्टी पाहण्यास माझे डोळे समर्थ नाहींत व त्या बोलण्यास माझ्या जिभेंत शक्ति नाहीं––स्पीकर लेन्थाल मोठ्या धैर्यानें पहिल्या चार्लसला म्हणाला.

४ Put not your trust in princes. राजांवर विश्वास ठेवूं नका––स्ट्रॅफर्ड फांशीं जातांना म्हणाला.

५ Marlborough never besieged a fortress which he did not take nor fought a battle which he did not win. मार्लबरोनें ज्या किल्ल्याला वेढा घातला तो सरच झाला, त्यानें जी लढाई केली तींत त्याला जयच आला–फ्रेंच ग्रंथकार व्हॉल्टेअर.

६ Ring your bells now, but soon you will be wringing your hands. आतां घंटा वाजवा, पण लवकरच हात चोळीत बसण्याची पाळी येईल––स्पॅनिश युद्धाच्या आरंभीं वॉल्पोल म्हणाला ( १७३९ ).

७ Every man has his price. पैसा दिला कीं, कोणताही मनुष्य वश होतो––वॉल्पोलचें आवडतें वाक्य.

८ "Evidently" said the French Commander, "the winds are not Jacobites." फ्रेंच सेनापति म्हणाला, 'खरोखर, वारे कांहीं जॅकोबाइट नाहींत (१७४५).

९ I am sure that I can save my country and that no one else can. माझ्या देशाचा बचाव मलाच करतां येईल, इतर कोणालाही करतां येणार नाहीं असें मला खात्रीपूर्वक वाटतें--वुइल्यम पिट ( १७५७ ).

१० We shall win Canada on the banks of the Elbe. एल्बच्या तीरावर आम्ही क्यानडा जिंकूं--युरोपांत फ्रेंचांमागें ससेमिरा लावण्याच्या आपल्या धोरणाचें समर्थन करतांना पिट म्हणाला.

११ There should be no taxation without representation. ना प्रतिनिधी, ना कर--अमेरिकन तंट्याच्या वेळीं पिटच्या तोंडचें आवडतें वाक्य.

१२ No one shall persuade me when a whole people are concerned that acts of lenity are not means of conciliation. सार्वजनिक कार्यांत दयालुत्वाचीं कृत्यें समेटाचीं साधनें नाहींत असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं--अमेरिकेशीं तंट्याच्या वेळचा बर्कचा उद्गार.

१३ Washington was the man first in war, first in peace, and first in the hearts of his fellow countrymen. वॉशिंग्टनसंबंधीं असें म्हणतां येईल कीं, तो पुरुष युद्धकाळीं पहिला शांततासमयीं पहिला, व आपल्या देशबंधूंच्या अंतःकरणातही पहिला असे

१४ "How much is this the greatest event that ever happened in the world," Fox cried with a burst of enthusiasm; "and how much the best !" "जगाच्या इतिहासांतील किती मोठें वृत्त हें व किती उत्तम !" बॅस्टील तुरुंगाच्या नाशाची बातमी ऐकून हर्षभरांत फॉक्स बोलला १७८९.

१५ I am convinced that the only method of retaining distant colonies with advantage is to enable them to govern themselves. दूरच्या वसाहतींचा संबंध कायम ठेविण्याचा एकच मार्ग म्हटला म्हणजे त्यांना स्वतः राज्य चालविण्यास समर्थ करणें हा होय असें मला खात्रीपूर्वक वाटतें--फॉक्स १७९१.

१६ Let us be masters of the Channel for six hours, and we are masters of the world. सहा तास (इंग्लिश) खाडी आमच्या ताब्यांत येऊं द्या कीं आम्ही जगाचें धनी झालोंच--नेपोलियन १८०५.

१७ England expects every man to do his duty. प्रत्येक माणसानें आपलें कर्तव्य करावें अशी इंग्लंडची अपेक्षा आहे--हे शब्द वर लिहिलेलें निशाण ट्राफल्गारच्या लढाईंत नेल्सनच्या जहाजावर फडकत होतें.

१८ "Roll up that map," Pitt said pointing to a map of Europe which hung upon the wall "it will not be wanted these ten years." भिंतीवर टांगलेल्या नकाशाकडे बोट दाखवून पिट म्हणाला, 'गुंडाळा, तो नकाशा गुंडाळा, आतां वीस वर्षे त्याची कांहीं जरूर नाहीं.'

१९ When soldiers brave Death, they drive Him into the enemy's ranks. जेव्हां वीर मृत्यूला तोंड देतात तेव्हां त्याची शत्रुसैन्यांत हकालपट्टी होते--जेनाच्या लढाईपूर्वीं दोन दिवस नेपोलियन म्हणाला १८०६.

२० I will never consent to divide the people of Ireland into a loyal minority, and a disloyal majority. राजनिष्ठ अल्पसंख्याक व अराजनिष्ठ बहुसंख्याक अशी आयर्लंडांत दुफळी व्हावी याला मीं केव्हांही संमती देणार नाहीं ( ग्लॅडस्टन १८८४ ).

२१ we must always remember that we are not part of the Continent, but we mut never forget that we are neighbours to it. इंग्लंड युरोपखंडाचा भाग नाहीं हें आपण

नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे पण तें खंडाच्या शेजारी आहे हेंही विसरतां कामा नये--ग्लॅडस्टन.

२२ I myself believe in a foreign policy which believes that the peace of the world is the interest of England. जगांत शांतता राखण्यांत इंग्लंडचे हितसंबंध गुंतले आहेत असें मानणाऱ्या परराष्ट्रीय धोरणावर माझी श्रद्धा आहे--डिझरायली, १५ जुलै १८६५.

२३ There are two things that you can neither end nor mend ; the House of Lords is one, the other is the Pope of Rome. ज्यांचा अंत करतां येत नाहीं किंवा ज्यांत सुधारणा करणें शक्य नाहीं अशा दोन संस्था आहेत; एक लॉर्ड्सची सभा व दुसरी रोमचे पोप--ग्लॅडस्टन.

२४ Good Government could never be a substit ite for Government by the people themselves. स्वराज्याची तहान सुराज्यानें केव्हांही भागणार नाहीं--सर हेन्री क्याम्पबेल बॅनरमन (१९०५).

२५ The Prime Minister is the keystone of the Cabinet arch. मुख्यप्रधान मंत्रिमंडळाच्या कमानीची मध्यशिला होय —मोर्ले.



# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १० | २७ | घूस | धूस |
| १२ | १ व पुढें | केबल | कबॅल |
| २७ | ७ | धर्मोपदेक | धर्मोपदेशक |
| ५४ | २ | मॉन्स | मॉन्स |
| ५५ | १२ | सॅव्हाय | सॅव्हॉय |
| ५५ | १५ | समजुतदर | समजूतदार |
| ६७ | २४ | लॉड्स | लॉर्ड्स |
| ७३ | ७ | कच्या | कच्च्या |
| ७७ | १० | ऑर्फड | ऑर्फर्ड |
| ९० | २३ | वे र | वेसर |
| ९२ | ५ | डेव्हन ायर | डेव्हनशायर |
| १२३ | २७ | Nation | Nations |
| १३५ | ७ | १८०९ | १८०१ |
| १६५ | ३ | १८४० | १८३० |
| १६८ | २३ | १७ २ | १७५२ |
| २१४ | १ | काडामीडे | काडीमोड |

१९ पानांतील ६ व्या ओळीच्या आरंभापासून नवव्या ओळींतील 'झाले'पर्यंतचा मजकूर, १८ व्या पानावरील आठव्या ओळींतील 'फांशीं देण्यांत आले' यापुढें असा वाचणें:—

पार्लमेंटांत क्याथॉलिक लोकांस पार्लमेंट सभेचे सभासद होण्याचा हक असूं नये हें बिल पास झालें (१६७८ नोव्हेंबर). व या वेळेपासून १८२९ सालपर्यंत पार्लमेंट सभेस क्याथॉलिक पारखे झाले.

